159

मराठी

# निबंध-मार्ग-दर्शन

## ( भाग दुसरा )

नारायण केशव बेहेरे, एम्. ए., बी.एस्सी., एल्. टी.,
नागपूर.

किंमत दीड रुपया

मराठी

# निबंध-मार्ग-दर्शन

( भाग २ )

सपादक

नारायण केशव बेहेरे
एम् ए, बी. एस्सी., एल्. टी

नागपूर

१९३३

किमत १॥ रुपया

प्रकाशक
**नारायण केशव बेहेरे,**
एम्. ए., बी. एस्सी., एल्. टी.
धनतोली, नागपूर.

मुद्रक
**श्रीपाद रघुनाथ राजगुरु,**
'राजगुरु आणि कंपनीज् प्रेस',
५१३, शनवार, पुणें २.

# मराठी
# निबंध-मार्ग-दर्शन

## दोन शब्द

१ **हायस्कूल सर्टिफिकेट** (मॅट्रिक) व **इंटरमिजिएट** या दोन्ही परीक्षाना मातृभाषेतून निबंधलेखन हा **आवश्यक विषय** ठेवला आहे. मराठी मातृभाषा असणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी हें पुस्तक लिहिले आहे.

२ वाक्यविचार, कल्पनाविस्तार व संकोच, आणि निबंध व पत्र-लेखन, याचा खालच्या वर्गातून विद्यार्थ्यांना थोडाबहुत परिचय पूर्वीच झाला असतो, ही गोष्ट लक्षात ठेवूनच प्रस्तुत पुस्तक लिहिले आहे. निबंध-लेखनाची सविस्तर व पत्रलेखनाची थोडीशी माहिती प्रारंभीं दिली आहे. अभ्यासाकरिता निबंधलेखनास उपयोगी पडणारीं विपुल उदाहरणें दिलीं आहेत. काही थोड्याशा विषयावर निबंधलेखनाचे मुद्दे आराखडेवजा दिले आहेत. अभ्यासाने कोणालाहि उत्तम निबंध लिहिता येतो. तेव्हा उदाहरणा-दाखल दिलेल्या विषयाचें विद्यार्थ्यांनी स्वतः मुद्दे काढावे आणि बरेचसे निबंध फुरसतीने सविस्तर लिहून पाहावे. म्हणजे त्याना या बाबतीत यश मिळेल.

३ शेवटी नमुन्यादाखल काही नामांकित व अनुभवी लेखकाचे उतारे अभ्यासाकरिता जोडले आहेत. भाषा, लेखन-शैली, व विवरणपद्धति या दृष्टीने त्याचा विद्यार्थ्यांनी **बारकाईने अभ्यास** करावा. साहित्यपरिषदेने मंजूर केलेल्या शुद्धलेखनपद्धतीला अनुसरून प्रस्तुत पुस्तक लिहिलें आहे. इतक्याउपर छापखान्यातील भुतानी कोठे चुकून गोंधळ घातला तर त्याला नाइलाज आहे.

ज्या लेखकानी आपले किंवा आपल्या मालकीचे लेख या पुस्तकात समाविष्ट करण्याची परवानगी दिली त्याचे मी मनःपूर्वक आभार मानतों. लोकमान्य टिळक याचा लेख केसरीच्या ट्रस्टींच्या कृपेने, आणि काळकर्ते प्रो० परांजपे याचा लेख त्याचे चिरंजीव श्री० विनायकराव परांजपे, वकील, पुणे यांच्या कृपेने या संग्रहात घेता आले.

धनतोली, नागपूर )
ता. १-१०-१९३३ )

**नारायण केशव बेहेरे**

# अनुक्रमणिका

# मराठी
# निबंध-मार्ग-दर्शन

[ १ ]

## प्रास्ताविक

आजकाल प्रत्येक परीक्षेंत विद्यार्थ्याला निबध लिहावा लागतो. विद्यार्थ्याच्या आवडीचे कोणतेहि विषय असले व त्याने परीक्षेला कोणतेहि विषय निवडले असले, तरी भाषा हा आवश्यक विषय असणारच, आणि भाषेच्या अभ्यासात निबधलेखनाला महत्त्वाचें स्थान आहे. कारण, **निबंधलेखन म्हणजे विद्यार्थ्याने एखाद्या विषयावरील आपले विचार व्यवस्थित रीतीने प्रगट करणें होय.**

मनुष्याचे **विचार वाचनाने व अनुभवाने पक्क होतात.** विद्यार्थिदशेतील मुलाचे वय लहान असल्यामुळे त्याचा अनुभव फारच अल्प असतो. त्यामुळे वाचनावर भिस्त ठेवल्याशिवाय त्याचे ज्ञान वाढणार नाही, आणि ज्ञान वाढलें नाही तर विचार खुरटेच राहणार ! विद्याव्यासंगी प्रौढ माणसाचे विचार जोमदार व व्यापक असतात.

**मुलांनी काय वाचावें ?** विद्यार्थिदशेंत अभ्यासाच्या पुस्तकां-शिवाय इतर पुस्तकें, वर्तमानपत्रे आणि मासिकें विद्यार्थ्यांनी

अवश्य वाचावी. त्याशिवाय त्याना जगातील घडामोडींचे यथासाग ज्ञान होऊं शकणार नाही. आपले शिक्षक व पालक याचा सल्ला घेऊनच विद्यार्थ्याने आपल्या वाचनाची निवड करावी. वर्तमान-पत्राच्या वाचनाने **जगांतील** प्रचलित विषयाचें ज्ञान होते, तर ग्रथाच्या योगे ज्ञानात कायमची भर पडते. कादबऱ्या-नाटकापेक्षा इतिहास व चरित्रग्रंथ विद्यार्थ्यांच्या दृष्टीने अधिक हितावह होत.

काहीजण जात्या उत्तम वक्ते असतात, त्याचप्रमाणे काही जणाना लेखनकला इतरापेक्षा सहजगत्या साध्य होते. म्हणजे काही जणाना आपले विचार श्रोत्याना किंवा वाचकाना उत्तम रीतीने पटवून देण्याची हातोटी साधलेली असते. ही ईश्वरी देणगी होय. हिला कोणी **स्फूर्ति** अथवा **प्रतिभा** असें नाव देतात, परंतु ही ईश्वरी देणगी लाभली नसली, तरी सुद्धा प्रत्येकाला प्रयत्नाने थोडीबहुत लेखनकला साध्य करून घेता येते. जगात उत्तम वक्ते किवा सभा जिकणारे पंडित मोजके असले, तरी बरीच माणसे बोलण्यात व्यवहारकुशल असतात व जगात वावरतांना साध्या घरगुती संभाषणात इतरावर चागली छाप पाडतात. त्याप्रमाणेच प्रत्येक माणसाला नामाकित लेखक होतां आलें नाही, तरी प्रयत्नाने आपले विचार आकर्षक रीतीने माडण्याची कला साध्य करतां येते.

## [ २ ]

## भाषेचे महत्त्व

**मनांतील विचार भाषेच्या द्वारें व्यक्त होतात.** खुणांनी किवा अन्य मार्गांनी एखादा बहिरा-मुका मनुष्य आपले विचार व्यक्त करीत असेल, किवा एखादा चित्रकार आपल्या मनांतील भाव कुंचल्याने चित्र-फलकावर रंगवून प्रकट करीत असेल; अथवा

एखाद्या संगीतज्ञाला आपलें मन आलापानी व्यक्त करून दाखविता येत असेल. परंतु या मार्गाचा विचार आज आपणास करणें नाही. कारण हे सर्व अपवाद होत सामान्य माणसें भाषेच्या द्वारेच आपले विचार व्यक्त करतात, व आपण अशा सर्वमान्य मार्गाचाच येथे विचार करीत आहो.

आपली मातृभाषा आपणास बालपणापासूनच येत असते. दोन वर्षाचें मूल झाले, की ते बोलू लागते, आणि प्राथमिक शाळेंत तें सहा-सात वर्षाच्या वयात जाऊ लागलें, म्हणजे त्यास मातृभाषा लिहिताहि येते परंतु त्या वयामधे मुलाचे विचार अगदी त्रोटक असतात व त्याच्या भाषेंतील शब्दाचा भरणा मोजका असतो. परंतु मुलगा बारा-चवदा वर्षाचा झाला, म्हणजे विचार व्यक्त करताना शब्दाची अडचण त्याला पडत नाही. परभाषेमधे विचार व्यक्त करावयाचे असले तर त्याला शब्दाची अडचण पडेल, परंतु आपल्या मातृभाषेत विचार व्यक्त करावयास शब्दाची अडचण त्याला त्या वयात कधीच भासत नाही. एखादा निरक्षर शेतकरी देखील आपले विचार स्वभाषेंत उत्तम रीतीने तोंडाने व्यक्त करू शकतो. त्याला लिहिता येत नसेल. त्याला जगांतील नानाविध भाषाची माहिती नसेल किंवा शास्त्राचें ज्ञान नसेल, परंतु त्याच्या रोजच्या अनुभवाचे, जिव्हाळ्याचे व आवडीचे जे विषय आहेत, त्या विषयावर बोलताना तो शब्दाच्या अभावी अडखळणार नाही. मनुष्य साक्षर व सुशिक्षित असला तर मग हा प्रश्नच उरत नाही. घरी, दारी, बाजारात, देवळात, यात्रेंत आपण आपल्या मातृभाषेतूनच व्यवहार करतो. केवळ श्रवणाने मातृ-भाषेंतील शब्दसंपत्ति आपल्याजवळ साठते त्यामुळे मुलगा मोठा

झाला, म्हणजे मातृभाषेंतून स्वतःचे विचार व्यक्त करतांना त्याला शब्दाची अडचण कधीच भासत नाही. त्याच्या मार्गात ज्या अडचणी येतात त्या निराळ्याच.

पुष्कळ वेळा मुलें जी भाषा वापरतात ती दुर्बोध असते. मुलगा जें लिहितो, ते त्याचें त्याला कळत असेल, परंतु तें इतराना सहज कळतें किंवा नाही, याबद्दल तो लिहिताना सहसा विचार करीत नाही. प्रत्येकाने लिहिताना ही गोष्ट ध्यानात धरावी की, आपला आशय कोणत्याहि वाचकाला फारसे श्रम न करतां कळावा. आपण जें लिहितो त्यामुळे त्रयस्थ वाचक बुचकळ्यात पडूं नये. आपण जे लिहितो तें सर्वसामान्य वाचकाना समजले पाहिजे, म्हणजे **भाषेंत सुबोधपणा असावा.** भाषा जितकी सुबोध तितकी ती जास्त परिणामकारक होते. लहान लहान, साधी व चटकदार वाक्ये वाचकाला रुचतात व पटतात, आणि अशा वाक्यात विचाराचा एकसूत्रीपणा राखता येतो. पुष्कळाना असे वाटतें की फार मोठीं व लांबलचक वाक्ये लिहिली म्हणजे आपले ज्ञान उठावदार रीतीने प्रगट होईल. पण ही त्याची समजूत सर्वस्वी चुकीची आहे. लांबलचक वाक्ये लिहिणारा लेखक चक्रव्यूहात सापडल्याप्रमाणे त्या वाक्यातच गुरफटून जातो. त्यामुळे त्याच्या विचारातील संगति तुटते आणि त्याच्या लेखनात एकसूत्रीपणा राहत नाही तेव्हां प्रत्येक लेखकाने हे लक्षात ठेवावें की,

(१) भाषा अतिशय सुबोध असावी.

(२) वाक्यें लहान लहान पण चटकदार असावी.

(३) लांबलचक वाक्यानी विचाराची साखळी तुटण्याचा संभव असतो.

# [ ३ ]
# शब्द

पुष्कळ लेखक साधे, सुटसुटीत व लोकाच्या व्यवहारांत प्रत्यही येणारे मराठी शब्द न वापरतां, मुद्दाम बोजड, क्लिष्ट आणि अपरिचित असे संस्कृत शब्द वापरतात. असे संस्कृतप्रचुर शब्द मधून-मधून वापरले, म्हणजे आपलें लिखाण उत्तम ठरेल असा त्याना भरवसा वाटतो पण ही त्यांची समजूत चुकीची आहे हत्तीच्या ऐवजी गज, जोड्याच्या ऐवजी उपानह, आकाशाच्या ऐवजी अंबर, असे शब्दप्रयोग वापरल्याने भाषा सुंदर बनत नाही. उलट, भाषा त्यामुळे क्लिष्ट मात्र होते. **अपरिचित अशा संस्कृत शब्दांचा लेखनांत सहसा उपयोग करूं नये.** जी कल्पना सरळ मराठी शब्दाने व्यक्त करता येते, ती व्यक्त करण्याकरिता मुद्दाम क्लिष्ट संस्कृत शब्द वापरणे, हे मातृभाषेचे विडंबन होय. आपली मराठी भाषा संस्कृतापासून निघाली आहे हे खरें, परंतु हल्ली तिला स्वतंत्र भाषेची योग्यता प्राप्त झाली आहे. सून मोठी व कर्तीसवरती झाली, तरी तिने एखाद्या लहान मुलीप्रमाणे सदासर्वकाळ सासूच्या आज्ञेत वागावें व सासूच्या म्हणण्याला मान तुकवावी, अशी अपेक्षा कोणीहि शाहणा मनुष्य करणार नाही तेव्हा संस्कृत शब्द मधून मधून मुद्दाम वापरण्याचा हव्यास लेखकाने टाळावा संस्कृत शब्द वापरल्याने लेखकाची विद्वत्ता प्रगट होते ही समजूत चुकीची आहे.

आपल्या मराठी भाषेंत उर्दू व इंग्रजी या भाषातूनहि अनेक शब्द आलेले आहेत. ते शब्द मराठीत आज इतके रूढ झालेले आहेत की, ते सामान्य लोकाच्या व्यवहारात नित्य येतात. आपल्या महाराष्ट्रात

मुसलमान, पार्शी व ख्रिस्ती यांची वस्ती आहे. महाराष्ट्राच्या सीमान्त प्रदेशात हिंदी, गुजराथी, तेलगू व कानडी या भाषा बोलणारे लोक नांदतात. आपल्या या हिंदी बांधवाच्या सहवासाने त्यांच्या भाषेतील अनेक सुंदर व सुटसुटीत शब्द आपल्या भाषेंत शिरले आहेत. त्यांना आतां परकीय लेखणें चुकीचें होय. ते शब्द मूळचे परकीय असले तरी ते आता आपले झाले आहेत. शेजारधर्माचा हा साहजिक परिणाम होय. एखादा हिंदी मनुष्य आज जर असे म्हणेल कीं, "हिंदुस्थान ही माझी जन्मभूमि नव्हे. कारण माझे पूर्वज असलेले आर्य लोक मध्य आशियातून किंवा उत्तर ध्रुव-प्रदेशातून या देशात आले, त्या अर्थी मध्य आशिया किंवा उत्तर ध्रुव-प्रदेशाला मी आपली जन्मभूमि मानतों," तर आपण त्या मनुष्याची वेड्यातच गणना करू. ह्या न्यायानेच पर्शियन किंवा इंग्रजी भाषेतून मराठीत शिरलेले व मराठीने आत्मसात् केलेले शब्द आपलेच समजले पाहिजेत. गुजराथी, तेलगू, कानडी किंवा हिंदी, या हिंदुस्थानी भाषांतून मराठीत आलेल्या शब्दांना परकीय लेखण्याचा मग प्रश्नच उरत नाहीं.

आपली मराठी भाषा संस्कृतापासून निघाली आहे हे खरें, आणि नवे विचार प्रगट करतांना कधी शब्दाची अडचण भासली, तर आपण संस्कृतच्या तोंडाकडे पाहतों हेंहि तितकेंच खरे, परंतु कोट, शर्ट, स्टेशन, बुक, बूट, पलटण, किताबखाना, अशा मराठीत रूढ झालेल्या परकीय शब्दांऐवजी अपरिचित संस्कृत शब्द वापरण्याचा हट्ट अनाठायी ठरेल. स्टेशनाला अग्निरथविश्रामस्थान म्हटल्याने मराठी भाषेचें सौंदर्य वाढणार नाहीं. उलट त्यामुळे भाषा अधिक बोजड मात्र होईल.

# [ ४ ]
# भाषा व बोली

लेखनाची भाषा नेहमी ग्रंथांत वापरली जाणारी अशीच असावी. सुसंस्कृत व सुशिक्षित लोक जी भाषा बोलतात त्या भाषेचेच लेखनात अनुकरण करणें इष्ट होय. कोणत्याहि देशात निरनिराळ्या परगण्यात निरनिराळ्या बोली बोलल्या जातात. **बारा कोसांवर भाषा बदलते,** अशी आपल्याकडे म्हण आहे, परतु ती बोली होय, भाषा नव्हे. **बोली हा भाषेचा अपपाठ होय** महाराष्ट्रात अनेक जाती पसरलेल्या आहेत. ब्राह्मण, कुणबी, तेली, माळी या सर्वांची बोली भिन्नाभिन्न असते, परतु ते सर्वच मराठी भाषा बोलतात. कोणत्याहि जातीचा मनुष्य अशिक्षित, असस्कृत व खेडवळ असला तर तो अशुद्ध बोली बोलतो. परतु तो सुशिक्षित व सुसस्कृत झाला म्हणजे शुद्ध भाषा लिहू व बोलू लागतो. ज्ञानेश्वर ब्राह्मण व तुकाराम मराठा या दोन्ही थोर सताची भाषा सारखीच शुद्ध, ग्रथनिविष्ट व सुसस्कृत आहे. मुकुंदराज भडाऱ्याकडचे, तर एकनाथमहाराज पैठणचे, आणि तुकाराममहाराज तर पुण्याजवळच्या देहूचे रहिवाशी होते. परतु ह्या स्थानिक अतरामुळे त्याच्या भाषेत मात्र अतर पडलें नाही. कारण लिहिताना मनुष्य शुद्ध व सुसस्कृत भाषाच लिहितो. वऱ्हाडची बोली भडाऱ्याच्या बोलीपेक्षा निराळी असेल, आणि पुणें प्रातातील बोलीशीहि तिचे फारसे साम्य नसेल कोकणाप्रमाणे घाटावर अनुनासिकाचें राज्य चालत नाही. परतु मराठी लेखक कोणत्याहि प्रातात राहत असला, तरी तो शुद्ध ग्रथनिष्ठ मराठीतच आपलें लेखन करतो. प्रादेशिक शब्द किंवा प्रादेशिक बोलीतील प्रयोग लेखनात वापरण्याचा हट्ट धरणे चागले नव्हे. यामुळे भाषेची

शकलें उडण्याचा संभव उत्पन्न होतो. प्रांतभेद, जातिभेद, पंथभेद ह्यामुळे मराठीच्या अनेक अपभ्रष्ट बोली समाजात रूढ होतात परंतु सुसंस्कृत लोकांच्या ग्रंथलेखनाच्या शुद्ध भाषेमुळे हे उपरी भेद लोपून भाषेला चिरस्थायी सुंदर रूप येते. **प्रादेशिक, गावढळ किंवा अपरिचित असे शब्द लेखनांत वापरूं नयेत.** जे प्रादेशिक शब्द सुंदर, सुटसुटीत व मराठीच्या पूर्वपीठिकेला धरून असतील त्यांना लेखनात स्थान मिळालें तर हरकत नाही, पण ते शब्द वापरतानाहि ते प्रादेशिक म्हणून हट्टाने वापरू नयेत. त्यांच्यामुळे भाषेची शब्द-संपत्ति वाढेल हा हेतु ते वापरताना मनात धरावा. **प्रादेशिक किंवा गावढळ प्रयोग वापरणें मात्र सर्वथैव चुकीचें आहे.** अशाने भाषेचें शुद्ध स्वरूप नष्ट होईल. 'भयंकर महाग, एकदम महाग, बिलकुल महाग' हे मुंबईकडचे शब्दप्रयोग, किंवा 'मी जाऊन राहिलों, मी करून राहिलो' हे नागपुरी शब्दप्रयोग, किंवा वऱ्हाडा-तील स्त्रियांच्या तोंडी असलेले 'मी जातों, मी येतो, मी पाणी भरतो' इत्यादि पुरुषी शब्दप्रयोग, ही सर्व अपप्रयोगांची उदाहरणें होत. हे प्रयोग बोलीत रूढ झाले असले तरी लेखनात वापरले जाऊ नयेत. लेखनाची भाषा बोलींतील भिन्नता नष्ट करणारी व अपपाठांचा नायनाट करून भाषेचें शुद्ध स्वरूप दाखविणारी असावी. सुसंस्कृत लोकांतील रूढ ( Standard ) भाषा हीच शुद्ध भाषा होय. आणि लेखनासाठी प्रत्येकाने हीच भारदस्त भाषा वापरली पाहिजे. भाषेंतील शब्द व वाक्प्रचार, आणि भाषाप्रयोग व वाक्यरचना, ही सर्व व्याकरण व भाषेचा संप्रदाय यांना अनुसरणारीं असावी.

## [ ५ ]
## बाह्यांगाचें महत्त्व

तुम्ही लिहिलेला निबंध कितीहि सुंदर असला, तरी तो जर वाचकाना वाचता आला नाही, तर त्याची छाप त्याच्यावर कशी पडणार? तेव्हा तुमचें अक्षर सुदर असले पाहिजे. सुदर मोत्याच्या ओळीसारखे दिसणारें अक्षर वाचकाचें मन तेव्हाच वेधते, उलटपक्षी किडच्यामाकोड्याप्रमाणे दिसणारे व गिचमिड झालेलें लिखाण वाचण्याचा कोणालाहि कटाळा येतो. तेव्हां तुम्ही आपलें अक्षर घटविणें जरूर आहे. अक्षर सुदर व वळणदार असले म्हणजे परीक्षकाचे मन प्रसन्न होतें. निदान नीटनीटकेपणा व सुबोधता प्रत्येकाला, त्याने काळजी घेतली तर, साधता येतील. अक्षेर वाटोळी असावीत, ती एकमेकापासून विलग असावीत. दोन शब्दामधे भरपूर जागा असावी आणि दोन वाक्यामधे त्याहूनहि अधिक अतर असावें. मराठी लिहिताना वरची रेघ साधली नाही तर लिखाण भोडे दिसते, आणि छप्पर नसलेल्या घराप्रमाणें हे बोडखे लिखाण कोणाला आवडत नाही. अक्षरावर मधूनमधून शाईचे डाग पडले किंवा लिखाणात एकसारखी खाडाखोड झाली असली, तर वाचकाचे मन अप्रसन्न होतें. **अक्षर वळणदार व सुंदर नसलें, तरी सवईनें हा नीटनेटकेपणा प्रत्येकास साधतां येईल.**

मालगाडीप्रमाणे एकसारखा धावता निबध कधीहि लिहू नये. प्रारंभी नीट विचार करून निबधाचे मुद्दे काढावे आणि प्रत्येक मुद्द्याचें विवरण एका स्वतत्र परिच्छेदात करावे. प्रत्येक परिच्छेदाचा प्रारभ ओळीच्या मध्यभागापासून करावा, म्हणजे दोन परिच्छेदात निदान एखाद्या ओळीचे तरी कोरें अतर राहिलें पाहिजे.

**कागदाला निदान एकचतुर्थांश तरी बाजूची मोकळी जागा सोडल्याशिवाय ( मार्जिन ) कधीहि लिहिण्यास प्रारंभ करूं नये.** बाजूला मोकळी जागा सोडलेली असली म्हणजे लिखाण उठावदार दिसतें. आणि एखाद्या वेळी नवीन मुद्दा सुचल्यास तो समासात मागून देखील घालता येतो. आपला निबंध लिहून झाल्यावर तो परत एकदा दोनदा वाचावा. म्हणजे लिहिण्याच्या गडबडीत व्याकरणाच्या ऱ्हस्व दीर्घादि चुका झाल्या असल्यास त्या सुधारता येतील, अनुस्वार गळले असल्यास ते देता येतील. एखादा शब्द सुटला असल्यास तो घालता येईल, आणि एखादा मुद्दा नव्याने सुचला तर तो समासात लिहिता येईल. समासात नवीन शब्द किंवा सुचलेल्या मुद्द्यासंबंधी नवें वाक्य लिहिताना, मुळात ज्या ठिकाणी ते घालावयाचें असतें, तेथे (काकपदासारखी) ^ अशी खूण करावी म्हणजे समासात लिहिलेले शब्द मूळ लेखनाला धरून वाचण्याची वाचकाची सोय होते. ज्या वेळी तुम्ही शाळेंत किंवा परीक्षेंत निबंध लिहाल, त्या वेळी तुम्हाला शाई संस्थेमार्फतच पुरविली जाते. परंतु ज्या वेळी तुम्ही घरी निबंध लिहाल, त्या वेळी लिहिण्याची शाई चांगली निळी किंवा काळी वापरण्याची खबरदारी घ्या शाईचा रंग फार गर्द नसावा व फिकटहि नसावा. तुमचा लिहिण्याचा टाक फार बारीक किंवा बोजडहि नसावा. लेखनाचें अक्षर फार किरटे किंवा ठोकळ येणार नाही, ही खबरदारी अवश्य घ्यावी. मराठी लेखनाला ग्लिफ पेन सोइस्कर असतें.

ह्या सर्व गोष्टींचा संबंध भाषेशी किंवा तुमच्या निबंधातील विचाराशी नाही हें खरें. परंतु आपला निबंध वाचकांना आवडावा ही प्रत्येकाची इच्छा असते. परीक्षक आपल्या निबंधाने खूष होऊन त्याने आपणास भरपूर मार्क द्यावे, अशी प्रत्येक विद्यार्थ्याची साहजिक

इच्छा असते. आणि ही इच्छा सफल होण्याकरिता ह्या सर्व बाह्य गोष्टीची काळजी घेणें जरूरीचें आहे.

## [ ६ ]

## कांही सूचना

( १ ) वाईट अक्षरांत गबाळेपणाने लाबलचक निबध खरडण्यापेक्षा, सुदर अक्षरात व्यवस्थित रीतीने लहानसा आटोपशीर निबध लिहिणें अधिक फायदेशीर आहे

( २ ) निबधाचें नाव वर जाड ठळक अक्षरात लिहावे. त्याला अवतरणचिन्हें द्यावीं किंवा त्या खाली रेघ मारावी.

( ३ ) योग्य सुभाषितवजा अवतरण आठवल्यास वर द्यावे.

( ४ ) प्रत्येक परिच्छेदाला देता येईल तर **समासांत पोटशीर्षक द्यावें**

( ५ ) रूपकादि अलकाराचा विवरणात उपयोग करावा.

( ६ ) विषयानुरूप एखादी गोष्ट सागून किवा कोडे घालून आरभी वाचकाची जिज्ञासा जागृत करावी व मग तें कोडें आपण उकलून दाखवून त्याचें कुतूहल तृप्त करावें.

( ७ ) क्षुद्र गोष्टी सागू नका. फक्त परिणामकारक गोष्टी तेवढ्या सागा

( ८ ) 'मी, माझे मत, मला असें वाटतें, माझी पक्की खात्री आहे की', असले अहकारयुक्त शब्दप्रयोग बनेल तोपर्यंत टाळा, परतु निबंधात स्वतःची आवडनिवड व स्वतःच्या भावना स्पष्टपणाने माडण्यास कचरूं नका.

( ९ ) निबधाच्या शेवटी आठवल्यास योग्य अशी म्हण किवा अवतरण द्यावें. निबधाचा शेवट भावनायुक्त असावा. वाचकाना

आळवून त्यांना आपल्या मताकडे ओढण्याचा कसून प्रयत्न करावा.

(१०) विरामचिन्हें योग्य जागीं द्यावी.

(११) शुद्धलेखनाकडे विशेष लक्ष द्यावें. लेखन व्याकरणाच्या नियमानुसार असावें.

## [७]

## विरामचिन्हें

ज्याप्रमाणे निबधाचे निरनिराळे परिच्छेद पाडणें जरूर आहे, त्याप्रमाणे एकाच परिच्छेदातील भिन्नभिन्न वाक्ये संदर्भानुसार एकामागून एक यावीत. वाक्य हे भाषेचे माप होय. वाक्यें स्वभावतः एकमेकापासून पृथक् असतात. अर्थानुरोधाने त्याचा एकमेकाशी सबध येत असेल, पण व्याकरणदृष्ट्या प्रत्येक वाक्य स्वतंत्र असते. वाक्याची पृथकता दाखविण्याकरिता व लेखनाचा अर्थ स्पष्ट करण्याकरिता, किंवा कांही शब्दावर अथवा वाक्याशावर जोर देण्याकरिता अथवा भावना दर्शविण्याकरिता, किंवा शब्दाचे आपापसातील व एकंदर वाक्याशी असलेले सबध स्पष्ट करण्याकरिता, विरामचिन्हाचा उपयोग करावा लागतो **विरामचिन्हांची नीट पेरणी केली नाही, तर लेखनांत शिस्त राहत नाही.**

**पूर्णविराम .** वाक्य सपलें म्हणजे (.) पूर्णविराम द्यावा. दुसरें वाक्य थोड्या अतरावर सुरू करावें.

> शब्दाचे सक्षेप केले तर पूर्णविरामाच्या खुणेनेच सक्षेप दर्शवितात. ती.=तीर्थरूप. उदा =उदाहरणार्थ.

**उद्गारचिन्ह !** आश्चर्य, आनद, दुःख इत्यादि भावना व विकार दाखविण्याकरिता हे चिन्ह (!) उपयोगांत आणतात. अरेरे! वाहवा! धन्य तो पुरुष! अहाहा!

**प्रश्नचिन्ह ?** प्रश्नार्थक वाक्याच्या शेवटी किंवा मध्यंतरी शंका आल्यास हें चिन्ह (?) वापरतात.

रामा, तू कोठे गेला होतास ? हिंदुस्थान हल्ली दरिद्री बनला आहे, हा सिद्धांत काहीं विद्वानांना (?) पटत नाहीं.

**अर्धविराम ;** जोडावयाचीं वाक्ये मोठी असल्यास; किंवा वाक्यांत पूर्वी एक दोन स्वल्पविराम आले असल्यास, किंवा उभयान्वयी अव्ययाचा उपयोग केला नसल्यास अर्धविराम (;) चिन्ह वापरतात. लहान लहान वाक्यें लिहून त्यावर जोर द्यावयाचा असेल तर अर्धविराम देतात.

आकाश भरले होते, विजा कडकडत होत्या, राक्षसाप्रमाणे काळेकभिन्न मेघ ऑ वासून उभे होते, पाऊस मधूनमधून डोकावत होता, अशा वेळीं कोण घराबाहेर पडणार ?

**स्वल्प-विराम ,** वाक्यांत अर्थ समजावून सांगण्याकरिता जेथे किंचित् थांबावे लागतें, तेथे हा (,) वापरतात.

(अ) संबोधनानंतर—रामा, तू कोठे गेला होतास ?

(आ) आणि, व, पण, परंतु, अथवा, किंवा, की, या उभयान्वयी अव्ययाच्या पुढे लांब वाक्ये आलीं असतां त्याच्या पूर्वी स्वल्पविराम देतात.

ते झपाट्याने स्वारीवर निघाले खरे, परंतु निघतांना हत्यारेंपात्यारे नीट तपासून घेण्याचें भान त्या गर्दीत त्यांना राहिले नाहीं.

(इ) एकाच प्रकारचे शब्द किंवा वाक्यांश एकत्र आले असतां स्वल्पविराम द्यावे लागतात.

शंकर, रामा, गोविंदा आणि मी बरोबर फिरावयास गेलो.
शंकर, रामा आणि गोविंदा, यांना मी बोलावणें पाठविलें.
गूढें उकलणे, अगम्याचा शोध लावणें, कठीण सिद्धान्त सोपे करणें पुष्कळ लोकांस आवडतें.

(ई) उतारा देताना त्याच्या अगोदर स्वल्पविराम द्यावा. माशी म्हणाली, "काय माझें सामर्थ्य ? मी केवढी मोठी गाडी ओढून नेतें"

(उ) गौण वाक्ये, संबंधी वाक्ये, क्रियाविशेषणें यांना दाखविण्याकरिता स्वल्पविराम देतात.

त्या गृहस्थाने पुष्कळ वर्षे ध्रुवप्रदेशात फिरून एक सिद्धान्त बांधला, तो असा की, ध्रुवप्रदेशात मुद्दाम एखादें गलबत रुतविले, तर ते हळूहळू ध्रुवाकडे आपोआप सरकत जाईल.

**कोलनः**—शब्दाचा किंवा वाक्याचा अर्थ देताना, उदाहरणाची यादी देताना, किंवा मोठा उतारा देताना, आरंभी ही खूण ( :— ) करतात.

उदाहरणे·—

**लहान रेघ**—एकाएकी सुचलेला विचार, किंवा समानार्थी शब्द घालताना(–)रेघ देतात.

बलवान वायुपुत्र मारुती—रामभक्त हनुमान—सेवेला सज्ज असल्यावर श्रीरामचंद्राला चिंता कोणती ?

**अवतरणचिन्हें** " " दुसऱ्याचे भाषण, किंवा ग्रंथातील उतारे देताना प्रारंभी "व अखेर" या अवतरणचिन्हाचा उपयोग करतात.

उताऱ्यांत पोट उतारा आला तर त्याच्या प्रारंभी 'व अखेरीस' अशी एकेरी अवतरणचिन्हें द्यावी.

विशेष महत्त्वाचे शब्द, किंवा निबंधाचें नाव पटकन लक्षात येण्याकरिता अवतरण चिन्हात घालावें किंवा मोठ्या अक्षरात लिहावें.

**कंस** —( ) शब्दाचा अर्थ स्पष्ट करण्याकरिता ( ) कस वापरून सोपा प्रतिशब्द किवा समानार्थक वाक्याश कसात लिहितात.

शिवाजीमहाराज औरगजेबाच्या कैदेतून मोठ्या शिताफीने (युक्तीने )निसटले.

## [८]

## शुद्धलेखन

लेखन शुद्ध नसेल तर वाचक निबध वाचताना पदोपदी अडखळतो व त्याचा रसभग होतो. त्यामुळे शुद्धलेखनात न्हस्वदीर्घाच्या चुका झाल्या असल्या, तर परीक्षकाच्या हातून मार्क कमी पडतात. शिवाय, भाषा शुद्ध राखणे, हे प्रत्येकाचे कर्तव्यच होय. शुद्धलेखनाचे सर्वमान्य महत्त्वाचे नियम खाली दिले आहेत. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शुद्धलेखन मडळाने मोठ्या परिश्रमाने या नियमाना विद्वानाची मान्यता मिळविली आहे

### ऱ्हस्व-दीर्घ विचार

( १ ) ऱ्हस्व इकारात व **उकारात तत्सम** (सस्कृतातून जसेच्या तसेच मराठीत आलेले ) शब्द प्रथमेच्या उभयवचनात ऱ्हस्वच लिहावे·—कवि, गति, गुरु, मति. रुचि, भानु

( २ ) ऱ्हस्व इकारात व **उकारात** तत्सम अव्यये ऱ्हस्वातच लिहावी:–परंतु, अद्यापि, यथामति

**आणि** हें अव्यय ऱ्हस्वातच लिहावें.

( ३ ) शुद्ध मराठी शब्दाचे अत्य ई ऊ दीर्घ लिहावे:—चबू, लाडू, बाई, गडू, पिठी.

( ४ ) शब्दांत एरवी कोठे इ उ आल्यास ते ऱ्हस्व लिहावे:– तुरटी, मुइमूग, शिवणें, विणणें, निजणें.

( ५ ) अंत्य यीच्या ऐवजी ईचा उपयोग करावा:–बाई, गाई.

**उपांत्य** (शेवटच्या अक्षराच्या पूर्वीचा) **स्वरासंबंधीं कांही नियम:**–

( ६ ) **अकारांत तत्सम** शब्दातील उपांत्य स्वर ऱ्हस्व इ किंवा उ असल्यास,तो प्रथमेच्या दोन्ही वचनात ऱ्हस्वच लिहावा:–गुण,विष.

( ७ ) मात्र अकारात **मराठी** शब्दातील उपांत्य ई ऊ दीर्घ लिहावे:--पीठ, लाकूड, मीठ, नाजूक, तूप. ( या नियमास काही अपवाद आहेत. जसे–चिंच, उंट, सुंभ. )

( ८ ) नागपूर, तारापूर, जबलपूर, रायपूर या ग्रामवाचक शब्दातील **तद्भव** ( संस्कृतातून रूपांतर पावून मराठींत आलेला ) पूर हा शब्द दीर्घ लिहावा.

( ९ ) उपांत्य दीर्घ ई ऊ असलेले अकारात **तत्सम** शब्द मराठीत आत्मसात् झाले असल्यास, विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वी सामान्य-रूपात उपांत्य स्वर दीर्घाचा ऱ्हस्व होतो.– जीव-जिवाचा शरीर-शरिराचा.

मराठीशी आत्मसात् न झालेल्या तत्सम शब्दाच्या बाबतीत मात्र उपांत्य स्वर दीर्घच ठेवावा·– सूत्र-सूत्रात, गीता-गीतेंत.

( १० ) दोन अक्षरी शब्दातील दीर्घ ई ऊ विभक्तिप्रत्यय लागताना ऱ्हस्व होतात·– पीठ-पिठात, दूध-दुधाला.

( ११ ) एखाद्या शब्दातील उपांत्याच्या पूर्वी जर दीर्घ स्वर किंवा अनुस्वार असेल, तर विभक्तिप्रत्यय लावण्यापूर्वी उपांत्य स्वराचा अ करावा·– रेशीम–रेशमास, वाघूळ–वाघळास, तांदूळ–तांदळांत

## अनुस्वार-विचार

नाकातून स्पष्टपणें ज्या शब्दांचा अथवा अक्षराचा उच्चार होतो त्यावर अनुस्वार द्यावा

( १ ) मराठीत अनुस्वार **शीर्षबिंदूने** दर्शवावा.- तंटा, चिच, आबा, खुटी, कलक.

परतु शीर्षबिदूने क्वचित् घोटाळा उडत असेल, तर त्याऐवजी **परसवर्ण** ( अक्षर वर्गातील पाचवी अनुनासिक व्यजनें -ङ्, ञ्, ण्, न्, म्, ) लिहावा·– **देहांत** ( शरिरात ) रोग ठाणे देतात. ( शीर्षबिदु )

आरोपीला **देहान्त** (प्राणदडाची ) शिक्षा झाली ( परसवर्ण ).

दुसऱ्या वाक्यातील **देहान्त** शब्द पहिल्याप्रमाणे **देहांत** असा लिहिला, तर अर्थाच्या दृष्टीने घोटाळा उडण्याचा संभव, म्हणून तेथे परसवर्ण योजणें इष्ट होय.

( २ ) य, र, ल, व, श, ष, स, ह ह्या अक्षराच्या पूर्वी येणाऱ्या अनुस्वाराबद्दल मराठीत **शीर्षबिंदूच** द्यावा·–सिह, सयम, मास

( ३ ) नपुसकलिंगी दीर्घ ईकारान्त, दीर्घ ऊकारान्त व एकारान्त नामाच्या शेवटी प्रथमा विभक्तीत उभयवचनी अनुस्वार द्यावा:– मोती–मोत्यें, वासरू–वासरे, केळें–केळी, बोलणे–बोलणी.

**अपवाद**—शुद्ध मराठी शब्द–पाणी, लोणी, गुळवणी याच्यावर अनुस्वार देऊ नये.

( ४ ) लिंगानुसार ज्याची रूपे बदलतात अशा विशेषणाच्या एकवचनी एकारान्त व अनेकवचनी ईकारान्त रूपावर अनुस्वार द्यावा:–चागलें ( फळ ), चागलीं ( फळे ).

( ५ ) हास, धाव, केस, काच, सावळा, कोवळा या शब्दावर अनुस्वार देऊं नये.

जेथे अनुस्वारामुळे अर्थभेद होत असेल त्या शब्दावर अनुस्वार द्यावा:—**नांव** ( माणसाचें )—**नाव** ( नौका ), **पांच** ( संख्या ) —**पाच** ( रत्न ).

( ६ ) **मी, आम्ही, तुम्ही** ह्या सर्वनामाच्या प्रथमेच्या रूपांवर अनुस्वार देऊ नये:—मी जातो आम्ही गेलो, तुम्ही गेला

परंतु हे शब्द तृतीया विभक्तीत असता त्याच्यावर **म्यां**—प्रमाणे अनुस्वार द्यावा:—मी ते काम केलें आम्ही केले तुम्ही पाहिले.

( ७ ) तू ह्या सर्वनामावर ( प्रथमा व तृतीया विभक्तीत ) अनुस्वार द्यावा:—तू आहेस, तूं केले

( ८ ) नपुसकलिंगी एकारान्त सर्वनामावर उभयवचनी अनुस्वार द्यावा:—हे, ही, जें, जी, तें, ती

( ९ ) **कांही** ह्या शब्दात फक्त का वर अनुस्वार द्यावा, हीवर देऊं नये.

## विभक्तिप्रत्यय

( १० ) द्वितीया व चतुर्थींच्या **ना** प्रत्ययावर अनुस्वार देऊ नये.

( ११ ) तृतीयेच्या **ने नी** या प्रत्ययावर अनुस्वार देऊ नये. **आं, एं, ईं, हीं, शीं** या प्रत्ययावर अनुस्वार द्यावा.

( १२ ) सप्तमीच्या **ईं, आं** ह्या प्रत्ययावर अनुस्वार द्यावा

## क्रियापदें

( १३ ) वर्तमान व भूतकाळात क्रियापदाच्या **प्रथमपुरुषी उभय वचनांच्या** अंती अनुस्वार द्यावा:—

मी—आम्ही करितों.        मी—आम्ही असतों

मी—आम्ही गेलो.        मी—आम्ही होतो.

( १४ ) भविष्यकाळात **प्रथमपुरुषी उभयवचनी** क्रियापदाच्या रूपाच्या अन्तावर अनुस्वार देऊ नये:-

आम्ही जाऊ.  मी-आम्ही ते काम करू का ?

( १५ ) क्रियापदाच्या **प्रथमपुरुषी** रीतिभूतकाळाच्या **उभयवचनी** रूपाच्या अन्तावर अनुस्वार द्यावा

मी करीं  आम्ही करूं

मी जात असें-जाईं  आम्ही जात असूं-जाऊं

( १६ ) क्रियापदाच्या **द्वितीयपुरुषी अनेकवचनी** वर्तमान, भूत, रीतिभूत ह्या काळाच्या रूपाच्या अन्तावर अनुस्वार द्यावा

तुम्हीं करितां-करां-करीत असां-गेलां.

( १७ ) लिंगानुसार बदलणारें क्रियापद नपुसकलिंगी असताना त्याच्या अन्तावर अनुस्वार द्यावा -मूल जातें-गेलें त्यानें काम केलें.

( १८ ) भावे प्रयोगात व भावकर्तरि प्रयोगात क्रियापदाच्या अन्तावर अनुस्वार द्यावा -

रामानें रावणास मारिलें.  मला फावलें.

( १९ ) प्रथमपुरुषी **नाहींवर** अनुस्वार द्यावा. द्वितीय व तृतीय पुरुषी **नाहीवर** अनुस्वार देऊ नये -मी-आम्ही तें काम करीत नाहीं. तूं नाहीस, तो नाही, ते नाही.

## अव्ययें

( २० ) अव्ययाच्या अन्तावर अनुस्वार देऊ नये -जेथे, तेथे एकदा, मागे, कधी, खाली, हळू, द्वारा, मुळे, प्रमाणे, पेक्षा, विषयी.

(२१) **तां** प्रत्ययान्त व ऊ प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययाच्या अन्तावर व **तांना** प्रत्ययान्ताच्या उपान्त्यावर अनुस्वार द्यावा —- बोलतां-जातां, देऊं-हसूं-रडूं (लागला), बोलतांना-जातांना.

## किरकोळ

( १ ) **राहणे, वाहणें, पाहणें** ही रूपें शुद्ध समजावी. वहाणें-वाहाणें, रहाणें-राहाणें, पहाणें-पाहाणें ही अशुद्ध रूपें होत.

( २ )**कोणता-एखादा** ही रूपे शुद्ध होत.

कोणचा-एकादा ,, अशुद्ध होत.

( ३ ) **हि** हें अव्यय ऱ्हस्व लिहावे परतु जेथे त्याचा **सुद्धा** असा अर्थ असेल तेथे तें दीर्घ लिहावें.

( ४ ) हि, च, ना ही अव्यये पूर्व शब्दाला जोडून लिहावी.

( ५ ) हळूहळू, मधूनमधून, मुळूमुळू, खुट्खुट् इत्यादि शब्दां वर अनुस्वार देऊ नये. शिवाय त्याचे दुसरे व चवथे स्वर ( समस्थानीय ) दीर्घ लिहावे

( ६ ) **सुरू** या अव्ययावर अनुस्वार नसावा **चालू** हा शब्द विशेषण असल्यास त्याच्यावर अनुस्वार नसावा ---चालू वर्ष.

( ७ ) **विनंती** शब्द दीर्घान्त लिहावा. **शीर** ह्या तद्भव शब्दातील उपान्त्य स्वर दीर्घ लिहावा **भीति** हा तत्सम शब्द इतर इकारान्त तत्सम शब्दाप्रमाणे चालववा.

८ षष्ठीचा **चा** प्रत्यय ज्याच्या अंती आहे असे शब्द, **आपला** हा शब्द व **णें** प्रत्ययान्त धातुसाधित नामे, याचे सामान्यरूप याकारान्त व एकारान्त करतात त्यापैकी **याकारान्त** रूप अधिक ग्राह्य होय -

**राजाच्या** हुकमाप्रमाणे, **आपल्या** गावाहून, **खाण्याच्या** पदार्थात, हीं **ग्राह्य रूपें** होत.

**राजाचे** हुकमाप्रमाणे, **आपले** गावाहून, **खाणेच्या** पदार्थात ही प्रचारात असली तरी **अग्राह्य रूपें** होत.

# [९]
# लेखनकला

लेखनाच्या पूर्वतयारीचे वर विवरण केलें आहे. परंतु लेखन ही एक कला आहे ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे वक्तृत्वाप्रमाणे लेखनकलेचा उपजत गुण अंगी असणे, ही ईश्वरदत्त देणगी होय. प्रतिभा ही ईश्वरी देणगी जरी माणसाला लाभलेली नसली, तरी अभ्यासाने कलेचे कामापुरते ज्ञान सामान्य माणसाला करून घेता येतें त्याने खटपट करून लेखनाची सामुग्री मात्र नीट गोळा केली पाहिजे.

कादंबरी, लघुकथा, नाटक, काव्य, निबंध कसे लिहावे, यासंबंधी चर्चा लेखनकलेवरील ग्रंथात केलेली असते या ठिकाणी आपणास फक्त निबंधलेखनाचाच विचार करावयाचा आहे.

तरुण लेखक लिहावयास बसला म्हणजे, 'काय लिहावे ?' हा प्रश्न त्याच्यापुढे उभा राहतो श्रवण व वाचन याच्या द्वारे त्याने पूर्वी जे ज्ञान मिळविले असेल, ती त्याची **सामुग्री** होय चांगले ग्रंथ वाचले किंवा विद्वानाची व्याख्याने ऐकली म्हणजे निरनिराळ्या विषयाचे आपणास ज्ञान होते **चांगले ग्रंथ हे आपले कायमचे गुरु होत.** त्याच्यापासून आपणाला उपदेश ग्रहण करता येतो. एवढेच नव्हे तर केव्हाहि अडचण पडली व आपण जे पूर्वी वाचलें ते आपणास बरोबर आठवत नसले, तर ते ग्रंथ पुन चाळून आपणास आपली स्मृति ताजीतवानी करता येईल. **वाचन नेहमी सावकाश करावें.** म्हणजे ग्रंथाचा सारांश लक्षात राहतो व ग्रंथकर्त्याची विषय प्रतिपादन करण्याची शैली मनात बिंबते. प्रत्येक नामांकित ग्रंथकाराची विशिष्ट लेखनशैली

असते. ती समजण्याकारिता ग्रंथ सावकाश वाचले पाहिजेत. घाईने ग्रंथ वाचला, तर सारांश कदाचित तात्पुरता ध्यानात राहील, परंतु ग्रंथकाराच्या **लेखनाची कुशलता, तर्कशास्त्रशुद्ध विवेचन, सुंदर शब्दांची व म्हणींची मधूनमधून पेरणी, उपमा व दृष्टान्तांनी विषय रंगविण्याची हातोटी, कथासंदर्भ देऊन आपला विषय वाचकांच्या मनावर बिंबविण्याची युक्ति,** याचे ज्ञान आपणास होणार नाही. या सर्व गोष्टींचा लेखनशैलीत अंतर्भाव होतो

लेखनातील विचाराला आत्म्याची उपमा दिली, तर लेखनशैली हे मानवी शरीर होय विचार म्हणजे पौष्टिक दूध व ज्या सुंदर चांदीच्या पेल्यात ते प्यावयास दिले असेल. तो पेला किंवा ती वाटी ही लेखनशैली होय 'एक नूर आदमी और दस नूर कपडा', या हिंदुस्थानी म्हणीप्रमाणे **लेखनशैलीमुळे विचारांचें सौंदर्य वाढतें.**

वाचकाने ग्रंथ वाचताना नेहमी न्यायाधीशाची वृत्ति ठेवावी. दोन्ही बाजूंचा नीट विचार करावा ग्रंथकाराचे म्हणणे लक्षात घ्यावेच, पण त्या प्रश्नाला दुसरी बाजू आहे काय, हा प्रश्न आपल्या मनाला करावा आणि नंतर निःपक्षपाती दृष्टीने ग्रंथकाराचें म्हणणें आपणास कितपत पटतें हे ठरवावे **वाचनानंतर चिंतन व मनन** यासाठी अवश्य आहेत आपल्या मनाने एकदा निर्णय दिला, म्हणजे वाचलेल्या ग्रंथाची लेखनद्वारा चर्चा करून पहावी. वाचनाने माणसाचे ज्ञान वाढतें, पण लेखनाने ते पक्कें होते.

# [ १० ]
# मिया मूठभर व दाढी हातभर

कोणत्याहि विषयावर लिहिण्यापूर्वी प्रथम मुद्दे काढावे नतर मुख्य मुद्दे कोणते व आनुषगिक कोणते, हे तारतम्याने ठरवावें. मुद्द्याचे हे वर्गीकरण अत्यत महत्त्वाचे आहे. नाहीपेक्षा लेख लिहिताना गौण मुद्द्यानीच लेखाची अर्धी अधिक जागा अडावयाची, आणि 'आठ हात लाकूड तर नऊ हात ढलपी' असा प्रकार व्हावयाचा. प्रतिपाद्य विषय बाजूला राहून प्रस्तावनेतच सर्व खर्च व्हावयाचा. नमनालाच घडाभर तेल जाळणारे हरदास-पुराणिक पुढे नाइलाजाने कथाकीर्तनाचा आख्यानाचा मुख्य भाग आखडता घेतात.

त्यामुळे विषयाचे प्रथम मुद्दे काढून **प्रत्येक मुद्दा एका स्वतंत्र परिच्छेदांत चर्चेस घ्यावा.** एका परिच्छेदात अनेक मुद्दे कोबू नये, किंवा एकाच मुद्द्यापायी दहापाच परिच्छेद खरडू नये. मुद्द्याचा अनुक्रम ठरविणे फार महत्त्वाचे आहे एका मुद्द्यातून दुसरा मुद्दा सहजगत्या निघाला, असे वाचकाना वाटले पाहिजे. याकरिता प्रत्येक परिच्छेदातील शेवटल्या वाक्यात, पुढल्या परिच्छेदात चर्चिल्या जाणाऱ्या मुद्द्याची किंचित् सूचना असावी

प्रत्येक परिच्छेदात, प्रथम मुद्दा स्पष्ट शब्दात माडावा प्रारभी एखाद्या कठिण शब्दाची व्याख्या द्यावी, किंवा फोड करून त्याचा अर्थ विस्ताराने द्यावा. नतर त्या मुद्द्याला पोषक असे दृष्टान्त द्यावे दृष्टान्त नेहमीच्या परिचयाचे असावेत. क्लिष्ट व वाकडे तिकडे असू नयेत. **परिच्छेदांतील वाक्यांत तर्कशुद्ध साखळी असावी.** म्हणजे एका वाक्यातून दुसरे वाक्य सहज निघाले, असे वाचकास वाटलें

पाहिजे. नाहीपेक्षा वाटेंत ठेच लागल्याप्रमाणें वाचक अडखळून तेथे थाबेल.

विषयाची प्रसंगी पुनरुक्ति करून, त्याचा वाचकाना कदापि विसर पडू देऊ नये. निबधाचा विषय वाचकाच्या नजरेसमोर सारखा खेळला पाहिजे. विषयाची पुनरुक्ति मोठ्या खुबीने केली पाहिजे, नाहीपेक्षा ती कंटाळवाणी होईल. गुणाकार किवा भागाकार शिकविताना अनुभवी शिक्षक, ज्याप्रमाणे निरनिराळी व्यवहारी उदाहरणें घालून मुलाना त्या विषयाची फोड करून देतो व त्याच्याकडून गुणाकार-भागाकाराची शेकडो उदाहरणें करून घेतो, तीच युक्ति लेखकानेहि या बाबतीत योजिली पाहिजे. निबधाच्या **प्रारंभींच्या परिच्छेदांत विषयाची व्याख्या द्यावी** व **अखेरच्या परिच्छेदांत विषयाचा उपसंहार करावा.** उपसंहार करताना आपलें म्हणणे साराशरूपाने स्पष्ट करावे

कठिण किवा **महत्त्वाच्या कल्पनांचा विस्तार करावा,** व सामान्य किवा **सोप्या कल्पना मोजक्या शब्दांत मांडाव्या.** आपला विषय, आपली विवेचनपद्धति व आपला निर्णय वाचकाना पटला पाहिजे, हे लेखकाने लक्षात ठेवावे मराठी भाषेचे वाक्प्रचार व म्हणी याचा पूर्वी अभ्यास केला असला, तर निबध चागला रगविता येतो **लेखनांत योग्य मराठी म्हणींची व वाक्प्रचारांची पेरणी मधूनमधून केल्याने लेखन परिणामकारक होतें.** कारण या म्हणीमधे लोकाचे अनुभव व लोकाना पटलेले सिद्धान्त, थोडक्यात सूत्ररूपाने ग्रथित केले असतात. तेव्हा या विषयाचा अभ्यास नेहमी करीत जावा.

# [ ११ ]
# अलंकार

निबधाची भाषा अलंकारानी नटविता येते, म्हणी व वाक्प्रचार यानी सजविता येते, आणि कविताचे उतारे व सुभाषितें यानी रगविता येते. प्रत्येक नामाकित लेखकाची विशिष्ट प्रकारची **लेखनशैली** असते. लेखनशैली याच गोष्टीवर पुष्कळ अशी अवलबून असते. नामाकित लेखकाच्या निबधाचा बारकाईने अभ्यास केल्यास, तुम्हालाहि अलकार कोठे व कोणत्या प्रमाणात घालावे हे कळू लागेल साधे पण अन्वर्थक शब्द, सरळ सोपी वाक्ये व तर्कशुद्ध माडणी. याच्यामुळे भाषा जोरदार होते खरी परतु अलकारानी तिला सौदर्य प्राप्त होते

एखाद्या बाईने अलंकार फार घातले तर ती जशी बेढब दिसते, तीच गोष्ट भाषासुदरीलाहि लागू आहे भाषेत अलकार असले तरी ते बेताचे असावेत आपण जे लिहूं त्याचा अर्थ केवळ वाचकाना समजून भागणार नाही, तर ज्या वत्सल, करुणरसात्मक, दु:खद, स्फूर्तिदायक, वीर्यशाली, भयप्रद अथवा रोमाचकारी प्रसगाचे आपण आपल्या लिखाणात वर्णन करू, त्याना अनुरूप अशा करुण-क्रोध--आनद--वीर्यादि भावना वाचकाच्या मनात आपले लिखाण वाचून उचबळल्या पाहिजेत, अशी महत्त्वाकाक्षा लेखकाने बाळगणे वाईट नाही प्रयत्नाने काय साध्य होत नाही? **'प्रयत्नें वाळूचे कण रगडितां तेलहि गळे'**

अलकाराचे दोन भाग पडतात, **शब्दालंकार** व **अर्थालंकार.** शब्दालकाराचा काव्यात उपयोग करतात, गद्यात सहसा करीत नाही. काव्यात देखील शब्दालकाराना कोणी फारशी किमत देत

नाही. अर्थालंकारांचेंच काव्यातहि महत्त्व मानलें जातें. कारण शब्दालंकारामुळे भाषा कृत्रिम बनते. **अनुप्रास** (तोच तो शब्द किंवा तेंच तें अक्षर वाक्यात अनेक वेळा येणे) व **यमक** (कवितेच्या चरणातील शेवटली अक्षरे एकसारखी असणे) हे मुख्य शब्दालंकार होत. श्री० **राम गणेश गडकरी** (कवि **गोविंदाग्रज**) याच्या नाटकातील, विशेषत: **प्रेमसंन्यास** व **राजसंन्यास**मधील भाषा अतिशय अनुप्रासयुक्त आहे व त्यामुळे ती बरीच क्लिष्ट व कृत्रिम बनली आहे, आणि तिचे स्वभावसौंदर्य त्यामुळे साहजिक लोपले **शब्दालंकाराचा गद्य लिहितांना तरी हव्यास न धरणें इष्ट होय.** क्वचित् एखाद्या स्थली अर्थानुरूप नाद करणारा उचित शब्द आढळला म्हणजे तो वाचून मनाला गुद्‌गुल्या होतात, यात शंका नाही. 'रामाने गोविंदाला शिव्या दिल्या, तेव्हा गोविंदाने संतापून उलट रामाला **जोड्याने** मारले' जोडा हा ग्राम्य शब्द असूनहि येथे कानाला बरा वाटतो. परंतु **जोड्यानें** याऐवजी '**उपानहाने** मारले', असा शब्दप्रयोग खात्रीने कानाला कटु भासेल. उपानह व जोडा या शब्दाचा अर्थ एकच, पहिला संस्कृत तर दुसरा मराठी, पहिला ललित व दुसरा जड! तेव्हा ललित, मधुर, संस्कृत शब्द वापरून वाक्य नेहमीच सुंदर होतें, असे नाही. **शब्द अर्थानुरूप नादकारी असावे.**

अर्थालंकारात **उपमा** हा मुख्य अलंकार होय. 'तानाजी फार शूर होता' या वाक्यापेक्षा 'तानाजी **सिंहासारखा** शूर होता', हे वाक्य मनाला अधिक रुचते व पटते **गड आला, पण सिंह गेला**, ह्या शिवाजीमहाराजाच्या तोंडच्या वाक्यात, तानाजी हाच सिंह असे **रूपक** साधलें आहे. तानाजी लढत असताना **जणूं** दुसरा **कृतान्त** भासला! हें **उत्प्रेक्षा** अलंकाराचे उदाहरण होय.

**लेकी बोले, सुने लागे** या प्रकाराला **अन्योक्ति** असें म्हणतात. कचेरीतील कारकुनाचें वर्णन वाचताना जर खालील वाक्य आढळले, तर ती अन्योक्ति ठरेल – ‘गाढवाच्या पाठीवर कितीहि गोण्या लादल्या तरी ती सहसा कुरकुरत नाहीत’ ‘मी श्रीमत झालो तर चोर माझ्या घरी चोरी करतील, या भीतीने द्रव्यसपादण्याचा प्रयत्न माणसाने कधीच करू नये का? पुढेमागे आग लागेल म्हणून शाहण्या माणसाने राहण्याकरिता घर बाधू नये, असा उपदेश कितपत समजसपणाचा ठरेल?’ यात **दृष्टान्त** व **प्रश्नालंकार** दोन्ही साधले आहेत ‘तो वाऱ्यापेक्षाहि जलद पळाला’, हे **अतिशयोक्तीचें** उदाहरण होय अलकाराची भाषेत अतिशयोक्ति मात्र होऊ देऊ नये

विद्यार्थ्यांनी श्री० वा गो आपटे किंवा श्री० वि वा. भिडे याची म्हणी व वाक्प्रचाराची पुस्तके मधूनमधून चाळली, व काही इंग्रजी-मराठी-सस्कृत सुभाषिते फुरसतीने पाठ करून ठेवलीं, तर निबध लिहिताना त्याना त्याचा प्रसगविशेषी उपयोग करून भाषा रगविता येईल. पण अभ्यास व पूर्वपरिश्रम केले असले, तरची ही गोष्ट!

## [ १२ ]

## निबंधांचे तीन मुख्य प्रकार

### ( १ ) वर्णनपर निबंध

पाहिलेल्या व्यक्तीचे, स्थलाचे, वस्तूंचे किंवा अनुभवलेल्या प्रसगाचें, पाल्हाळ न करता, पण सविस्तर व चटकदार वर्णन करणे.

हे निबध लिहावयास फारसे कठिण नसतात. मुलाना आरभी हेच निबध लिहावयास देतात हे निबध चागले लिहिता आले, तरच इतर प्रकारचे निबध चागले लिहिता येतील. या निबधाचीं

**निरीक्षण** व **मांडणी** ही दोन प्रमुख अंगें होत. वर्ण्य विषयाचें निरीक्षण बारकाईने करावें

विषयाची माडणी करताना खालील गोष्टी लक्षात ठेवाव्या:—

(अ) सामान्य गुण प्रथम थोडक्यात वर्णन करावे. विशेष गुण नतर विस्ताराने सागावे.

(आ) बारीक सारीक गोष्टींचे वर्णन करू नये. त्यामुळे निबध पाल्हाळिक व कटाळवाणा होणार नाही. निवडक गोष्टींचेच वर्णन केलें म्हणजे निबंध मनोरजक होतो.

(इ) भाषा विषयानुरूप असावी. ताजमहालाचे वर्णन सुदर व ललित शब्दानी करावे, युद्धाचे वर्णन कठोर व रूक्ष शब्दानी केले तर चालेल.

(ई) वर्णन प्रमाणशीर असावे. दूरच्या भागाचे प्रथम वर्णन करून नतर जवळच्या भागाचे वर्णन करावे.

(उ) माणसाला दोन हात, दोन पाय, दोन डोळे असतात, किंवा त्या वाड्याला इतक्या खुर्च्या व खिडक्या होत्या, अशी सागोपाग माहिती देत बसून निबंधाची जागा अडवू नये.

वर्णनाचे विषय —शहर, यात्रा, किल्ले, उत्सव, समारभ, खेळ, बाग, शाळा, प्राणिसग्रहालये, कोर्टकचेऱ्या, इमारती, स्वतःचे राहतें घर, पशुपक्षी, वनस्पती, कारखाने, यंत्र, प्रवास, सृष्टिचमत्कार, कला इत्यादि

## कांही वर्णनात्मक निबंधांचे आराखडे

(१) **कापूस**—कोठे पिकतो ? पिकास लागणारी जमीन व हवामान रोपट्याचे वर्णन कापूस केव्हा व कसा तयार होतो ? कापसाचा कपडा कसा तयार करतात ?

सरकी काढणें, सूत कातणें, विणणें या क्रिया. कापसाचा मनुष्यांना उपयोग.

( २ ) **आंबा**—झाडाचें वर्णन. आंब्याच्या जाती—रायवळ व कलमी, कलम कसे बांधतात? फळाचें वर्णन व स्वाद, उपयोग, उत्पन्न, आंबे कोठें होतात? आवश्यक हवामान. पोर्तुगीज लोकांचें स्मारक—

( ३ ) **दगडी कोळसा**—वर्णन, खाणीतून कसा निघतो, महत्त्व, लोखंड व कोळसा याचा संबंध, कोळसा व आधुनिक यांत्रिक सुधारणा, इंग्लंडचें वैभव

( ४ ) **उंट**—वर्णन, पाण्याशिवाय पंधरा-वीस दिवस जगण्याची शक्ति, वाळवंटी प्रदेशांत उपयुक्तता, वाहतुकीचें साधन, ऐतिहासिक काळांतील सांडणीस्वार.

( ५ ) **मोर**—वर्णन, पाय व पिसारा, सरस्वतीचें वाहन व पवित्रता, उपयुक्तता, स्वभाव व सवयी, कवींचा आवडता वर्ण्य विषय

( ६ ) **डांस**—गटारांतील व डबक्यांतील कीटक, उत्पत्ति, जन्माच्या चार अवस्था, डांस व मलेरिया, तापाची साथ, ती परिहार करण्याचे उपाय.

( ७ ) **दसरा**—नवरात्राचा शेवटचा दिवस, आश्विन शुद्ध १०, पौराणिक कथा—रामरावणयुद्ध, मराठेशाहींतील सीमोल्लंघन, सरस्वतीपूजन-हत्यारपूजा, सोनें लुटून आणणे व आप्तेष्टांना वाटणे, साडेतीन मुहूर्तांपैकीं मुख्य मुहूर्त.

( ८ ) **आट्यापाट्या**—खेळाचें महत्त्व, नियम, खेळाडूच्या आंगचे गुण, बिन खर्चाचा खेळ, व्यायाम, संघव्यायाम, शारीरिक व नैतिक फायदा.

(९) **यात्रा**—हेतु, सामान, प्रवासाची साधने—आगगाडी, आगबोट, मोटार प्रवासातील अनुभव व परमुलखातील चालीरीती, तीर्थाचें वर्णन, देवळाचें वर्णन, फायदा.

(१०) **शहर**—नाव, आख्यायिका, स्थलनिश्चिती, स्वाभाविक मर्यादा, हवापाणी, शहराची मांडणी, प्रमुख पेठा, प्रेक्षणीय इमारती. लोकाचे आचार-विचार, भाषा, धंदे व कारखाने.

(११) **किल्ला**—स्थलनिर्देश, ऐतिहासिक माहिती, आख्यायिका, वर्णन, भोवतालचा प्रदेश, वर्तमानकालीन स्थिति, सामाजिक व राजकीय महत्त्व, मनात आलेले विचार

(१२) **कारखाना**—वर्णन, इतिहास, सामग्री, कच्चा माल, कृति, गुणधर्म, उपयोग, नफातोटा, व्यापार, देशाची भरभराट.

(१३) **सृष्टि-चमत्कार**—व्याख्या, उत्पत्ति, कारणे, शास्त्रीय मीमांसा, देखाव्याचे सामान्य वर्णन, स्थित्यंतर, फायदे व तोटे, लोकभ्रम, ईश्वरी क्षोभ.

(१४) **शाळा**—नाव, शिक्षण, शिक्षक, नावाजलेले विद्यार्थी, पूर्वइतिहास, संस्थेची वाढ, आजचे स्वरूप, इमारत, बाग, खेळाचें मैदान. प्रयोगशाळा, आखाडा.

(१५) **कला**—उत्पत्ति कोठे झाली, इतिहास, प्रसार, सुधारणा, वाढ, यापुढील ध्येय, मानवजातीचा फायदा, ज्ञान व कला.

खालील विषयावर वर्णनात्मक निबंध लिहाः—

१ दिल्ली, काशी, नागपूर, मुंबई, जबलपूर.

२ शालागृह, महाराजबाग, अजबबंगला, अंबाझरीचा तलाव.

३ घोडा, गोमाता, मधमाशी, कुत्रा, पोपट.

४ लिंबू, सत्रें, गुलाब, गहू, तादूळ, ताडीचें झाड, चिंच.

५ ज्वालामुखी, धरणीकंप, वादळ, पाऊस, समुद्र, हिवाळा.

६ फुटबाल, खोखो, हुतुतु, क्रिकेट

७ कापडाची गिरणी. सिमेंटचा कारखाना, कोळशाची खाण, मॅंगनीझ.

८ दिवाळी, गुढीपाडवा, नाताळ, कृष्णजन्म.

९ सर्कस, सिनेमा, नाटक, जादूचे खेळ.

१० फोनोग्राफ, शिवण्याचें यंत्र, स्टोव्ह, बिनतारी तारायंत्र, विजेचा दिवा

११ छापण्याची कला, कोलंबसाचा प्रवास, गायनकला.

१२ ताजमहाल, गोल घुमट, रामटेक, भेडा घाट, नर्मदा नदी.

१३ तुमच्या घरातील तान्हे मूल, तुमचं आवडते पुस्तक, तुमचा आवडता खेळ, सुंदर चित्र, भाजी बाजार, दंडार यात्रा, चांदणी रात्र, कुस्तीची दंगल, आग, पावसाळ्यातील संध्याकाळ

## [ १३ ]

## दुसरा प्रकार

## कथनपर निबंध

कथा किंवा गोष्ट सांगणे, हे या निबंधाचे मुख्य स्वरूप होय. या भागात खालील पोटभाग पडतात—

( १ ) **ऐतिहासिक अथवा अर्वाचीन काळांतील थोर व्यक्तींचीं चरित्रें**— अहिल्याबाई, अशोक, अकबर, बाजीराव पेशवे, शिवाजीमहाराज, विष्णुशास्त्री

चिपळूणकर, दयानद सरस्वती, आगरकर, कोल्हापूरचे शाहू छत्रपति, राणी लक्ष्मीबाई, नामदार गोखले, महाराणी विक्टोरिया, हरिभाऊ आपटे, रामदास स्वामी, तुकाराममहाराज, किर्लोस्कर.

( २ ) **पौराणिक** अथवा **ऐतिहासिक** अथवा **सामाजिक** अथवा **उपदेशपर कथा**—वाचलेल्या किंवा ऐकलेल्या कथा थोडक्यात सगतवार सागणें. कथेचा प्रथम साराश काढावा व मग तो थोडक्यात नीट व्यवस्थित माडावा.

उदाहरणं—अभिमन्युवध, गड आला पण सिंह गेला, नागपूरचा पहिला प्लेग, गजेंद्रमोक्ष, विद्यार्थिदशेतील अनुभव, पानिपतची लढाई, शाळेचे समेलन, तुम्ही सुट्टी कशी घालविली, तुम्ही केलेली यात्रा, उत्तर ध्रुवाचा शोध, गावजेवण, तुमच्या मित्राच्या विवाहप्रसगाची हकीगत, कोल्ह्याचे चातुर्य, तुम्ही पाहिलेला खेळाचा सामना

या दोन्ही प्रकारच्या निबधात कथासूत्र प्रारंभापासून अखेरपर्यंत कायम असतें, म्हणूनच त्यास कथनपर निबध म्हणतात बाकी वस्तु, व्यक्ति, प्रसग व व्यक्तीचे कार्य, याचे वर्णन या निबधात करावेच लागते. एरवी कथा चटकदार वठणार नाही.

( ३ ) **काल्पनिक कथा**—तुमच्या चातुर्याची चागलीच परीक्षा या प्रकारच्या निबधात होईल. तुम्हाला आपल्या कल्पनेवर चागली भिस्त ठेवली पाहिजे. उदाहरणें:—

एका रुपयाचे आत्मवृत्त, मी राजा झालों तर, चंद्रावरील स्वारी, माझे स्वप्न, आदर्श खेडेगाव, म्हाताऱ्या घोड्याची कैफियत,

टांचणीने सांगितलेली गोष्ट, वहाण कुरकुर काय बोलते ? कावळ्याची कावकाव.

**काल्पनिक निबंध कधी कथापद्धतीने तर कधी संवाद-पद्धतीने लिहून पहावे.** परीक्षेंत मात्र मुद्दाम तसें स्पष्ट सांगितल्याशिवाय संवादात्मक निबंध लिहूं नये.

## कांही आराखडे

१ **चरित्र**—कुलवृत्तान्त, मातापिता, जन्म, शिक्षण, मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात, कौटुंबिक माहिती, पराक्रम, जीवितकार्य, मृत्यु, स्वभाव, चरित्राचें महत्त्व, चरित्रापासून घ्यावयाचा बोध.

२ (अ) **तुम्हीं सुट्टी कशी घालविली?**—सुट्टी कधी लागली, कशाबद्दल, काय विचार केला ? मार्गांतील अडचणी, त्या कशा दूर झाल्या ? तुमचें ध्येय कितपत साधलें, आलेले कांहीं मनोरंजक अनुभव व त्यांमुळें लाभलेलें ज्ञान, हातून झालेल्या चुका, घेतलेला धडा.

(आ) **मित्राचें लग्न**—लग्न कोठें झालें, प्रवासवर्णन, व्याह्यांची माहिती, वधूचें वर्णन, भोजनसमारंभ, रुसणीं-फुगणीं, मिरवणूक, मित्राचा स्वभाव, थट्टामस्करी.

(इ) **शाळेचें संमेलन**—चिटणिसाची निवडणूक, सन्मान्य अध्यक्षांची निवड, त्यांचें भाषण, बक्षिससमारंभ, बैठे खेळ व मैदानी खेळ, नाटक, चहापार्टी, सहभोजन, भांडणें व त्यांचें निरसन, संमेलनाचा मूळ हेतु, तो कितपत पार पडला ?

३ (अ) **एका रुपयाचें आत्मवृत्त**—जन्मापूर्वीचे क्लेश, टाकसाळीतून बॅंकेंत, तेथून मारवाडी दुकानदाराकडे, तेथून एका सुदर मुलीकडे, चिक्कणमामाच्या घरचा बंदिवास, कॉलेज विद्यार्थ्याची बेपर्वाई, खिशातून साडलो भिकाऱ्याला सापडलों, मळकट चिंध्यातील राहणी.

(आ) **चंद्रावरील स्वारी**—प्रवासाची तयारी, अपूर्व विमान, गुरुत्वाकर्षण नष्ट झाले, चद्रलोकातील विलक्षण थंडी, निर्मनुष्य व उजाड प्रदेश, विझलेले ज्वालामुखी, ओसाड मैदाने व कोरडे समुद्र, अगात आलेली विलक्षण शक्ति, २५ फूट उच उडी, पण खायला अन्न नाही.

(इ) **म्हातारा घोडा**—पूर्व आयुष्यातील मजा, शर्यत जिकली तेव्हाचे वैभव, आजची स्थिति, तुलना.

**मुलगा**—तेव्हा तुझी किंमत काय होती ?

**म्हातारा घोडा**—तेव्हा दहावीस हजारानी माझी किमत करीत. पण आता मला कोणी ५ रुपयाला देखील विकत घेणार नाही.

**मुलगा**—तुझ्या आयुष्याचें परिवर्तन कसे कसे झाले ?

**म्हातारा घोडा**—मालकाच्या खाशा स्वारीचा घोडा, नतर घरगुती, सुदर टाग्याचे जोखड वाहणारा, नतर भाड्याच्या टागेवाल्याजवळची दुस्सह राहणी, हल्लीचे कटाळवाणें जीवन.

**मुलगा**—हल्ली तुझ्यावर मालकी कोणाची ?

**म्हातारा घोडा**—कोणाचीच नाही. पण हें स्वातत्र्य काय कामाचें ? पोटाची पचाईत पडते. निवाऱ्याला ठिकाण नाही.

**मुलगा**—तुला पेन्शन देत नाही का ?

**म्हातारा घोडा**—सध्या तरी पेन्शनीचा कायदा फक्त माणसाना लागू आहे, घोड्याना तो लागू नाही.

**मुलगा**—मी मोठा झाल्यावर कायदेमडळाचा सभासद होईन आणि जनावरानाहि त्याच्या कामगिरीबद्दल म्हातारपणी बैठे पेन्शन द्यावें, असा ठराव तेथे पास करून घेईन.

**म्हातारा घोडा**—बाळ, सर्व म्हातारीकोतारी जनावरे तुला त्याबद्दल आशीर्वाद देतील.

## [ १४ ]

## निबंधांचा तिसरा प्रकार

## विवेचनपर निबंध

निबधलेखनाची ही शेवटची पायरी होय. मुले मोठी झाली म्हणजे त्याना असलेच निबध लिहावयास देतात. वर्णनपर निबध लिहिताना पदार्थाचे निरीक्षण बारकाईने केले म्हणजे काम भागते कथनपर निबधात वाचलेल्या कथेचा किंवा चरित्राचा साराश चागला आठवून सगतवार माडता आला, म्हणजे पुरतें परतु हे निबध लिहिताना एवढ्यानेच केवळ भागत नाही. निरीक्षण व वाचन याच्या जोडीला **चिंतन व मनन यांचें साहाय्य घ्यावें लागतें** दोन्ही बाजूचा नीट विचार करून त्या विषयाची सागोपाग चर्चा करावी लागते. कधी एखाद्या हुषार वकिलाप्रमाणे दुसऱ्या पक्षाची टर उडवून आपल्या पक्षाचे समर्थन करावे लागते. तर दुसऱ्या वेळी न्यायाधिशाची भूमिका स्वीकारून दोन्ही बाजूचा निःपक्षपाती दृष्टीने विचार करून न्याय करावा लागतो व निवाडा द्यावा लागतो.

असा निबंध लिहिताना—-

( १ ) प्रथम सिद्धान्त माडून त्याचें स्पष्टीकरण करावें—**विषय-प्रवेश, विषयोपन्यास.**

( २ ) विषयाचा अर्थ स्पष्ट करण्याकरिता एखादी गोष्ट सागावी, किवा एखादा दृष्टान्त द्यावा, व उदाहरणें सागावी.

( ३ ) विषयांत विरोधाभास किवा विरोध असल्यास, तो स्पष्टपणें माडावा

( ४ ) विषयाच्या अनेक बाजूचें दिग्दर्शन करून, आपणास जी महत्त्वाची बाजू वाटते तिच्या विवेचनावर जोर द्यावा.

( ५ ) स्वत ला आवडणारी अशी, त्या विषयाची सर्वसामान्य व्याख्याहून निराळी व्याख्या करावी.

( ६ ) **उपसंहार** करताना थोडक्यात **सिंहावलोकन** करावे. आपल्याला पोषक असे दुसऱ्या ग्रथातील उतारे द्यावे किवा योग्य त्या कवितांच्या ओळी उद्धृत कराव्या. हे निबध लिहिताना **विषयांतर होणार नाही अशी खबरदारी** घ्यावी. नाहीपेक्षा निबधात विस्तारलेला पसारा आपल्याला आवरता येणार नाही. **तुलना व विरोध** याचा योग्य उपयोग केल्याने हा निबध रंगतो. निबधाचें विवरण तर्कशुद्ध असावें.

## कांही आराखडे

( अ ) **म्हणी** किंवा **वाकप्रचार** किवा **सुभाषितें**—स्वरूप—सूत्रबद्ध ज्ञान, म्हणी कशा बनतात, त्यांचा प्रसार कसा होतो, त्या लोकाना पटकन् कां पटतात ? म्हणींचे प्रकार—पुरुषी म्हणी व बायकी म्हणी, धंद्यांमुळे प्रचारांत आलेल्या म्हणी, म्हणी व जातिभेद. व्यावहारिक व

पारमार्थिक म्हणी. त्याचा भाषेंत उपयोग. त्यांचें महत्त्व.

( आ ) **इतिहास**—व्याख्या, ऐतिहासिक चरित्रें व राजकारण याचा मिलाफ, सामाजिक परिस्थितीचें दिग्दर्शन, इतिहासाविषयी लोकाची अनास्था, सत्य व इतिहास याचा सबध, लेखकाचा चष्मा, इतिहासाची व्यापक व्याख्या, इतिहासाचा बोध.

( इ ) **ग्रंथ, मासिकें व वर्तमानपत्रें**—उतरत्या प्रमाणात आयुष्य कमी पण चटकदारपणा वाढता, तत्कालीन महत्त्वाचें लिखाण व चिरजीव लिखाण, मासिके हा मधला दुवा, ज्ञानप्रसार, लोकशिक्षणाचें साधन, भाषेची वाढ, कलाचा परिपोष, वर्तमानपत्राचे वैशिष्टय—राजकारण, मतप्रचार, साक्षरता, लोकजागृति.

( ई ) **ज्ञानाचा पराक्रम**—रानटी समाज व सुधारलेला समाज, शास्त्रीय शोध, वाहतुकीची साधने, जग लहान झाले, विश्वबधुत्वाचा उदय, माणसाच्या शक्तीची वाढ व त्याला मिळालेली फुरसत.

( उ ) **सहकारी पतपेढी**—काटकसर, द्रव्यसग्रह करण्याची जागा, लोकाची गरज भागविणें, अडीअडचणीला मदत, सावकाराचा जुलूम, बधुभाव, सहकार्याचे फायदे

( ऊ ) **विमा**—आयुष्याची क्षणभगुरता, कर्ता मनुष्य गेला म्हणजे त्याच्या ससाराची होणारी धुळधाण, आजचे बेकारयुग, म्हातारपणाची तरतूद, विम्याचे प्रकार, सक्तीची शिल्लक, काटकसरीची सवय.

( ए ) **दुष्काळ**—शेतीवर अवलबून राहणारे देश, पावसाचा अनिश्चितपणा, दुष्काळातील लोकाचे हाल, वाहतुकीची

साधनें, सार्वजनिक कल्याणाची बाधकामें सुरू करणें, वैयक्तिक दानधर्म, बी-बियाण्याचा फुकट पुरवठा, सारा-माफी किंवा तहकुबी देणें, दुष्काळानंतर.

(ऐ) **धंद्याची निवड**—आपली आवड, आपला अभ्यास, आपल्या सवयी, जातिभेदाची जुनी कल्पना आज मोडली, प्रकृति व धंदा, भांडवलाची अनुकूलता, प्रामाणिकपणा, चिकाटी व उद्योग.

(ओ) **स्त्रीशिक्षण**—समाजाची दोन प्रमुख अंगे-स्त्री व पुरुष, रथाची दोन चाकें, पत्नी ही पतीची सहचरी असते, संसारातील भागीदारी, स्त्रियांचे विशेष गुण, त्यांना अनुरूप शिक्षण, बालसंगोपन व मुलांचें शिक्षण, प्राचीन काळातील विद्वान् स्त्रिया, जिच्या हाती पाळण्याची दोरी ती जगाला उद्धारी.

(औ) **अस्पृश्यता**—हिंदुधर्माला कलंक, देऊळ कसें बाटते ? देव अपवित्र आहे काय ? मुसलमान व ख्रिस्ती हे पर-धर्मी पण त्यांचा विटाळ नाही, घोर अन्याय, सार्व-जनिक जागा व विटाळ, अस्पृश्य समाजाची काम-गिरी व थोरवी, उच्च वर्णीय हिंदूंचे कर्तव्य

(अं) **जातिभेद**—धंद्यावरून जाती पडल्या, धर्म व रूढी, काल्पनिक उच्चनीचत्व, राष्ट्राची छकलें, राष्ट्रीय भावनेस विरोध, रोटीबंद व बेटीबंद. जातिभेद नष्ट कसा करता येईल ?

(अः) **शहरांतील व खेड्यांतील राहणी**—कृत्रिम व स्वाभाविक, बौद्धिक साधनें व निसर्गसौंदर्य, महागाई

व स्वस्ताई, कोंदट व स्वच्छ वातावरण, बडेजाव व गरिबाशीं मैत्री, पुस्तकी ज्ञान व अनुभवी ज्ञान.

( क ) **शाळेंत धार्मिक शिक्षण दिलें जावें का?**—बौद्धिक व शारीरिक शिक्षणाची सोय, नीतिशिक्षणाची सोय, धर्माचा पाया नसला तर नीतिशिक्षण कितपत शक्य आहे? अडचणी, नाना पथ व धर्म, तडजोड.

( ख ) **शीलं परं भूषणम्**—शीलाचें महत्त्व, इतर अलंकार, सपत्ति, विद्या व शील याची तुलना, समाजात शीलवताचा होणारा सन्मान, शीलात मोडणारे सद्गुण, धर्म, रामचद्र, शिवाजी, अहिल्याबाई ही उदाहरणें.

( ग ) **स्वच्छता**—आरोग्य, अस्वच्छतेने रोगाची साथ पसरते, रोगजतूंची वाढ, खाणेपिणें, कपडेलत्ते, राहणी, सवयी

खाली दिलेल्या विषयावर निबध लिहा·—

( १ ) प्रामाणिकपणा, आरोग्य, शौर्य, मैत्री, व्यवहारचातुर्य, स्वावलंबन, स्वाभिमान, स्वदेशाभिमान, राजनिष्ठा, आज्ञाधारकपणा, व्यायाम, प्रसगावधान, आत्मसयमन.

( २ ) मोफत वाचनालयें, रेलवे, पोस्ट, कालवे, खानेसुमारी, दवाखाने, म्युनिसिपालिट्या, विमानें, जलपर्यटन, सघव्यायाम व खेळ, कायदेमंडळे, ग्रामपचायती.

( ३ ) संहति· कार्यसाधिका, मुलाचे पाय पाळण्यात दिसतात, लहानपण देगा देवा—मुगी साखरेचा रवा, मरावें परी कीर्तिरूपे उरावें, प्रयत्नाती परमेश्वर, जैसा बोले तैसा चाले त्याची वदावी पाउलें, निस्पृहस्य तृण जगत्,

पाचामुखी परमेश्वर, टाकीचे घाव सोसल्याशिवाय देवपण अंगी येत नाही.

(४) औद्योगिक शिक्षण, लष्करी शिक्षण, नागरिकाचें कर्तव्य, शेती-सुधारणा, प्रदर्शनापासून फायदे, छापण्याची कला, चलनी नाणी, जाहिराती, वेळेचा सदुपयोग, मनोराज्य, परीक्षापद्धति, पोषाख, विद्यार्थ्यांचा ऱ्हास, हिंदूंचा अधःपात.

(५) बालविवाहाची इष्टानिष्टता, देहान्त शिक्षा, युद्धाची आवश्यकता जगात कितपत आहे? लेखनस्वातंत्र्य मर्यादित असावें का? निसर्ग व उद्यान, कादंबरीवाचन, मराठीचा अभ्यास करताना संस्कृत भाषेला कितपत टाळता येईल?

## [१५]
## पत्रव्यवहार

(१) आरंभी **श्री** किंवा **कुशल** किंवा **श्रीगजाननप्रसन्न,** अगर **ॐ ब्रह्म** असें पत्राच्या मध्यभागी वर लिहावें.

(२) पत्राच्या उजवीकडच्या वरच्या कोपऱ्यात आपला पत्ता व गावाचें नाव लिहावे त्याखाली पत्रलेखनाची तारीख लिहावी पंचागाप्रमाणे मिति लिहिली तरी चालेल

(३) आरंभीचा मायना. पत्राच्या डावीकडून लेखनास आरंभ करावा.

(अ) **वडिलांस**—तीर्थरूप वडिलाचे सेवेशी कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार, विनंती विशेष.

(आ) **इतर वडील आप्तांस**—तीर्थस्वरूप राजमान्य राजेश्री

( नाव ) यांचे सेवेशीं कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार, विनंती विशेष.

( इ ) **अपरिचित बरोबरीच्या इसमास**—रा. रा..... .... ....( नाव ) याशी, कृ. सा न. वि. विशेष.

( ई ) बरोबरीच्या **परिचितांस**—कृ. सा. न. वि. विशेष.

( उ ) **लहानांस**—चिरंजीव राजेश्री.... ... ( नाव ) यास अनेक आशीर्वाद विशेष

( ऊ ) **लहान नातलगास**—चिरंजीव ... ( नाव ) यास सप्रेम आशीर्वाद विशेष

( ए ) **वरिष्ठ अधिकाऱ्यास अर्ज**—मेहेरबान डेप्युटी कमिशनरसाहेब जिल्हा वर्धा याचे हुजुरास.—
विनंती-अर्ज असा की,

( ४ ) नंतर विषयवार परिच्छेद पाडून मजकूर लिहावा. पत्र-लेखनाची भाषा **सोपी व घरगुती** स्वरूपाची असावी. पत्रात आपले म्हणणे थोडक्यात पण स्पष्टपणे मांडावे. नातलगाना पत्रे लिहिताना आपलेपणाची भावना लेखनात प्रगट झाली पाहिजे. आपण काय केले, काय पाहिले, आपली प्रकृति, आपला अभ्यास, आपली राहणी, आपण आपला वेळ कसा खर्च करतो, ही सर्व माहिती नातलगाना व मित्राना मोकळेपणाने लिहावी. पत्र वाचून अर्धी भेट झाल्याचे समाधान आपल्या इष्टमित्राना लाभले पाहिजे अपरिचिताना किंवा साधारण ओळखीच्या इसमाना पत्र लिहिताना पाल्हाळ टाळावा, सरळ मुद्द्याशी गाठ घालावी.

आपल्या इष्टमित्राना आपल्या खाजगी आयुष्याचें कौतुक वाटत असलें, तरी इतरे जनाना त्याची पर्वा का वाटावी ? त्याना आपला खासगी वृत्तान्त कटाळवाणाच वाटेल, नातलगाना मात्र पत्रातील तोच भाग मनोरजक भासेल.

एखाद्यापाशीं काही मागणी करावयाची असल्यास नम्रतेने पत्र लिहावे, तरच आपली विनती मान्य होण्याचा संभव ! स्वाभिमान मात्र कदापि सोडू नये, व दुसऱ्याची खोटी स्तुति करू नये भरमसाट वचनेहि कोणाला देऊ नये

आप्तेष्टाच्या पत्रातील भाषा **प्रेमळ** तर अपरिचिताना लिहिलेल्या पत्राची भाषा **व्यावहारिक** असावी आप्तेष्टाना लिहावयाचे पत्र प्रसगी लाबलचक व खुलासेवार आणि त्यामुळे थोडे पाल्हाळिक झालें तरी चालेल. व्यावहारिक पत्र मात्र थोडक्यात पण मुद्देसूद व सरळ असावे.

( ५ ) पत्राचा शेवट, ज्याला पत्र लिहिले असेल त्याच्या योग्यतेनुरूप करावा उदाहरणार्थ·—

( अ ) **वडिलांस**—कळावे, सेवेशी श्रुत होय ही विज्ञापना. आपला

( आ ) **बरोबरच्यांना**—कळावे, लोभ असावा ही विनती. आपला

( इ ) **लहानांस**—कळावें, हे आशीर्वाद तुझा

( ई ) **सरकारी अर्ज**—मेहेरबानास जाहीर व्हावे ही विनती. आपला नम्र सेवक

( ६ ) पत्राच्याखाली आपली सही करावी नातलगाना लिहिलेल्या पत्रात सहीऐवजी, त्याना परिचित असें आपलें टोपणनांव लिहिलें तरी चालेल.

( ७ ) पत्रावरील पत्ता नीट, सुबक, व्यवस्थित व उतरता असावा

( पहिली ओळ ) — — (सपूर्ण नाव व पदव्या )

( दुसरी ओळ ) — ( घरनबर व पेठ, किवा धंदा )

( तिसरी ओळ ) — — — — ( गावाचे नाव )

( चवथी ओळ ) — — ( जिल्हा किवा प्रात )

( ८ ) आतील मजकुराचे विषयानुरूप परिच्छेद पाडावे. मजकूर चटकदार व सगतवार असावा. आपले पत्र वाचून लोकाना समाधान वाटले पाहिजे.

( ९ ) पत्राची भाषा व्याकरणशुद्ध असावी.

( १० ) मित्राना लिहिलेली पत्रें देखील ग्राम्य असू नयेत पत्राची भाषा प्रेमळ असावी, पण पत्र लिहिताना शिष्टाचार सोडण्याचे कारण नाही.

# [ १६ ]

## परीक्षेचे प्रश्न

**टीप:**—नागपूर, मुंबई, अलाहाबाद व काशी या विश्वविद्यालयाच्या किंवा बोर्डाच्या मॅट्रिक इंटरमिजीएट किंवा हायस्कूल-सर्टिफिकेट या परीक्षात विचारलेल्या निबंधाचे विषय खाली दिले आहेत.

१ इतिहासाचा अभ्यास
२ बालविवाहापासून होणारी हानि
३ जातिभेद
४ प्रवासाचे फायदे
५ अस्पृश्यतानिवारण
६ शाळातून धर्मशिक्षण द्यावे काय ?
७ देशोन्नति
८ मातृभाषा हेंच शिक्षणाचें माध्यम हवें
९ महत्त्वाकांक्षा
१० राष्ट्राला श्रेष्ठत्व कशाने प्राप्त होते ?
११ व्यापारी शिक्षण
१२ औद्योगिक प्रदर्शनें
१३ मराठी भाषेची लेखन-पद्धति
१४ बहुजनसमाजाचें सक्तीचें व मोफत शिक्षण
१५ शिस्तीची आवश्यकता
१६ विद्यार्थ्यांचे शील
१७ राष्ट्रभाषा हिंदी
१८ स्वदेशाभिमान
१९ धर्मभाळेपणा
२० एकी हेच बळ
२१ लहानपण देगा देवा
२२ काव्याचें अध्ययन
२३ भूगोलाचा अभ्यास
२४ सक्तीचे शारीरिक शिक्षण
२५ व्यायाम
२६ मद्यपानप्रतिबंधक चळवळ
२७ बालचमू ऊर्फ स्काउटिंग
२८ यात्रा
२९ तुमचे आवडतें पुस्तक

३० तुम्ही सुट्टी कशी घालविली ?
३१ आदर्श विद्यार्थी
३२ बैठे खेळ व मैदानी खेळ
३३ स्त्रीशिक्षण
३४ स्त्री-पुरुषांचे समान हक्क
३५ मतदानाचा हक्क
३६ समाधान
३७ तुमची शाळा
३८ रुपयाची कथा
३९ तुमचा आवडता पुढारी
४० मोठेपणी काय कराल ?
४१ फुटबॉलचा सामना
४२ सूर्यग्रहण
४३ पेशवाई का नष्ट झाली ?
४४ परीक्षांची महती
४५ विश्वविद्यालय
४५ अनुभव हा ज्ञानाचा पाया होय
४७ शास्त्र व कला
४८ कला व नीति
४९ ग्रामपंचायती
५० ग्रामसुधारणा
५१ आदर्श खेडेगाव
५२ विद्यार्थ्यांची सफर
५३ आरोग्यसप्ताह
५४ विभूतिपूजन
५५ अति शाहणा त्याचा बैल रिकामा
५६ गिरणीमजुरांचें जीवन
५७ निसर्गसौंदर्य
५७ तुम्ही पाहिलेले उत्तम ठिकाण
५९ यांत्रिक वाहतुक
६० जाहिरातीची कला
६१ तुमचा आवडता कादंबरीकार वा कवि
६२ शास्त्रीय सुधारणा व युद्धें
६३ राष्ट्रसंघ
६४ कॉलेजचे मासिक
६५ वर्तमानपत्राचा धंदा
६६ गर्दीत पाहिलेले काही चेहेरे
६७ उपदेशापेक्षा उदाहरण बरें
६८ खेड्यांतील खासगी उद्योगधंदे

६९ हिंदुस्थानाचे लष्करी संरक्षण
७० हिंदुस्थानातील आरोग्य
७१ खेळातील पंच कसा असावा ?
७२ निवडणुकीची धामधूम
७३ हिंदी कला
७४ मी कॉलेजात का दाखल झालो ?
७५ बायसिकलचा प्रभाव
७६ शेती व शेतकऱ्याची सुधारणा
७७ अध्यक्षाचें कर्तव्य
७८ अभ्यासक्रमात शास्त्राचे महत्त्व
७९ ग्रहणातील अनुभव
८० मूकपट व बोलपट
८१ समाईक कुटुंबपद्धति बरी कीं विभक्त ?
८२ वाचनालये
८३ जगी सर्व सूखी असा कोण आहे ?
८४ सुगृहिणी
८५ हिंदुमुसलमानाचीं भांडणे कशीं मिटतील ?
८६ सुदृढ शरीर हाच सौंदर्याचा पाया होय
८७ शहर आणि खेडे
८८ पदार्थसंग्रहालये
८९ ज्ञानाची साधने ( चित्रपट, संग्रहालये, वाचती व फिरती वाचनालये, मासिके, वर्तमानपत्रे,
९० स्थानिक स्वराज्यसंस्था
९१ आजची रंगभूमि
९२ यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवता
९३ जंगलाचे उत्पन्न
९४ वाङ्मय म्हणजे काय
९५ मोटारचा प्रवास
९६ काव्य व कला
९७ सामाजिक सुधारक
९८ इतिहाससंशोधन
९९ परदेशगमन
१०० ऋण काढून सण साजरा करूं नका
१०१ शंभर वर्षापूर्वीचें हिंदुस्थान

# [ १७ ]

## सुभाषितें

मराठी निबंधात मधूनमधून जी सुभाषिते घालावयाची तीं मराठीच असली पाहिजेत, असे नाही **संस्कृत, इंग्रजी, मराठी या भाषांतील गद्यात्मक** वा **पद्यात्मक सुभाषितांचा मराठी निबंधांत उपयोग करावयास मुळीच हरकत नाही** मात्र सुभाषिते **विषयाला धरून** व **समर्पक** असली पाहिजेत शिवाय लिहिण्याच्या ओघात ती सहजगत्या आली आहेत, असे वाचकाला वाटले पाहिजे सुभाषितामुळे विवेचनाच्या ओघात खंड पडता कामा नये. नाही तर, आपल्या ज्ञानाचे प्रदर्शन करण्याकरिता लेखकाने मुद्दाम सुभाषिते मधूनमधून घातली, असा वाचकाचा व परीक्षकाचा ग्रह होईल, आणि त्याचा तसा ग्रह होणें केव्हाहि इष्ट नाही.

सुभाषितें लहानशी पण चटकदार असावीत, म्हणजे ती परिणामकारक होतात लांबच लांब उतारे देणे बरे नव्हे लांबलचक उताऱ्यांनी रसभंग होतो. सुभाषिते सोपी व ज्यांचा अर्थ वाचकाच्या सहज लक्षात भरेल अशीं असावीत विद्यार्थ्यांचे वाचन जितकें व्यापक, अभ्यास जितका दीर्घ आणि स्मरणशक्ति जेवढी तीव्र असेल, त्या मानाने अनेक समर्पक सुभाषिते त्याला सुचतील व ती निबंधाच्या शिरोभागी अथवा निबंधात विषयाच्या विवेचनास अनुसरून देता येतील. काही म्हणी देखील सुभाषितवजा असतात व काही सुभाषिते म्हणीप्रमाणे कामी येतात. सुभाषिताची कल्पना येण्याकरिता थोडेसे नमुने खाली दिले आहेत.

## संस्कृत

१ स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावह. ।

२ कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।

३ परित्राणाय साधूना विनाशाय च दुष्कृताम्
धर्मसस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥

४ ये यथा मा प्रपद्यन्ते तास्तथैव भजाम्यहम् ।

५ यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धर·
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥

६ सहता हि महाबल ।

७ समत्व योगमुच्यते ।

८ सर्व बलवतो वशे ।

९ सुखार्थिन. कुतो विद्या
नास्ति विद्यार्थिन. सुखम् ॥

१० वासासि जीर्णानि यथा विहाय
नवानि गृह्णाति नरोऽपराणि ॥
तथा शरीराणि विहाय जीर्णा-
न्यन्यानि सयाति नवानि देही ॥

११ राजा कालस्य कारणम् ।

१२ योगः कर्मसु कौशलम्।

१३ बलं तु वाचि द्विजसत्तमाना
क्षात्रं बुधा बाहुबल वदन्ति ॥

१४ नाप्राप्य तपस. किंचित् ।

१५ न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

१६ धर्मोहि परमा गतिः ।

१७ तपसा लभ्यते सर्वम् ।
१८ चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।
१९ आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम्
सर्वदेवनमस्कारः केशवं प्रतिगच्छति ॥
२० सत्यं स्वर्गस्य सोपानम् ।
२१ सर्वारंभास्तण्डुलाः प्रस्थमूलाः ।
२२ गृहं तु गृहिणीहीनं कान्तारादिति रिच्यते ।
२३ यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः ।
२४ जीवो जीवस्य जीवनम् ।
२५ प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रंमित्रंसमाचरेत् ।
२६ विवेकभ्रष्टानां भवति विनिपातः शतमुखः ।
२७ बुभुक्षितः किं न करोति पापम् ।
२८ इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि ।
२९ गुणाः पूजास्थानं गुणिषु न च लिङ्गं न च वयः ।
३० यस्यास्ति वित्तं स नरः कुलीनः
स पण्डितः स श्रुतिमान् स गुणज्ञः
स एव वक्ता स च दर्शनीयः
सर्वे गुणाः काञ्चनमाश्रयन्ते ॥
३१ उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः ।
३२ छिद्रेष्वनर्था बहुली भवन्ति ।
३३ अतीत्याह गुणान् सर्वान् स्वभावो मूर्ध्नि वर्तते ।

## मराठी

१ वृक्ष फार लवती फलभारें
लोंबती जलद घेउनि नीरें ।

थोर गर्व न धरी विभवाचा
हा स्वभाव उपकारपराचा ॥

२ हे तों सत्पुरुष स्वकार्य त्यजुनी अन्यार्थ संपादिती
हे तो मध्यम जे निजार्थ करिती अन्यार्थहि साधिती।
हे तो राक्षस जे स्वकार्यविषयी अन्यार्थ विध्वसिती
जे का व्यर्थ परार्थहानि करिती ते कोण की दुर्मति॥

३ भाग्याला सुजनत्व भूषण असे, कीं मौन शौर्यास ते
ज्ञानाला शम त्या शमास विनय, द्रव्यास दातृत्व तें।
अक्रोधत्व तपा क्षमा प्रभुपणा, धर्मास निर्दंभता
या सर्वांसहि मुख्य भूषण पहा सच्छील हें तत्त्वता ॥

वानोत निंदोत सुनीतिमत
चळो असो वा कमला गृहात ।
हो मृत्यु आजचि घडो युगान्ती
सन्मार्ग टाकूनि भले न जाती ॥

५ की तोडिला तरु फुटे अणखी भराने
तो क्षीणहि विधु महोन्नति घे क्रमाने।
जाणोनि हें सुजन ज्या दुबळीक आली
त्याशी कदा न करितीच भले टवाळी ॥

६ आली जरी कष्टदशा अपार
न टाकिती धैर्य तथापि थोर ।
केला जरी पोत बळेच खाले
ज्वाळा तरी ते वरती उफाळे ॥

७ तें श्वान एक तुकड्यास्तव चार नाना
दावी धन्यास जठरार्थ कसें पहा ना

दे आळवूनि जरि हास्तिम बापभाई
घेतोच घास गजराज कशी बढाई ॥

८ न चोराला लावे, प्रगट न दिसे, दे सुख सदा
दुणावें की देता, किमपि न सरे लेशहि कदा ।
न कल्पांतीं पावे निधन धन विद्याभिध असे
असे ज्याचे त्याशी प्रतिभटति जे पामर पिसे ॥

९ बळाने काढू ये मणि मकरदाढेत दडला
महासिंधूलाटा-तरण करू येई भुजबळा ।
महासर्पातेही सुमसम धरू ये निजशिरी
परंतु क्षुद्राचे हृदय धरवेना क्षणभरी ॥

१० प्रयत्ने वाळूचे कण रगडिता तेलहि गळे
तृषार्ताची तृष्णा मृगजळ पिऊनीहि वितळे ।
सशाचेही लाभे विपिनि फिरता शृंगहि जरी
परंतू मूर्खाचे हृदय धरवेना क्षणभरी ॥

११ कोणी निंदा कोणी वंदा । आम्हा स्वहिताचा धंदा ॥

१२ बोले तसा चाले । त्याची वंदावी पाउले ॥

१३ वेडेवाकुडे गाईन । परि मी तुझाचि म्हणवीन ॥

१४ शुद्ध बीजापोटी । फळे रसाळ गोमटी ॥

१५ जे का रंजले गांजले । त्यासि म्हणे जो आपुले ॥
तोचि साधु ओळखावा । देव तेथेचि जाणावा ॥

१६ नाही निर्मळ जीवन । काय करील साबण ॥

१७ मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास ।
कठिण वज्रास भेदू ऐसे ॥

१८ सत्यसंकल्पाचा दाता भगवान । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥

१९ दया क्षमा शांति । तेथे देवाची वसती ॥

२० मुलाम्याचें नाणें । तुका म्हणे नव्हे सोनें ॥

२१ तनू त्यागिता कीर्ति मागे उरावी
मना सज्जना हेचि क्रीया धरावी ।
मना चंदनाचे परी त्वा झिजावे
परी अंतरी सज्जना नीववावें ॥

२२ समर्थाचिया सेवका वक्र पाहे
असा सर्व भूमंडळी कोण आहे ? ॥

२३ कठिण समय येता कोण कामास येतो ? ॥

२४ हासत कर्म करावे भोगावें रडत तेचि परिणामी ॥

२५ खल न खलत्व त्यागी जरि सामें गौरवून बोळविला
कटु कुचला अमृतकराकरवींही शर्करेत घोळविला ॥

२६ ज्याच्या असे विमलही मणि उत्तमांगी
तो सर्प काय न डसे खळ अंतरंगी ? ॥

२७ शीतल मंद सुगंधित वद सेवावा कसा गरलवायू ?

२८ मोलें उणे व्यजन ते धरिता पुढारी
छाया करी, तपन दीप्तिसही निवारी ॥

२९ सर्पाते बिसततुने सुदृढ जो बांधावया इच्छितो
किंवा वज्रमणी शिरीषकुसुमें भेदावया पाहतो ।
किंवा तो मधुबिंदुने मधुरता क्षाराब्धिला आणतो
जो मूर्खास सुभाषितें वश करूं ऐसें झणी बोलतो ॥

३० राया, कुलार्थ, पुरुष, ग्रामार्थ कुलहि समस्त सोडावें
ग्रामहि देशार्थ, मही आत्मार्थ बुधे भलेचि जोडावें ॥

३१ आधींच मर्कट तशातहि मद्य प्याला
झाला तशातचि वृश्चिकदंश त्याला ।

झाली तयास तदनंतर भूतबाधा
चेष्टा वदू मग किती कपिच्या अगाधा ? ॥

३२ कोणा अंध म्हणावे ? न दिसे सन्मार्ग उघडही ज्यास
कोण बधिर ? जो नाही परिसत केल्या हितोपदेशास ॥

३३ करिल कसे माजर जे दुष्कर हरिहननकाज वाघास ?

३४ विभूतिपूजा जेथे नाही अमलें राष्ट्र सापडावयाचें नाही, व ज्या समाजात या गुणाचा लोप होत जातो तो समाज मरणोन्मुख झाला आहे असे समजावे.

३५ ज्याप्रमाणे प्रजेचे धर्म आहेत त्याप्रमाणे राजाचेहि धर्म आहेत. प्रजाजन म्हणजे काही राजाचे गुलाम नव्हेत, किंवा राजा म्हणजेहि अमल चालविणारा राक्षस नव्हे. राजा व प्रजा याच्यामधे जेव्हा एक प्रकारची एकी असते, तेव्हाच राज्यकारभार गुरळीत चालतो

३६ काळाची गति ओळखून जर लोकाग्रणींनी आपला कार्यक्रम बदलला नाही तर काळ पुढे जाईल आणि पुढारी मागे पडतील, पुढाऱ्याकरिता काळ थांबणार नाही

३७ समोर अंधार दिसत असला तरी त्यापलीकडे उजेड आहे हे लक्षात ठेवा

३८ आर्ष काव्य जर देशातील सामान्य लोकाच्या अंगी शौर्य, धर्म, स्वाभिमान, उत्साह किंवा सत्यनिष्ठा याची जागृति करणार नाही, तर त्या काव्याची योग्यता कोणी मानणार नाही.

३९ स्वतंत्रता ही तरी परमेश्वराचीच देणगी होय.

४० देशांतील विद्वान जर धर्मपराङ्मुख झाले तर सामान्य जनास कोणी त्राता राहत नाही.

# ENGLISH.

1 Action may not always bring happiness, but there is no happiness without action

2 A drop of ink may make a million think

3 An idle man's brain is the devil's workshop

4 Anger begins with folly and ends with repentance

5 Apt quotations carry convictions.

6 Books are the best things well-used, abused among the worst

7 Character lives in a man, reputation outside of him

8 Debt is like any other trap, easy enough to get into, but hard enough to get out of

9 Every-one can master a grief but he that has it

10 Fate is the friend of the good, the guide to the wise, the tyrant to the foolish and the enemy to the bad

11 Fear not the future, weep not for the past

12 Friendship improves happiness and abates misery, by the doubling of our joy and the dividing of our grief

13 From a little spark may burst a mighty flame.

14 Full many a flower is born to blush unseen,
And wastes its sweetness on the desert air

15 Guilt will speak, though tongues were out of use

16 Happy child ! The cradle is still to thee a vast

space, become a man, and the boundless world would be too small to thee.

17 He who proposes to be an author, should first be a student

18 If we do not plant knowledge when young, it will give us no shade when we are old

19 It is the mind that makes the body rich

20 Literature is the garden of wisdom

21 Lovely flowers are the smiles of God's goodness

22 Men deal with life as children with their play,
Who first misuse, then cast their toys away.

23 Nature is the chart of God, mapping out all his attributes

24 No victory worth having was ever won without cost

25 Our memories are independent of our wills

26 Rumour grows as it goes

27 Sin is like the bee, with honey in its mouth but a sting in its tail

28 Sorrows draw not the dead to life, but the living to death

29 So when a great man dies,
For years beyond our ken,
The light he leaves behind him lies,
Upon the paths of men

30 That virtue which requires to be ever guarded is scarcely worth the sentinel

31 The child is the father of the man

32 The evil that men do lives after them,
The good is oft interred with their bones
33 The world is a looking glass, and it gives back to every man the reflection of his own face Frown at it and it will in turn look sourly upon you, laugh at it and with it and it is a jolly kind companion
34 Time is generally the best doctor.
35 We judge ourselves by what we feel capable of doing, while others judge us by what we have already done
36 We know what we are, but know not what we may be
37 When a man speaks the truth in the spirit of truth, his eyes are as clear as the Heavens
38 When clouds are seen, wise men put on their cloaks
39 Where there is much light, the shadow is deep
40 Years teach us more than books

[ १८ ]

# कांही प्रमुख मराठी म्हणी
व
# वाक्प्रचार

( अकारविल्हे )

अकलेचा खंदक
अकांडतांडव करणे
अकाबाईचा फेरा
अंग चोरणे
अंगाई करणे
अंगाखांद्यावरचे
अंगापेक्षा बोंगा मोठा
अंगावर कांटा उभा राहणे
अंगावर शेकणे
अगे अगे म्हशी, मला का नेशी ?
अग्निकाष्ठे भक्षण करणे
अघळपघळ भाषण
अजागळ
अजापुत्र बलिं दद्यात्
अटकेस झेंडा फडकवणे
अठरा धान्याचें कडबोळे
अठरापगड जात
अठरा विश्वे दारिद्य
अडणीवरचा शंख
अडला नारायण गाढवाचे पाय धरी
अडीपिली बाहेर काढणे
अडेल तट्टू
अढीच्या दिढी
अढी धरणें
अंत पाहणे
अंतर देणे
अति तेथे माती
अति शाहणा त्याचा बैल रिकामा
अतिपरिचयादवज्ञा
अति सर्वत्र वर्जयेत्
अत्तराचे दिवे जाळणे
अथपासून इतिपर्यंत
अंथरूण पाहून पाय पसरणे
अद्दल घडणे
अद्वातद्वा
अधली कोशिंबीर
अंधळयाची काठी
अंधळयाची माळिका

आंधळा मागतो एक डोळा देव देतो दोन डोळे
आधीच उल्हास त्यात आला फाल्गुन मास
आधीच तारें त्यात शिरलें वारें
आधी पोटोबा मग विठोबा
आधी बुद्धि जाते मग भाडवल
आधळ्या-बहिऱ्याची गाठ
आपला तो बाब्या, दुसऱ्याचे तें कारटें
आपला हात आणि जगन्नाथ
आपोआप
आपलेच दात आणि आपलेच ओठ
आपले नाक कापून दुसऱ्यास अपशकुन करणे
आपल्या कानीं सात खडे
आपल्या पोळीवर तूप ओढणें
आभाळ कोसळणें
आभाळ फाटणें
आयत्या पिठावर नागोबा
आयत्या पिठावर रेघा ओढणे
आरम्भशूराः खलु दक्षिणात्याः
आला गेला
आले अंगावर तर घेतलें शिंगावर
आव घालणे
आवळा देऊन कोहळा काढणे
आवळ्याएवढे पूज्य
आहे आहे नाही नाही
आळशावर गंगा
आळा घालणें

इकडचा डोंगर तिकडे करणें
इगा फिरणे
इकडे आड तिकडे विहीर
इजा, बिजा, तिजा
इति श्री
इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः
इन मीन सव्वातीन
इन्द्राय तक्षकाय स्वाहा
इमानास जागणें
इरेस घालणें
इळ्याभोपळ्याइतकें सूत
उकळी फुटणें
उखळ पांढरें होणे
उखाळ्या-पाखाळ्या काढणें
उघड्या डोळ्यानें प्राण देणें
उचलबांगडी करणें
उचलली जीभ लावली टाळ्याला
उजेड पाडणें
उटावरचा शहाणा
उटावरून शेळ्या हाकणें
उठता लाथ बसता बुक्की
उठल्या सुटल्या
उडत्या पाखराचीं पिसें मोजणे
उणेंपुरें
उतावळा नवरा गुडघ्याला बाशिंग
उथळ पाण्याला खळखळ फार
उंदराला मांजर साक्ष
उदक सोडणें
उदरीं शनि येणें

उदो उदो करणें
उपटसुभ
उफराटया काळजाचा
उंबरठा चढणें
उंबराचें फूल
उभा दावा
उलटी अंबारी
उष्टया हाताने कावळा न मारणें
ऊत येणें
ऊहापोह करणे
ऋण कृत्वा घृतं पिबेत्
एक घाव की दोन तुकडे
एकछत्री राज्य
एक पथ दो काज
एक ना धड भाराभर चिंध्या
एका कानाने ऐकावे दुसऱ्याने सोडावे
एकाने गाय मारली म्हणून दुसऱ्याने वासरू मारू नये
एका पायावर तयार असणे
एका माळेचे मणी
एका म्यानात दोन सुऱ्या नांदत नाहीत
एका हाताने टाळी वाजत नाही
एरंडाचें गुऱ्हाळ
एरंडोऽपि द्रुमायते
ऐकावें जनाचे, करावें मनाचें
ओंजळीने पाणी पिणे
ओढून ताणून चद्रबळ आणणे
ओनामा
ओफस होणें
ओ म्हणता ठो येईना
ओळखीचा चोर जिवानिशीं न सोडी
औषध जाह्नवीतोयम्
कचकच
कचींबचीं
कठ फुटणे
कठस्नान घालणे
कडू कारलें
कडेलोट
कढी पातळ होणे
कणिक तिंबणे
कत्तलची रात्र
कपाळ उठणे
कपाळ फुटणे
कपाळमोक्ष होणे
कपाळाचें कातडे नेणे
कपाळाशीं कपाळ घासणे
कपाळीं डाग लागणे
कपिलाषष्ठीचा योग
कफल्लक
कबजूती
कबर खचणें
कबर बांधणे
कबर मोडणे
करकर दात खाणें
करणी करणें
करतलमलवत्
करनकरीचा वसा

कर नाही त्याला डर कशाला
करावें तसें भरावे
करील ती पूर्व दिशा
कर्णपिशाच
कर्णाचा अवतार
कर्तुमकर्तुमन्यथा कर्तु
कर्दनकाळ
कर्मणो गहना गतिः
कर्मधर्मसंयोगाने
कलम करणे
कलमकसाई
कल्पान्त करणे
कशास नाही ठिकाण
कस्पटाप्रमाणे मोजणे
कसायाला गाय धार्जिणी
कसास लागणे
कळ लावणे
कळस होणे
कळसूत्री बाहुले
कळी उमलणे
कळीचा नारद
काकतालीयन्याय
काकणभर
काक-रव
काकुळतीस येणे
का कू करणे
काखा वर करणें
कागदी घोडे नाचविणें
कागाव करणें
काटा काढणे
काट्याचा नायटा होणें
काट्याने काटा काढणें
काडीचोर तो पाडीचोर
काडीने औषध लावणे
काडीपैलवान
काडी मोडून देणें
काथ्याकूट
कान आणि डोळे याच्यात अंतर असते
कानउघाडणी करणे
कान किटणे
कानगोष्टी सांगणे
कानाच्या कोपऱ्यास
कान टवकारून
कान टोंचणे
कानठळ्या बसणें
कान फुटणे
कान लावणे
कानशील रंगविणे
कानाचा चावा घेणे
कानाचा हलका
कानाडोळा करणें
कानात तुळशीपत्र घालणें
कानामागून आला आणि तिखट
झाला
कानाला खडा लावून घेणे
कानावर हात ठेवणे
कानीं-कपाळीं ओरडणें
काप गेले भोकें राहिलीं

कापूस महाग करणें
कापूस सवंग करणें
कामापुरता मामा
कामास येणे
कावळ्याच्या शापाने गाई मरत नाहीत
कास धरणें
काळ आला होता, पण वेळ आली नव्हती
काळींचे उत्पन्न
काळे करणे
काळे पाणी
काहीच्याबाहीच
किल्ली फिरविणे
कीस काढणे
कुछ रोटी कुछ लगोटी
कुचेष्टेवाचून प्रतिष्ठा नाही
कुडबुड्या जोशी
कुडी तशी पुडी
कुत्रा हाल खाईना
कुत्र्याचे मूत
कुत्र्याचे शेपूट नळींत घातलें तरी वाकडें तें वाकडेच
कुबेर
कुभाड रचणे
कुपणाने शेत खाल्ले तर तक्रार कोणाजवळ करणार ?
कुंभकर्ण
कुंभाराची सून कधी तरी उकिरड्यावर येईलच
कुरघोडी करणे
कुरमुरे किंवा चुरमुरे खाणें
कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ
कूपमडूकन्याय
केसाच्या आबाड्या होणें
केसाने गळा कापणे
कोटकल्याण
कोटस्य कीटायते
कोठे इद्राचा ऐरावत कोठे शामभट्टाची तट्टाणी
कोड पुरविणे
कोडयाचा माडा करणें
कोणत्या तोंडाने
कोणाचा पायपोस कोणाचे पायात नाही
कोण्या झाडाचा पाला
कोपरापासून हात जोडणें
कोबडें झाकलें म्हणून तांबडे फुटावयाचें राहत नाही
कोरडयाबरोबर ओलें
कोरडयास
कोरा करकरीत
कोलीत लावणे
कोल्हा काकडीला राजी
कोल्हेकुई
कोळशातले माणिक
कोळसा उगाळावा तितका काळा
'क्वचित् काणः भवेत्साधुः'
खटाटोपो भयकरः

गमजा चालविणें
गयावया करणें
गरजवंताला अक्कल नाही
गरज सरो, वैद्य मरो
गर्गाचार्याचा मुहूर्त
गर्जेल तो वर्षेल काय
गर्भगळित होणें
गर्भश्रीमंत
गर्वाचें घर खाली
गवयाचें पोर रडलें तरी सुरात रडते
गवऱ्या मसणात जाणे
गळ घालणें
गळा कापणे
गळ्यात धोंगडें येणे
गळ्यातला ताईत
गळ्यात पडणे
गळ्याशीं येणे
गाजरपारखी
गाढ्याबरोबर नळ्याला यात्रा
गाढवाचा खरारा
गाढवाचा गोंधळ लाथाचा सुकाळ
गाढवाचा नांगर फिरणें
गाढवापुढे वाचली गीता, कालचा गोंधळ बरा होता.
गाढवाला गुळाची चव काय ?
गादीला पाय लावणें
गाय होणें
गाव तेथें महारवाडा
गाव करी तें राव न करी
गावगुंड
गावढ्या गावात गाढवी सवाष्ण
गाशा गुंडाळणे
गाळण उडणे
गुगारा देणे
गुण पाघळणें
गुण्यागोविंदाने
गुरुकिल्ली
गुरुमंत्र
गुरूची विद्या गुरूलाच फळणे
गुलगुल गोष्टी
गुलदस्तात ठेवणे
गुलाबाचे फूल
गुलाबी थंडी
गुळाचा गणपति
गुळाचा गणपति व गुळाचाच नैवेद्य
गृहच्छिद्र
गेला बाजार तरी
गोगलगाय आणि पाटात पाय
गोडा घोळणे
गोडीगुलाबी
गोत्यात आणणें
गोंधळ घालणें
गोमा गणेश पितळी दरवाजा
गोमाजी कापशे
गोरागोमटा कपाळकरंटा
गौडबंगाल
ग्रामकेसरी
घटका भरणें

घटकेचें घडयाळ
घटोत्कचाचा बाजार
घडा भरणें
घबाड साधणें
घमडानदन
घरकोंबडा
घर डोईवर घेणे
घर धुऊन नेणे
घर फिरलें म्हणजे घराचे वासे फिरतात
घर ना दार
घर बसणे
घर भरणे
घरचे झाले थोडे, व्याह्याने धाडले घोडे
घरोघरी मातीच्याच चुली
घागरगडचा सुभेदार
घालूनपाडून बोलणे
घी देखा, पण बडगा नही देखा
घृतकुल्या मधुकुल्या
घे वाण दे वाण
घोडनवरा
घोडामैदान जवळ आहे
घोडे थकणे
घोडे पुढे ढकलणें
घोडें पेंड खातें
घोडें मारणें
घोडयाएवढी चूक
घोरपड आणणें
घोरपड येणें
चकारशब्द
चटकचादणी
चक्षुर्वै सत्यम्
चग बाधणे
चगीभगी
चचुप्रवेशे मुसलप्रवेशः
चांडाळचौकडी
चढती किंवा उतरती कमान
चढेल तो पडेल
चतुर्भुज होणे
चन्द्रबळे आटोपणे
चरणारविंदी मिलिंदायमान
चर्पटपजरी
चर्वितचर्वण
चऱ्हाट वळणे
चवदावे रत्न
चवाट्यावर आणणे
चाणक्य
चादरात झडणे
चांदी उडणे
चापटपोळी
चांभार चौकशी
चांभाराच्या देवाला खेटराची पूजा
चार अक्षरें
चारी ठाव जेवण
चार दिवस सासूचे चार सुनेचे
चारी वाटा मोकळया
चालत्या गाडयास खीळ घालणे
चावडीवर दरवडा
चाळा लावणें

चाळिशी
चिटपाखरूं
चिमणीच्या दातानी फोडणें
चिमणीसारखें तोंड करणे
चिरंजीव
चिरिमिरी
चीत करणें
चुकला फकीर मशिदींत
चुकारतट्टू
चुटपुट लागणें
चुडेदान देणे
चुरमुरे खाणें
चुलींतून निघून वैलात शिरणें
चुलीला अक्षत लावणें
चोराच्या उलट्या बोंबा
चोराच्या मनात चादणें
चोराच्या हातची लगोटी
चोराला सोडून संन्याशाला सुळीं
चोरावर मोर
चोरी होणें
चौकोनी चिरा
चौदा चौकडयाचें राज्य
चौपदरी
चौऱ्याशीचा फेरा
छक्केपंजे
छडी लागे छमछम विद्या येई घमघम
छत्तिसाचा आकडा
छाती करणे
छातीला हात लावून सागणे
छादिष्ट
जगातून उठणे
जड पारडें
जड बुडाचें माणूस
जडीबुट्टी
जनीं जनार्दन
जन्मजन्मातरीं
जन्मा आला हेला, पाणी वाहता मेला
जन्माची गाठ
जन्माची भाकर
जपमाळ घेणे
जमदग्नि
जमीनअस्मानाचे अतर
जरीपटका
जशी देणावळ तशी धुणावळ
जळत्या घराचा पळता वासा
जळात राहून माशाशीं वैर
जगजग पछाडणे
जागती ज्योत
जाडे प्रकरण
जातीचे
जातीवर जाणें
जावें त्याच्या वंशा तेव्हा कळे
जाबुवत
जावईशोध
जित्याची खोड मेल्यावाचून जात नाही
जिभेचा पट्टा
जिभेवर असणें
जिभेस हाड नसणें

जिव्हाळीं लागणे
जिवाचा धडा करणें
जिवाचें रान करणें
जिवानिशीं जाणे
जिवावर उठणें
जिवावर उड्या मारणे
जिवावर उदार
जिवावरचा प्रसंग
जिवावर येणे
जिवात जीव आहे तोंपर्यंत
जिवास जीव देणे
जीभ चावणें
जीभ पाघळणे
जीभ लांब करून बोलणे
जीव की प्राण करणे
जीव खाली पडणे
जीव घेऊन पळणे
जीव थोडा थोडा होणें
जीव देणे
जीव धरून असणे
जीव मुठींत धरून
जीवश्च कंठश्च
जुलुमाचा रामराम
जेवीन तर तुपाशीं नाही तर उपाशी
जो उठला तो
जोजो करणे
जोडे फाडणें
जो तो
जो पाहवा तो

ज्या गावच्या बोरी, त्याच गावच्या बाभळी
ज्याची खावी पोळी, त्याची वाजवावी टाळी
ज्याचें करावें बरें, तो म्हणतो माझेंच खरें
ज्याचें नाव ते
ज्याचे पोट दुखेल तो ओवा मागेल
ज्याच्या हातीं ससा तो पारधी
झक मारणें
झाकली मूठ सव्वा लाखाची
झाकले माणिक
झोटिंग पादशाही
टकमक पाहणें
टक्केटोणपे खाणे
टगळमगळ करणें
टला ट जुळविणें
टाकणे टाकणे
टाकीचे घाव सोसल्याशिवाय देवपण येत नाही
टाकून बोलणे
टाके ढिले करणे
टाळूवर मिरे वाटणे
टिटवीने समुद्र आटविणे
टिवल्या बाव्हल्या करणें
टुकटुक माकड
टुमणें लावणें
टुरटुर करणें
टेकीस येणे

टेंभा मिरविणें
टोळभैरव
ठणठणपाळ
ठाव ना ठिकाण
डबघाईला येणे
डल्ला मारणे
डागोरा पिटणे
डाव साधणे
डाळ शिजू देणे
डोईवर हात फिरविणे
डोईवर हात ठेवणें
डोके खाजविणे
डोक्यावर केस न ठेवणे
डोक्यावर बसविणे
डोक्यावरून पाणी फिरणे
डोंगरचे आवळे व सागरचे मीठ
डोंगर पोखरून उंदीर निघाला
डोळा असणे
डोळा मारणे
डोळे उघडणे
डोळे थंड होणें
डोळे फिरणें
डोळे फुटणें
डोळे भरून पाहणे
डोळ्याच्या खाचा होणें
डोळ्याचें पारणें फिटणें
डोळ्यात खुपणें, सलणें
डोळ्यात गंगाजमना येणें
डोळ्यात तेल घालून पाहणें
डोळ्यात धूळ फेकणें
डोळ्यापुढे काजवे दिसणें
डोळ्यावर कातडें ओढणें
डोळ्यावर धूर येणे
डोळ्याशीं डोळा लागणे
ढ
ढवळ्याशेजारीं बांधला पोळा, वाण
नाही पण गुण लागला
ढालगज भवानी
ढुंगणाचे सोडून डोक्याला गुंडाळणें
ढग
तत्त्वमसि
तत्त्वमसीशीं गांठ
तबी देणे
तहानलाडू भूकलाडू
तहान लागल्यावर विहीर खणणे
तळपायाची आग मस्तकास जाणे
तळपट होणे
तळहातावरचा फोड
तळहातास केस येणें
तळी उचलणे
तळीराम गार करणे
तळे राखील तो पाणी चाखील
ताकापुरते रामायण
ताकाला जाऊन भांडें लपविणें
ताज्या घोड्यावरच्या गोमाशा
ताटाखालचें मांजर

ताटांत सांडलें काय वाटींत सांडले काय
ताटावरचें पाटावर
तापल्या तव्यावर पोळी भाजणें
तांबडें फुटणे
ता म्हणता ताकभात
तारांबळ उडणें
तारे तोडणे
ताळ सोडणे
तिकडून, तिकडचा
तिखट मीठ लावून सांगणे
तिमाजी नाईक
तिस्मारखां
तिरपीट उडणें
तिरशिंगराव
तिरस्थळी
तिलांजलि देणें
तिळपापड होणें
तीर्थरूप
तुकारामबोवाची मेख
तुटून पडणे
तुणतुणे वाजविणे
तुंबडी भरणें
तुरुतदान महापुण्य
तुला फे तुझ्या बापाला फे
तुळशीत भांग
तूट पडणें
तृतीय प्रकृति
तेरड्याचा रंग तीन दिवस
तेरी मेरी
तेलगभट
तेल गेले तूप गेलें, हातीं धुपाटणे आलें
तैलबुद्धि
तोंड आटोपणें
तोंड आवरट करणें
तोंड आहे कीं तोबरा आहे ?
तोंड उतरणे
तोंड काळे करणें
तोंडघशी पडणे
तोंड घालणें
तोंडचें पाणी पळणें
तोंड टाकणे
तोंड दाबणें
तोंडदेखलें बोलणे
तोंड देणे
तोंड बांधून बुक्क्याचा मार
तोंड धुऊन या
तोंड पसरणे
तोंड पाहत बसणे
तोंडपाटीलकी
तोंड फिरणे
तोंड फुटणें
तोंड येणे
तोंड रंगविणे
तोंड लागणे
तोंड वेंगाडणें
तोंड सांभाळून बोलणें
तोंडसुख घेणे

दातओठ खाणें
दात काढणें
दात कोरून पोट भरत नसते
दातखीळ बसणें
दात धरणें
दात पाडणे
दात वासून पडणे
दात विचकणे
दाताच्या कण्या करणें
दातावर मारायाला
दातीं तृण धरणें
दादाबाबा करणे
दाम करी काम
दिल्लीचा सौदा
दिल्ली तो बहोत दूर है
दिवटा
दिवस बुडाला, मजूर पळाला
दिवसाढवळ्या
दिवसा मशाल लावणें
दिवाभीत
दिवे ओवाळणे
दिवे लावणें
दिव्याखाली अंधेर
दीड दमडीचा
दीड बोट स्वर्ग उरणें
दीड शहाणा
दु:ख वेशीस टांगणें
दुःखावर डागण्या देणें
दुष्टाचार्य

दुधाने तोंड भाजणें
दुनिया झुकती है झुकानेवाला चाहिये
दुभत्या गाईच्या लाथा गोड
दुरून डोंगर साजरे
दुष्काळात तेरावा महिना
दुसऱ्याच्या ओंजळीने पाणी पिणें
दुसऱ्याच्या डोळ्यातलें कुसळ दिसतें,
पण आपल्या डोळ्यातलें मुसळ
दिसत नाही
दृष्टिआड सृष्टि
देखनेमें ढब्बू, चलनेमे शिवराई
देखल्या देवा दंडवत
देणें नास्ति घेणें नास्ति
दे माय धरणी ठाय
देवजी धसाडा
देव देव्हाऱ्यात नसणें
देव पावला
देवमाणूस
देवाज्ञा होणें
देश तसा वेष
देह वा पातयेत् अर्थ वा साधयेत्
दैव देते कर्म नेते
दोन हाताचे चार हात होणें
दोन्ही घरचा पाहुणा उपाशी
दौलतीचा खाब
द्यावे तसें घ्यावें
द्रव्येण सर्वे वशाः
द्राविडी प्राणायाम
द्राक्षें आंबट

धन्याला धत्तुरा, चाकराला मलिदा
धन्वतरी
धरमधक्का
धरमधक्का मिळणें
धर्म करता कर्म उभें राहणें
धर्मराज
धर्मस्य त्वरिता गतिः
धर्मास येणे
धागडधिंगा
धार काढणे
धारवाडी काटा
धारातीर्थ
धीरसो गभीर, उतावळासो बावळा
धुमश्चक्री
धूळ चारणे
धूळभेट
धेंड
नकटीच्या लग्नाला सत्राशे विघ्नें
नकटें व्हावे, पण धाकटें होऊ नये
न करत्याचा वार शनिवार
नक्राश्रु गाळणे
नक्षत्र पडणे
नख लावणे
नखशिखान्त
न खात्या देवाला नैवेद्य
नदीबैल
नदीचे मूळ आणि ऋषीचें कूळ
न देवाय न धर्माय
न भूतो न भविष्यति
नरडीचा घोट घेणें
नवकोटनारायण
नवरा मरो कीं नवरी मरो
नवी विटी नवें राज्य
नव्याचे नऊ दिवस
न हिंदुर्न यवनः
नाक
नाक कापणे
नाक घासणे
नाक ठेचणें
नाक दाबले की तोंड उघडतें
नाक धरून बसणें
नाक मुठीत धरून
नाक मुरडणे
नाक वर करून चालणें
नाकाडोळयाचा वैद्य
नाकात काड्या घालणे
नाकाने कांदे सोलणे
नाकापेक्षा मोती जड होणें
नाकावर टिचणे
नाकावर माशी बसूं न देणें
नाकाशीं सूत धरणें
नाकासमोर
नाकीं नऊ येणें
नागी टाकणे
नाचता येईना अंगण वाकडे
नाडया ओढू लागणे
नाना फडणीस

नानारत्ना वसुधरा
नावडतीचे मीठ अळणी
नाव मोठें लक्षण खोटे
नाव सोनूबाई हातीं कथलाचा वाळा
नावाचा
नावाने पूज्य
निमित्तास टेकणे
निरकुशा कवयः
निर्वाणीचा बाण
निर्वीरमुर्वीतलम्
नि:स्पृहस्य तृण जगत्
नृसिहावतार
न्हातीधुती
पक्तिपठाण
पक्तिबारगीर
पक्तिप्रपच
पगडा बसविणे
पगडी फिरविणें
पख फुटणे
पच पच उपःकाल
पचप्राणाची आरती ओवाळणें
पठाडी गोम
पट्टीचा वैदिक
पड घेणे
पडचाकर
पडजीभ
पडता काळ
पडत्या फळाची आशा

पढतमूर्ख
पंढरीची वारी
पणाला लावणें
पथ्यावर पडणे
पदरचा माणूस
पदर पसरणे
पदरमोड करणे
पदराला खार लावणें
पदरात घेणे
पदरात घालणें
पदरी असणे
पदरी पडलें पवित्र झाले
पदरीं माप घालणे
पर्वणी
पराचा कावळा करणें
परसातली भाजी
पराय घरपर लक्ष्मी नारायण
परोपदेशेपांडित्यम्
पवाडे गाणें
पळसास पाने तीनच
पाऊस म्हणतो मी
पाग फेडणे
पागोट्याची लाज धरणे
पागोट्याचे पेच गळयात येणें
पागोटें घेणे
पाघरूण घालणें
पाचजन्य करणें
पाचहि बोटें सा

पाचावर धारण बसणें
पाचामुखीं परमेश्वर
पाट लावणें
पाठची बहीण
पाठ थोपटणें
पाठ दाखविणें
पाठ पुरविणे
पाठ मऊ करणें
पाठीचें धिरडें करणे
पाठीला तेल लावून ठेवणें
पाठीवर पाय देऊन येणें
पाठीवर मारा, पोटावर मारू नका
पाठीस पोट लागणें
पाड नसणें
पाढऱ्या पायाची
पाढऱ्यावर काळे करणें
पाढा वाचणें
पाणी ओळखणें
पाणी देणें
पाणी पडणें
पाणी पाणी होणें
पाणी भरणें
पाणी मुरणें
पाणी पाजणे
पाणी सोडणें
पाण्यात पाहणें
पाण्यापरीस पातळ
पाण्यावरची रेघ
पाताळयंत्री
पाद्याला निमित्त पावट्याचें
पान न हालणें
पानी तेरा रंग कैसा ? जिसमें
मिलाया वैसा
पाप्याचे पितर
पाय काढणें
पाय धरणें
पाय पसरणें
पाय फुटणें
पायबंद घालणे
पाय मोकळे करणे
पाय मोडणें
पायरीला पाय लावणे
पायलीचे पंधरा
पायाखालची वाट
पायाखाली मुंगी मरणार नाही
पायाची आग मस्तकास जाणें
पायावर धोंडा पाडून घेणे
पायावर पाय टाकून
पायास भोवरा-असणें
पायींची वहाण पायींच बरी
पारडें फिरणें
पारणें फेडणें
पारावार नसणे
पालथा घालणें
पालथ्या घागरीवर पाणी
पावसाने डोळे वटारणें
पासगास न पुरणें
पाळतीवर असणें

पिकलें पान
पिंगा घालणें
पिंड
पिंडीं ते ब्रह्मांडीं
पिंडे पिंडे मतिर्भिन्ना
पितर उद्धरणें
पित्त खवळणे
पिशाचाच्या हातीं कोलीत
पी हळद हो गोरी
पुखा झोडणें
पुंगी बंद करणें
पुडीस जाणें
पुढे तिखट मागे पोचट
पुढच्यास ठेच, मागला शाहणा
पुराणमित्येव न साधु सर्वम्
पुराणातलीं वांगीं पुराणात
पुनरपि जननं पुनरपि मरणम्
पूतना मावशी
पूर्वदिशा
पूर्वेचा सूर्य पश्चिमेस उगवेल
पेचात धरणें
पै दक्षिणा लक्ष प्रदक्षिणा
पैजेचा विडा उचलणें
पैठणीआग्रह
पैशाचा धूर निघणें
पैशा पासरी
पोटचा गोळा
पोट जाळणें
पोट धरधरून हसणे
पोटपूजा
पोट बाधून चाकरी करणें
पोटभर अन्न, अंगभर वस्त्र
पोट सुटणे
पोटात आग पेटणें
पोटात कालवणे
पोटात कावळे कोकावणें
पोटात घालणें
पोटात धोंडा उभा राहणें
पोटात ब्रह्मराक्षस उठणें
पोटात शिरणें
पोटावर पाय देणें
पोटावारी राहणे
पोटास चिमटा घेणें
पोटीं येणें
पोपटपची करणें
पोबारा करणें
पोळी पिकणें
प्रकरण
प्रताप उधळणें
प्रथमग्रासे मक्षिकापातः
प्रथम वदे
प्रश्न पाहणे
प्रस्थ माजविणें
प्रस्थान ठेवणें
प्राणांतिक अवस्था
प्राणप्रतिष्ठा करणें
फट म्हणता ब्रह्महत्या

फडशा पाडणें
फत्ते होणें
फशीं पाडणें
फळास येणें
फरारी होणे
फाटक्या अंगाचा
फाटा देणें
फाटे फोडणें
फाद्या फोडणें
फारकत होणें
फार झालें हसू आले
फाल्गुनवाद्य
फावडयाने पैसे ओढणे
फासा टाकून पाहणे
फासा सोईचा पडणें
फुकून पाय टाकणे
फुटका मणी नसणे
फुटकी कवडी
फुटक्या कपाळाची
फुटक्या तिनीसाजा
फुटाण्यासारखे उडणे
फुली घालणे
फुले विकलीं तेथे गोवऱ्या वेचणे
फुसकुली सोडणें
फू करणें
फूल नाहीं, फुलाची पाकळी
बकध्यान
बखत पडे बाका, तो गद्धेकु कहेना काका

बगलबच्चा
बगला वर करणें
बगलेंतून काढणें
बजबजपुरी
बडा घर पोकळ वासा
बडेजाव करणे
बडे बापके बेटे
बत्तिशी
बत्तिशी रंगविणे
बत्तीस लक्षणी
बंदे गुलाम
बद्द होणे
बब वाजणें
बभ्रा करणे
बलबलपुरी
बसता लाथ उठता बुक्की
बस्तान बिघडणें
बळी तो कान पिळी
बाऊ वाटणे
बागडया भरणें
बागडया वाढणे
बागुलबोवा
बाजार करणे
बाजारात तुरी भट भटणीला मारी
बाजीरावाचा नातू
बाजू राखणें
बाणा मिरविणे
बादरायणसंबंध
बापजन्मीं

बाप तसा बेटा
बाप दाखीव नाही तर श्राद्ध कर
बापसे बेटा सवाई
बापाला बाप म्हणेना तो काकाला काय म्हणणार ?
बाबावाक्य प्रमाणम्
बायकात पुरुष लाबोडा
बार उडविणे
बार भरणे
बारभाईची खेती
बारभाईचे कारस्थान
बारशास जेवणे
बारा पिंपळावरचा मुंजा
बारा बंदरचा पाणी प्यालेला
बारा महिने तेरा काळ
बारा वाजणे
बारावा बृहस्पति
बालबाल खात्री
बालबाल खुप होणे
बालबोध घराणे
बालाग्र
बालादपि सुभाषित ग्राह्यम्
बाब्या गेला, दशम्याहि गेल्या
बावनकशी सोनें
बावळी मुद्रा आणि देवळीं निद्रा
बाहेरचा
बाहेरची बाधा
बाळकडू
बिगारीचें घोडें
बित्तबातमी
बिन भाडयाचे घर
बिब्बा घालणे
बिरबल
बिऱ्हाड उचलणे
बिऱ्हाड करणे
बिलंदर सोदा
बिवलकरी वळण
बीजांकुरन्याय
बुडीत खर्च
बुडत्याचा पाय खोलात
बुड्ढी घोडी लाल लगाम
बुदसे गई सो हौदसे नही आती
बुद्धि कर्मानुसारिणी
बुद्धीशी वैर करणे
बृहस्पति
बेगडी
बेचाळीस पिढ्या उद्धरणे
बेड फुटणें
बेतास बात होणे
बेबीच्या देठापासून
बेलभंडार उचलणें
बैठेसे बिगार भली
बैल गाभण तर म्हणे तेरावा महिना
बैल गेला व झोपा केला।
बोकांडीस बसणें
बोके सन्यासी
बोट शिरकणें
बोटावर नाचविणें।

मक्ता घेणे
मखलाशी करणे
मगरमिठी
मंगलाचरण
मउजाव
मट्टयास येणें
मढ्याच्या टाळूवरचें लोणी खाणें
मत्रतत्र लटपटणे
मत्रपुष्पांजलि
मदनाचा पुतळा
मधच्यामधे
मधाचें बोट लावणे
मधु तिष्ठति जिव्हाग्रे हृदये तु हलाहलम्
मधुमक्षिकेचें व्रत
मधून विस्तव न जाणे
मधे तोंड घालणे
मन बसणे
मन मानेल तसे करणें
मन मिळणे
मन मोठें करणे
मनःपूत समाचरेत्
मनाची नाही पण जनाची लाज
मनावर घेणें
मनात एक जनात एक
मनात गाठ बाधणे
मनातल्या मनात जळणे
मनात मांडे खाणें
मनात मांडे, पदरात धोंडे
मनातून उतरणें
मनास येणें
मनीं वसे ते स्वप्नी दिसे
मनु पालटणे
मन्वतर
मरतमढ्यासारखा
मरता मरता हातपाय झाडणें
मरेमरेसें करणे
मसणात गोवऱ्या जाणे
मस्करीची होते कुस्करी
महाजनो येन गतः स पन्थाः
महादेवापुढचा
महामाया
मळमळीत सौभाग्यापेक्षा झळझळीत वैधव्य बरे
मागून पुढून बाप नवरा
माजराच्या गळ्यात घाट कोणीं बाधावी ?
माजराचे पाय कुऱ्यावर करणें
माझें जेवण चुलींत
माडी देणे
माडीवर घेणें
मात करणें
माती करणें
मातेरें करणे
मात्रा न चालणें
मान कापणे
मानभाव
मानला तर देव नाहीतर नदी

मानसपुत्र
मानेवर सुरी ठेवणें
मामला
मायपोट
माया
मायेचा पूत
मारवाडी
माऱ्याचे हात धरवतात पण बोल-
त्याचे तोंड धरवत नाही
मारुतीचे शेपूट
मारूनमुटकून
माशाचें जाळे
माशाने गिळलेले माणिक
माशा मारीत बसणे
माशी शिकणे
माहेर
मिया मूठभर, दाढी हातभर
मिरच्या झोंबणे
मिश्यावर ताव देणे
मिश्यास पीळ भरणें
मिशी खाली उतरणें
मी मी म्हणणारे
मुका मुलगा होणे
मुक्ताफळें
मुगीच्या पावलाने
मुगीला मुताचा पूर
मुगी होऊन साखर खावी
मुग्या येणें
मुखमस्तीति वक्तव्यम्
मुखरस पाघळणें
मुखशुद्धि
मुखस्तभ
मुठींत ठेवणे
मुडी मुरगाळणें
मुलाचे पाय पाळण्यात दिसतात
मुली उजविणे
मुलगी गळ्याशी लागली
मुष्टिमोदक
मुसक्या बाधणे
मुमळाला अकुर फुटणे
मुळावर येणे
मुळावर जन्मणे
मूग गिळणे
मूठ दाबणे
मूठमाती देणें
मूर्ति तितक्या प्रकृति
मूले कुठार.
मेख मारणे
मेतकूट जमणें
मेलेलें अन्न
मेल्या आईचें दूध प्यालेला
मेल्या म्हशीस मणभर दूध
मेषपात्र
मोगलाई
मोट बाधणें
मोडशी जिरविणें
मोत्याची ओळ
मोर नाचतो म्हणून लाडोरहि नाचते

शेणामेणाचा
शेदाड शिपाई
शेपूट घालणे
शेर
शेरास सव्वा शेर
शेलापागोटे
शेष कोपेन पूरयेत्
शेळी जाते जिवानिशीं, खाणारा
 म्हणतो वात्तड
शोभा करणे
श्रीगणेशा
श्रीमुख
श्रीमुखात देणे
षट्कर्णी होणे
सब घोडे बारा टक्के
सक्कात बसणे
सगळे मुसळ केरात
सगनमत करणे
सगळीं सोंगे येतात पण पैशाचे सोंग
 आणता येत नाही
सटवाईचीं अक्षरें
सटवी
सटीसामासीं
सनीचे वाण
सत्तेपुढे शहाणपण
सत्त्व घेणें
सत्त्वास जागणें
संन्याशाची पुडी
सपुष्टात येणे

समाचार घेणे
समानशीले व्यसनेषु सख्यम्
समीकरण बसविणें
समुद्रात जाऊन कोरडा
समुद्रात सुई शोधणे
समूल च विनश्यति
सर करणे
सर येणे
सरासरी गुडघाभर पाणी
सर्वारम्भास्तण्डुलाःप्रस्थमूलाः
सवतीमत्सर
सवा मणाची खिडी
सव्यापसव्य करणे
ससेमिरा लागणे
सळो का पळोसें करणे
साखरझोप
साखर पेरणे
साखरेचा खाणार त्याला देव देणार
साखरेची सुरी
सागड घालणे
सांगितल्या कामाचा
साठी उलटणे
साडेतीन मुहूर्त
साडेतीन शहाणे
साडेसाती
सात ताड उंच
साता समुद्राच्या पलीकडे
साता सायासांनीं
साप साप म्हणून भुई झोडपणें

साबाचा अवतार
साबापुढचा
सावळागोंधळ
साळकाया माळकाया
साळकोजी माळकोजी
साळसूद
सिंहावलोकन
सुखं च मे शयनं च मे
सुतळीचा तोडा
सुताने स्वर्गास गाठणे
सुताने सूत लावणें
सुपारी देणें
सुंभ जळेल पण पीळ जळणार नाही
सुळावरची पोळी
सूचाल्या करणें
सूत असणें
सूतोवाच करणें
सूप वाजणें
सूर वाहणे
सूर्यवंशी
सूर्याची पिले दाखविणें
सूर्याचे पोटीं शनीश्वर
सैरावैरा
सोडवून ठेवणें
सोनाराने कान टोचणे
सोनें होणें
सोन्याचा दिवस
सोन्याचा धूर निघणे
सोन्याहून पिवळें
सोस करणें
सोळा आणे
सोक्षमोक्ष होणें
स्तोम माजविणें
स्मशानवैराग्य
स्वतः मेल्यावाचून स्वर्ग दिसत
नाही
स्वभावो दुरतिक्रमः
स्वर्ग दोन बोटे उरणे
स्वर्गास हात पोचणे
स्वाहा करणे
हजीर तो वजीर
हट्ट जिरणें
हट्टास पेटणे
हडीबाग
हत्तीचे मढे
हत्ती झुलणे
हपापाचा माल गपापा
हबेलडी उडणें
हमरीतुमरीवर येणे
हरताळ पडणे
हरताळ लावणे
हरभऱ्याच्या झाडावर चढविणे
हरामाचा माल
हलक्या कानाचा
हलवायाच्या घरावर तुळशीपत्र
हंसक्षीरन्याय
हसत हसत दात पाडणे
हसतील त्याचे दात दिसतील

# वाचन

---

अथास्य तत्त्वेषु कृतेऽव भास । समुन्मिमीलेव चिराय चक्षु । *

**किरातार्जुनीय**

(१) विषयस्वरूप (२) व्युत्पत्ति (३) दोन लाभ (४) मनोरजन. (५) इतर प्रकाराची तुलना (६) दुसरा लाभ–ज्ञान (७) विशेषत निरूपण (८) मराठींतील ग्रंथसग्रह (९) हल्लीचा वाचनाचा प्रघात (१०) त्याची खरी रीत

१. प्रस्तुत अकात वाचन म्हणजे वाचण्याची कला याविषयी लिहावयाचे नाही, म्हणज उत्कृष्ट वाचनाचे जे काही नियम आहेत ते दाखल करून त्याचा उपयोग सागणे हा याचा उद्देश नाही. तर ग्रथ वाचण्याचा निरतर नाद असणे ह किती हितावह आहे, तो प्रघात आपल्या लोकात किनपत आहे, वाचावयाचे ग्रथ कसे असावे, ते वाचावे कसे, वगैरे गोष्टींविषयी या निबधात विचार करू.

२. येथे पहिल्याने 'वाचन' या शब्दाची व्युत्पत्ति अमळ चमत्कारिक आहे ती सागतो. हा शब्द अर्थातूच 'वच्' (बोलणे) या धातूपासून निघाला आहे, आणि हे रूप प्रयोजक रूपावरून साधलेले क्रियावाचक नाम होय. तेव्हा 'वाचन' म्हणजे 'बोलवणे': 'पुस्तक वाच' म्हणजे 'पुस्तकास बोलव' असा अर्थ ! यावरून कागदास किंवा कागद तरी कसचा !– वृक्षत्वचास वगैरे बोलते करण्याची लेखनकला जेव्हा पहिल्याने निघाली, तेव्हा आपल्या पूर्वजास जे आश्चर्य वाटले ते वरील शब्दात गर्भित होते.

---

* "याप्रमाणे तत्त्वाचा बोध होऊन त्याच्या हृदयात ज्ञानप्रदीप उजळला असता त्याचे फार दिवस मिटलेल डोळे जणा काय एकदम उघडले !

§ 'लेखन' हा शब्द तरी 'वाचन' शब्दाप्रमाणच ऐतिहासिक म्हणजे पूर्वस्थितिसूचक होय 'लिख्' म्हणजे 'ओरडण', यावरून लिहिण्याचा प्रघात पहिल्याने झाडाच्या साली वगैरे कठीण पदार्थावर झाला ह उघड दिसतें

३. असो, आता मुख्य विषयाविषयी विचार करू. वाचनापासून लाभ कोणकोणते आहेत ते सर्वांस विदितच आहेत. ते मुख्यतः दोनः– एक मनोरंजन आणि दुसरा ज्ञान. आता याविषयी अनुक्रमेकरून लिहू.

४. पहिलें मनोरंजन. याचा अनुभव थोडाबहुत बहुधा सर्वांस असेल. लहान वयात तर ही गोष्ट विशेषतः अनुभवास येते लहान मुलास प्रथमतः वाचता येऊ लागले म्हणजे पुस्तके वाचण्याची त्यास केवढी हौस वाटत असते हे सर्वांनी पाहिलेच असेल. अक्षरओळख होऊन आपणास वाचता येऊ लागले हीच अगोदर मोठी गोष्ट मिळविलीशी वाटून तिज-बद्दल त्यास मोठाच हर्ष व अभिमान वाटू लागतो त्या भरात त्यास जी उमेद व हौस वाटत असते ती त्याच्या विद्याभ्यासास फार उपयोगी पडते त्या मौजेच्या काळीं मनोरंजन व ज्ञान ही दोन्ही एकरूपच असतात. म्हणजे पुढील वयात ज्ञानसंपादनाची हौस कमी होऊन अभ्यास करण्याचा जसा त्रास येतो, तसे त्या वेळेस मुळींच न होऊन नव्या गोष्टी शिकणे हें मनास केवळ रंजन करणारेच होतें. शरीराने ती जशी चपळ असतात,–सुस्त बसणे बिलकूल न आवडून काही ना काही तरी त्यास करीत असल्यावाचून चैनच पडत नाही, त्याचप्रमाणे त्याच्या मनाची स्थिति असते ज्ञानग्रहण करण्यास त्याचे कोवळे मन तेव्हा इतके प्रवीण असते कीं, व्याकरण, भूगोल, गणित वगैरे जे नीरस शुष्कप्राय विषय तेहि त्यास मोठ्या मजेचे वाटून मनोरंजक गोष्टींप्रमाणेच त्याविषयींहि त्यास जी हौस वाटत असते ती काही पराकाष्ठेची ! वरील दोन्ही गोष्टी जगन्नियंत्या परमेश्वराचें त्याने निर्माण केलेला क्षुद्र प्राणी जो मनुष्य त्याच्या कल्याणाकडे केवढे लक्ष आहे याविषयीं प्रमाणभूत होत. मनुष्य जन्मास आल्यापासून तो स्वतःविषयी खबरदार होईपर्यंत मध्यंतरीं पुष्कळ काळ जातो. हा काळ लहानपण होय. यात ईश्वराचा असा संकेत उघड दिसतो कीं, मनुष्याच्या पुढील संसारात उपयोगी असें शारीर व मानसिक सामर्थ्य त्याने या काळात संपादन करून ठेवावे. असो, तर ज्याप्रमाणे मुलास उडण्याबागडण्याची अतोनात हौस असते, त्याप्रमाणेच त्याच्या मनासहि त्या वेळेस स्वभावतःच मोठी प्रबळ जिज्ञासा वाटत असते. ह्या दोहोंचा नीट उपयोग करून घेणे हें

सुजाण मातापितराचें व शिक्षकाचें काम आहे. असो, तर वाचनापासून मनोरंजन केवढें होते हा लहानपणचा अनुभव सर्व सुशिक्षित लोकास अर्थात् आहेच. पण इतकेच नव्हे, ती लहानपणची सवय नीट वाढविली असता अगदी शेवटपर्यंत ती मनुष्यास मारखी खिळून राहते. आजपर्यंत जे मोठमोठे ग्रंथकार होऊन गेले ते बहुतकरून सर्व मोठे जब्बर वाचणारे होते असें आढळेल. यात वस्तुतः पाहता काही आश्चर्य नाही. कारण कोणाची बुद्धि केवढीहि उज्ज्वल असली, तरी खाणीतल्या हिऱ्याप्रमाणे तीवर जर काहीच संस्कार घडला नाही तर तिचे तेज कधीहि प्रगट होणार नाही किंवा दुसरा दृष्टान्त घ्या जमीन मोठी पिकाऊ आहे पण तिची नीट मशागत करून जर तीत काहीच पेरले नाही, तर अर्थात्च नुसतीं गवतझाडें किंवा काटेकुटे हे मात्र तिजवर उगवतील ! तर याप्रमाणेच विशाळ बुद्धीचे महान् ग्रंथकर्ते जे आजपर्यंत होऊन गेले त्यास वरील गोष्ट पुरतेपणी अनुभवास येऊन आपल्या मनास ज्ञानाचा संस्कार अधिकाधिक करताना ते कधी थाबले नाहीत ग्रंथवाचन हेच त्यास परम सुखकर वाटून त्याशिवाय त्यास चैनच पडू नये इटाली देशात सुमारे पाचशे वर्षांपूर्वी पेट्रार्क नामेकरून एक मोठा नामांकित कवि होऊन गेला त्याविषयी अशी एक गोष्ट लिहिली आहे की तो एकदा आपल्या एका मित्राच्या येथे राहिला असता त्याची प्रकृति अमळ बिघडलीशी पाहून तो मित्र त्यास म्हणाला, "तुम्हाला बरे वाटत नाही, यास्तव दहा दिवसपर्यंत तुमचीं बुकें, कागद, लेखणी, शाई ही मला अडकवून ठेवू द्या" पेट्रार्क् बरे म्हणाला. मग त्याने तसे केले असता पहिला दिवस पेट्रार्क्चा मोठा कंटाळवाणा गेला. दुसऱ्या दिवशीं भारी डोकें दुखू लागले, आणि तिसऱ्या दिवशीं तर बारीक ताप भरू लागला ही अधिकाधिक चिन्हें पाहून त्या मित्रास मोठा धाक पडला आणि त्याने मुकाट्याने त्याच्या पुस्तकालयाची किल्ली त्याच्या पुनः स्वाधीन केली दुसऱ्या दिवशी तो कवि पुनः पहिल्यासारखा हुशार झाला. असो, तर याप्रमाणे विद्याप्रिय लोकाचा पुस्तकाविषयी अतोनात हव्यास असतो.

५. आता या मनोरंजनाच्या प्रकारात व इतर जे लोकात चालू आहेत त्यात किती भेद आहे तो पाहू. कालक्रमण करण्याचे प्रकार विद्वज्जनाचे

कोणते व तदितरजनाचे कोणते याविषयी एका संस्कृत कवीने म्हटले आहेः—

काव्यशास्त्रविनोदेन कालो गच्छति धीमताम् ।
व्यसनेन तु मूर्खाणां निद्रया कलहेन वा ॥

"बुद्धिमान् जे आहेत त्यांचा काळ काव्य किंवा शास्त्र यांचे अध्ययन, अथवा विनोद या तिहीत जातो, आणि मूर्खांचा म्हटला म्हणजे व्यसनात, निद्रेत किंवा कलहात !" हें वचन अगदी यथार्थ आहे यांत संशय नाही. अज्ञ किंवा अल्पज्ञ जे लोक असतात त्यांचे नेहमीचें वर्तन जर पाहिले, तर वरील श्लोकाच्या उत्तरार्धांत त्यांचा बहुधा समावेश होईल आणि एकंदर जगांत पाहिले असतां, अशांचीच कोटी फार फार मोठी आहे. वरील श्लोकाचें पूर्वार्ध ज्यांस खरोखरी लागेल असे लोक किती थोडे ! त्यातून आमच्या हिंदुस्थानांत तर कांहीं विचारूच नये. यूरोपखंडांत वगैरे अलीकडे विद्येचा पुष्कळच फैलाव झाला असल्यामुळे काळाचा वर सांगितल्याप्रमाणें सद्व्यय करणारे तिकडेच काय सांपडतील ते सांपडतील बाकीच्या जगाच्या बहुतेक भागांत दुसऱ्या चरणाचेंच फार करून प्राबल्य आढळेल. आमच्या देशांत जुन्या पद्धतीचे जे लोक आहेत त्यांचा एकंदरीत पाहतां वाईटच काळ जातो असें म्हणतां येणार नाही, तरी त्यांचा विद्याभ्यास फारच तोकडा असल्यामुळे ज्ञानापासून होणारा जो परमानंद त्याचा अनुभव त्यांस कधींहि घडत नाही. विद्येचें स्वरूप कांहीं ज्यांस कळतें म्हणावयाचें असे जे शास्त्री, पंडित वगैरे त्यांचीहि शिकण्याची पद्धति कांहीं विलक्षणच असल्यामुळे वरील आनंद त्यांच्याहि म्हणण्यासारखा अनुभवास येत असेलसें वाटत नाहीं. ही साधारण एकंदर लोकांची स्थिति झाली. श्रीमंतांची व विशेषतः संस्थानिकांची जर आमच्या देशांतली स्थिति पाहिली, तर ती फारच शोकास्पद वाटेल. सगळ्या देशभर जी लहानमोठ्या राजेरजवाड्यांची रांग लागत गेली आहे त्यांत चांगले हुशार तर काय, पण सरासरी समजूत तरी ज्यांस आहे असेहि फारच थोडे निघतील ! मागें त्यांस मोठ्या जोखमीचीं सरकारी कामें करायाचीं पडत, शत्रूचें निरंतर भय असे, त्यामुळे त्यांस सतत हुशारीनें राहवें लागे पण सध्याच्या काळीं वरील दोन्ही प्रकार बिलकूल नाहींसे झाल्यामुळे पोरासोरांची व अज्ञान लोकांची

जी कल्पना कीं, राजाला म्हणजे काही करायाला नको, जेथे तेथे चाकर, निरतर पक्कान्नें खावीं, ख्यालीखुशाली करावी, इतकेंच त्याचे काम, ती दिवसेंदिवस पूर्णपणे खरी होत चालली आहे! 'तुम्ही काय राजे आहां' या वाक्यात 'राजे' शब्दाचा जो अर्थ तो दिवसेंदिवस अधिकाधिक यथार्थ होत चालला आहे. असें झाल्यावर मग राज्यातील व्यवस्था किती उत्तम असेल, व दरबारातलीं मनुष्यें कशा प्रकारचीं असतील, याची कल्पना सहज-च करता येईल, व वर्तमानपत्रद्वारे ते बहुतेक प्रकार सर्वांस विदित होता-तच. असो, तर मग अशा ठिकाणी वरील श्लोकाचें कोणते अर्थ लागतें तें आमच्या वाचकास फोडून सागावयास नकोच!

वरील लेखावरून हे ध्यानात येईलच की, खरे जें विद्यासुख ते जुन्या पद्धतीच्या लोकास बहुतकरून मुळीच माहीत नाही. वास्तव मनोरजनाचें हें मोठे साधन त्यास अगदी अंतरते. आमच्या मराठींत वाचण्याचे ग्रथ मुळीच नव्हते असे नाही, पण ते अगोदर थोडे, आणि त्यातून दुर्मिळ. गद्यग्रथ म्हटले म्हणजे इतिहासाच्या किंवा पौराणिक विषयाच्या बखरी, आणि पचोपाख्यान, विदुरनीति वगैरे तीन चार पुस्तकें इतकीच काय तीं. पद्यग्रथ वरच्याहून पुष्कळ होते खरे, पण त्याचा संग्रह म्हटला तर हरदास वगैरे लोकापाशींच काय तो. छापखान्याचे उत्कृष्ट साधन अनुकूल नसल्यामुळे जें आपणास हवे असेल ते हाताने उतरून घेतल्याखेरीज सोय नसे पण या सर्वांहून जबरदस्त अडचण म्हटली म्हणजे लोकशिक्षणाचा मुळीच प्रघात नसल्यामुळे लोकात विद्याभिरुचीचा जो मुळीच अभाव होता तो होय. सरासरी काव्यव्युत्पत्ति पुष्कळास असल्यामुळे पुराणादि ग्रथ, तसेच ज्ञाने-श्वरी आदिकरून प्राकृत ग्रथ, हजारो लोक वाचीत, व अजूनहि वाचतात, पण ते केवळ पारमार्थिक बुद्धीने. म्हणजे तसें करणे हें पुण्यकर्म आहे येवढेच समजून तें करायाचे. अर्थज्ञान किंवा रसानुभव घेऊन वाचणारे फारच थोडे. असो, तर याप्रमाणे ग्रथवाचनरूप जो करमणुकीचा उत्तम मार्ग तो पूर्वीच्या लोकास मुळीच अनुकूल नसल्यामुळे सोंगट्या, बुदबळें वगैरे खेळ, कैफ, किंवा व्यभिचार अशींच पोरकट, निंद्य, व लज्जास्पद साधनें त्यास जवळ करावीं लागत. फार तर काय, पण अजूनहि नेटिव सस्थानातून बहुतेकात वरील प्रकार भरपूर आढळून येतात. त्याचें केवळ

दिग्दर्शन करणें हें सुद्धा एतद्देशीय मनुष्यास अत्यत लज्जेचें व खेदाचें काम होईल.

तर याप्रमाणे वाचनाचा पहिला मोठा उपयोग म्हटला म्हणजे त्याच्या योगाने चित्ताचे उत्कृष्ट रजन होऊन दुसरे जे अज्ञान व मूर्ख लोकाचे शेकडो करमणुकीचे उपाय त्याची बिलकूल गरज राहत नाही. भर्तृहरीने एके ठिकाणीं म्हटले आहे—

सुकविता यद्यस्ति राज्येन किम ।

" उत्कृष्ट कविता जर आहे तर तीपुढे राज्य काय ?" हेच वचन बाकीच्याहि सर्व प्रकारच्या ग्रथास लागेल. खरा रसिक व विद्वान् हा आपल्या पुस्तकालयात बसून ग्रथवाचनात निमग्न झाला असता त्यास त्या वेळेस जे सुख होत असेल, ते मोठ्या सार्वभौम राजास भर दरबारात राज्यासनावर बसल्यापासूनहि नसेल ! आणि खरोखरच नुसत्या सुखाच्या संबधानेहि पाहता ते विद्येपासून जितके साध्य होते तितके राज्यापासून होणे नाही. रोमन लोकाचे लोकसत्तात्मक राज्य बुडून बादशाही अमल सुरू झाल्यावर पुढे जे कित्येक बादशाहा झाले त्याची हकीकत वाचली असता वरील उल्लेखाची प्रचीति कळून येईल त्याची सत्ता त्या वेळच्या बहुधा साऱ्या जगावर असताहि त्यास रात्रदिवस चैन पडू नये. शेकडो राजोपचार निरतर चालले असता त्याचा त्यास अगदी वीट येऊन त्यानी नाना तऱ्हेचे फद व चाळे करावे. झर्सीज् नामेंकरून जो पारसीकाचा राजा होऊन गेला, ज्याने वीस लक्ष सैन्य जमा करून ग्रीस देशावर स्वारी केली, त्याविषयी अशीच एक गोष्ट लिहिली आहे, की जो कोणी एकादा नवा करमणुकीचा खेळ काढील त्यास त्याच्याकडून मोठें बक्षीस मिळे. असो, तेव्हा एकदरींत स्पष्ट काय दिसते की, केवळ शारीरसुखें स्वभावत च अल्पकालिक होत, त्याचा तेव्हाच वीट येऊन मन लवकरच उदास होतें. मौजेच्या खेळाचीहि गोष्ट तीच. व्यसनें तर याहूनहि भयकर, त्याच्या योगाने शरीरास बहुतकरून जन्माचा अपाय होऊन निरतर जिवास खाण्याचें मात्र साधन पैदा होते. तेव्हा वरील कोणताहि दोष नसून उलटें अत्यत शुद्ध, अत्यत प्रतिष्ठादायक, आणि अत्यत मनोरंजनावह असें करमणुकीचे साधन एक वाचन मात्र होय.

६. दुसरा लाभ ज्ञान. हें संपादन करण्यास ग्रंथवाचन एक मोठें साधन आहे हे उघडच आहे. सिसरोने एके ठिकाणीं म्हटले आहे की, लेखनकला जर नसती, तर मुळारंभीं जी जगाची स्थिति होती तिजपेक्षा पुढे पाऊल पडतेच ना उघडच आहे सांप्रतकाळीं मानवजाति जी येवढ्या उत्कर्षास पोंचली आहे त्या सर्वांचा मूळ पाया पाहिला तर बावन्न मातृकाच होत! हल्लींच्या काळाच्या आश्चर्यकारक सुधारणेची जी येवढी भव्य इमारत उभी आहे ती असंख्य कारागिराच्या श्रमाचे फळ होय! मागल्याने रचलेले थर पुढच्याच्या उपयोगी पडावे अशी आजपर्यंत अनादिसिद्ध परंपरा चालत आली आहे. व हीस एक कारण काय ती लिहिण्याची अमोलिक कलाच होय ही नसती तर आज लक्षावधि महाबुद्धिमान् लोकाचे अत्यंत परिपक्व विचार आपणास नाहींसे झाले असते! प्रख्यात ग्रंथकार लॉर्ड बेकन् याने एके ठिकाणी या मूळाक्षरास जहाजांशीं तुळिले आहे, आणि म्हणतो की, या जहाजांनी कालरूप समुद्राच्या फार दूरदूरच्या बंदरावरून आपणाकडे माल आणून यापुढेहि तशाच अत्यंत दूरच्या बंदरात तो तीं पोंचवितील! असो, तर याप्रमाणे सर्व काळच्या व सर्व देशाच्या महान् महान् लोकांची आपणास हवी तेव्हा, हवी तेथे, हवी तेवढी वेळ परमानंदकारक संगति होण्याची जी अद्भुत सोय सर्वांस झाली आहे तिचे मोल किती म्हणून सांगावे! त्यातून अलीकडे तर मुद्रणकला, अग्निरथ वगैरे अनेक साधनांनी वरील सुख तर चोहोंकडे होऊन केवळ दारिद्र्यावस्थेत असणाऱ्या मनुष्यासहि ते अनुकूल झाले आहे. तसेच विद्येच्या सर्व शाखावरहि अलीकडे ग्रंथ होऊन काही अमुक शाखाच पढल्याच्या योगाने पूर्वीच्या काळीं बुद्धीवर जो संकुचितत्वाचा वाईट संस्कार घडत असे तोहि हल्लींच्या काळीं नाहींसा करण्याची सोय होऊन, अलीकडील शिक्षणपद्धतीचा मुख्य रोख तोच आहे. आपल्याच देशातील पूर्वीची स्थिति पाहिली तर विद्याभ्यासाची यत्ता निदान तरी बारा वर्षे होती. तितका काळपावेतों गुरूच्या घरीं राहून एकनिष्ठेने जेव्हा अध्ययन करावें तेव्हा काही म्हणण्यासारखी विद्वत्ता शिष्याच्या ठायीं यावी आणि इतकेंहि करून बहुधा कोणत्या तरी एकाच शास्त्रात त्याची गति! न्याय आहे तर व्याकरण नाही, व्याकरण आहे तर मीमांसा नाही, असा प्रकार अर्थातच होत असे. कारण जे शास्त्र हातीं धरावयाचें

तें शेवटास पोचविल्यावाचून थांबायाचेंच नाही. ही त्याची शिक्षणपद्धति पुष्कळ तऱ्हेवाईकच होती यांत संशय नाही. तिचा एक मोठा गुण होता खरा, कीं जेवढें म्हणून कोणी शिकेल तेवढें अगदी ठाम, एकदा त्याचें पठण झालें म्हणजे त्यांत लेचेपेचेपणा बिलकूल राहायाचा नाही, कोणतेंहि शास्त्र घेतलें की, त्यावरील मुख्य ग्रंथ, उपग्रंथ, टीका प्रतिटीका, वगैरे जेवढे म्हणून ग्रंथ असतील तेवढे पार मुखोद्गत केल्यावाचून प्रायः सोडायाचे नाहीत. मुळीं परंपरेनेंच तशी वहिवाट चालत आलेली ! गुरु आपल्या आसनावर बसून पंक्ति सांगायाला लागले म्हणजे शिष्याच्या हातांत जेवढें पुस्तक असेल तेवढेंच काय तें, गुरूंनी म्हणून पाठ सांगतांना पोथी हातीं धरायाचीच नाही तसे करावें लागले तर तो गुरु कसचा ? असो, तर असाच बाणा पूर्वीपासून चालत आलेला असल्यामुळे पुढे जे शिष्य गुरु-स्थानापन्न होतात तेहि तो तसाच पुढे अबाधित चालवतात. याप्रमाणे अलीकडची जी पोपटपंची तीस पूर्वी मुळीच थारा न मिळून जे कोणी पंडित होत ते आपआपल्या शास्त्रांत केवळ निष्णात असेच होत. अलीकडील इंग्रेजी युनिव्हर्सिटीच्या पद्धतीने म्हटले म्हणजे हवा तो विषय ज्यास अवगत आहे असे विद्वान् तयार करावयाचे हमालाचे जसे टप्पे असतात त्याप्रमाणे आधीच निःशक्त झालेल्या आमच्या गरीब विद्यार्थ्यांवर वर्षानुवर्ष अधिकच विषयांचें ओझें लादून त्यांनी अमुक दिवसांत अमुक मजल मारली पाहिजे असा ठराव झालेला असतो. मग विद्यार्थीहि निरुपायास्तव जेमतेम करून तेवढी यातायात करतात, पण एकदा सुटले म्हणजे बुकांना जी एकदा रजा मिळते ती मिळते. त्यांच्या कृपाळू आईने येवढा खटाटोप करून जे नाना विषयांचे ज्ञान त्यांचें ठायीं सांठविलें असतें तें लवकरच घालवून ते बहुधा पहिल्या सारखेच पुन्हा लखलखीत होऊन बसतात ! असो, तर या मानानें पाहतां पहिली एकधोरणी रीतच काही अंशीं बरी होती असें आम्हांस वाटतें. तरी अलीकडील जे सर्व विषयांवर उत्कृष्ट रीतीनें लिहिलेले ग्रंथ युरोपांतील भाषांत झालेले आहेत त्यांच्या योगानें फार काळ व श्रम न पडतां मनुष्याचें मन विशाल व बहुश्रुत होतें, व पूर्वीच्या पद्धतीनें मनास जडणारे जे वेडेपणाचे ग्रह व दुष्कल्पना त्या यामुळे बहुतेक नाहीशा होऊन जातात हा लाभ लहान-सान म्हणतां येत नाही.

७. याप्रमाणे प्रकृत विषयाविषयी सामान्यतः काही विचार प्रदर्शित केले आता खुद्द आपल्या स्वतःच्या स्थितीविषयी काही लिहून हा विषय सपवितो.

८. आता पहिल्याने हें उघडच आहे की, वाचन म्हटलें म्हणजे अगोदर भाषेत ग्रंथसंग्रह पाहिजे. आमच्या मराठींत तो मूळचा कोणत्या प्रकारचा होता हे वर लिहिण्यात आलेच आहे. तसेंच अलीकडे तो कोणत्या प्रकारचा झाला आहे व होत आहे याविषयींहि प्रस्तुत मालेच्या पहिल्या दोन अंकात काही लिहिले आहे आता हा ग्रंथसंग्रह सगळा एकंदरींत धरला तरी अर्वाचीन युरोपियन भाषांशीं किंवा संस्कृतादि प्राचीन भाषांशी त्यासंबंधाने आमच्या गरीब मराठी भाषेस टक्कर मारता येईल हे अगदी संभवत नाही खरे, तरी सध्याच्या स्थितींतमुद्धा तीस आपल्या दारिद्र्यास्तव केवळ खालींच पाहायास हवे असें आम्हास अगदी वाटत नाही. एतद्देशीय इतर भाषांत तर तिच्याहून कोणत्याहि संबंधे वरचढशी भाषा एकहि नाही असे आम्हास वाटते, तसेंच सुमारे तीन चारशे वर्षांपूर्वी इंग्लिश वगैरे युरोपियन भाषांची जी स्थिति होती तीपेक्षाहि सध्यादेखील तिची स्थिति बरी आहे. सारांश, केवळ अज्ञानास्तव, दुराग्रहास्तव, व आळसामुळे मराठीचा जे तिरस्कार करू पाहतात व तिची ज्यास मोठी लाज वाटते त्यास तसे करण्यास वरच्याशिवाय दुसरे कोणतेंहि समर्पक कारण नाही हें त्यांनी पक्के समजावे. तसेच जे फाकडे नवीन विद्वान् जुन्या शालजोडीवाल्या शास्त्र्याप्रमाणे मराठी भाषेवर नाक मुरडतात त्यावर दोन प्रकारचा दोष येतो. एक तर जिचे ज्ञान आपण पुरतेपणीं कधीहि संपादन केले नाही तीस विनाकारण दूषण देणें हे, आणि दुसरे असे की जी न्यूनता त्यांनी पूर्ण करायाची ती न केली हें तर एकीकडेच राहिले, पण पुन. तीबद्दल भाषेसच दोष! भाषेच्या अंगीं रानातील जमिनीप्रमाणे तर शक्ति नाही ना! कीं तींत जसे गगनचुंबित वृक्ष आपोआप उत्पन्न होतात व वाढतात त्याप्रमाणे मोठमोठे ग्रंथ भाषेंत आपले आपोआप व्हावेत! काव्यें, नाटकें, कादंबऱ्या, शास्त्रीय ग्रंथ हे केवळ स्वतःच उत्पन्न व्हावे, मनुष्याच्या श्रमाची म्हणून त्यास बिलकूल गरज लागू नये, असा जर सृष्टीचा नियम असता, तर वरीक वरील मराठी-वरचीं दूषणें ठीक होतीं! पण अशी स्थिति मुळीच नाही हे स्पष्ट आहे.

लोकांचे आपल्या ग्रंथावर नानाप्रकारचे अभिप्राय ग्रथकाराने निमूटपणे ऐकून का घेऊं नये ? अथवा दुसरा दृष्टान्त. रगभूमीवर नाटकपात्र आले असता त्याच्या अभिनयाची, किंवा एखाद्या सभेत कोणी वक्ते उठून त्यानी भाषणास आरंभ केला असता त्याच्या वक्तृत्वाची परीक्षा करण्याचा अधिकार सर्व श्रोत्यास नाही काय ? आणि समजा कीं, वरील दोघेजण आपआपल्या कलेत अत्यंत निपुण असताहि सगळयानी टाळ्या व पिटल्या त्याची हुरेंवडी करून दिली, तरी त्याबद्दल आपली मानहानि झालीशी वाटून त्या दोघानी सर्व लोकावर बेअब्रू केल्याची जर फिर्याद केली, तर तें त्यास किती शोभेल, व कोर्ट तरी त्यास काय जबाब देईल ? तर या वरील तीन दृष्टान्तावरून आमच्या वाचकाच्या तेव्हाच लक्षात येईल कीं, कोणाच्याहि ग्रथावर कोणास हवे त्यास हवा तसा अभिप्राय प्रगट करण्याची पूर्ण मोकळीक आहे.

वरील गोष्ट इतकी स्पष्ट असताहि पुष्कळ लोकास व त्यातून विद्वान् व ज्ञाते म्हणविणाऱ्यापैकींहि कित्येकास, चागलीशी कळत नाहीशी दिसते. काही वर्षांपूर्वी 'विविधज्ञानविस्तारा'च्या एका अकात मोरोपताविषयी काही मजकूर लिहिला होता. त्यात लिहिणाराने त्या कवीवर काही खरीं व काही केवळ शुष्क अशीं दूषणे दिलीं होतीं तीं त्या कवीच्या भजकास न आवडून त्यापैकी एकाने एके पत्रात असा मजकूर प्रसिद्ध केला होता की, पताचे कोणी पुरस्कर्ते जर या वेळेस असते तर त्यानी वरील लिहिणारावर बेअब्रू-बद्दल फिर्याद ठोकली असती, पण तसें नसल्यामुळे हवे त्याने त्यावर हवे तसे दोषारोप करावे अशी स्थिति झाली आहे. ही वेडी समजूत त्या लिहि णारास वरील गुन्ह्याचे स्वरूप पुरते माहीत नसल्याच्या योगाने जडली हे उघडच आहे. असो, वरच्याप्रमाणेच मागे जीं काही मराठी कवींस आम्हीं दूषणे दिलीं आहेत तीं पाहूनहि कित्येक नाखुप झाले असे आमच्या कानी आलें आहे. पण गुणदोषविवेचनाच्या अधिकाराविषयी वगैरे जो मजकूर वर लिहिला तो सगळा लक्षात आणला असता आम्ही केले ते गैर केलें अशी समजूत थोड्याचीच होईल, असा आम्हास भरवसा आहे. पण वरील अज्ञान यापूर्वी आमच्या नजरेस पुष्कळच आले. कित्येकानी मोठ्या गभीर मुद्रेने आम्हास लायबेलचा आक्ट वाचण्यास सागितले, कित्येकानी असा धाक घातला कीं, हें जर सरकारच्या कानी गेलें तर मोठे कठीण जाईल, कित्ये-

कास असें भय पडलें कीं, त्यातील मजकूर लिहिण्यास आम्हास कोठून बुद्धि सुचली कोण जाणे, कित्येकानी पुस्तक बद केलें जाईल असाहि भविष्यवाद केला ! आमच्या दयाळू व सत्याभिमानी ख्रिस्ती बधूनी तर आम्हावर जी तरवार उगसली ती तर अतीच भयंकर ! एखाद्या लुच्चाची ठकविद्या जाणून त्याची पुंगी कोणी बद केली असता त्याचा जसा माथा फिरून जावा त्याच-प्रमाणे लोकात ज्ञानाचा उदय करणारे व सत्याचा दीप पाजळणारे आमचे बंधु अगदी खवळून गेले, आणि त्याच्या शुभवर्तमानावर जे आम्हीं काही आक्षेप काढले ते नाहीसे करून ख्रिस्ती धर्माचे सत्यत्व प्रतिपादन करण्यास जो त्यानी खटाटोप केला त्यास भगीरथप्रयत्न म्हणण्यास काही हरकत नाही. इतकेंच मात्र कीं, वरील शब्दात कार्याच्या सिद्धीचा जो अर्थ गर्भित होतो तो बरीक वरील ठिकाणीं लागू पडत नाही ! असो, एकंदरींत वरील प्रसगावरून आमचे लोकास आपले हक्क कितपत समजतात, व एकदा कायम होऊन बसलेलीं जीं मतें तीं सोडण्यास केवढा आयास पडतो, हे स्पष्ट कळून येते

आम्हीं अद्याप लायबेलचा आक्ट वाचला नाही, व पुढेहि वाचू कीं नाही याचा सशयच आहे. पण आम्हास येवढे स्पष्ट कळते आहे कीं, जर मेकॉले, जॉन्‌सन् वगैरे हजारो मोठ्या थोर मानलेल्या ग्रथकारानी आपआपल्या ग्रथातून मोठमोठे कवि, इतिहासकार, तत्त्वज्ञ इत्यादिकाविषयी हवा तेवढा कडक मजकूर लिहिला आहे व तो सर्वास मान्य आहे, जर पोप कवीने खुद्द बेकन्‌ला उद्देशून,

"The greatest, brightest, meanest of mankind"

"सर्व मनुष्याहून अति बुद्धिमान्, अति चतुर, आणि अति नीच !" असे म्हटले असताहि जर पोपवर बेअब्रू केल्याचा गुन्हा येत नाही, व त्या जगद्विख्यात अद्वितीय पडिताची विद्वान् लोकातील कीर्तिहि लवमात्रसुद्धा कमी होत नाही, तर मेकॉले, मिल्ल यासारखे ग्रंथकार केवढेहि मोठे असले व त्यास आम्हीं कितीहि शिव्या दिल्या असल्या, तरीहि पण वरच्या-प्रमाणेच कोणतीहि गोष्ट ठरत नाही तसेच पाद्री लोकानी आज पाचपन्नास वर्षे हिंदु व इतर धर्माविरुद्ध सहस्रावधि अप्रयोजक ग्रथ जर आजपर्यंत प्रसिद्ध केले आहेत, व अजूनहि 'ज्ञानोदया'सारख्या कर्वीची बडबड सतत

सुरूच आहे, तर आमच्याच लोकाची लेखणी कोणी धरीलसें वाटत नाही. पण हेंचसे काय ? आमच्या 'सन्मान्य' पाद्री बधूस खुद्द इग्लडातच खिस्ती धर्मावर लोकाचा केवढा विश्वास आहे हें माहीत नाही काय ? टॉमस् पेन्, हासलम् वगैरे ग्रथकारानी 'पवित्रशास्त्रा'ची केवढी धूळधाण करून दिली आहे हेहि त्यास ठाऊक नसेल काय ? ह्यूम्, गिबन्, दोघे मिल्ल हे विलायती धर्माचे केवढे शत्रु होते हे कोणास माहीत नाही ? नुकते काही महिन्यापूर्वी माजी जॉन् स्टुअर्ट मिल्ल याचे 'धर्मावर तीन निबध' छापून ते लक्षावधि लोकाच्या पुस्तकालयात जाऊन पडले हें कोण जाणत नाही ? आमच्या 'ज्ञानोदय'महाराजानी मेकॉले व मिल्ल या दोघास हात देऊन सावरले, पण दोघाचेहि ग्रंथ जर त्यानी उगीच वरवर तरी वाचले असते, तर त्यास कळून आलें असतें कीं, याची जगाच्या तारणाऱ्या प्रभूवर मोठीशी भक्ति होती असे नाही. असो, तिसरा मोठा आरोप बडवाल्याच्या नावाचा उल्लेख. एका इग्लिश इतिहासकाराचा तात्या टोप्याविषयी जो उतारा दिला आहे, व त्या शूर पुरुषाची खुद्द रसेल साहेबानी* केलेली मोठी तारीफ त्यात जी मोडी अक्षरानी लिहिली आहे, ती वाचून आमच्या पाद्री बधूशिवाय बाकी सर्वांची खात्री होईल की, 'महादुष्ट बडवाल्या'च्याहि योग्य स्तुतीने इग्रेजाची लेखणी ही केवळ विटाळतेच असे नाही, मग एतद्देशीय लिहिणाराची तर नाहीच नाही ! असो, तेव्हा एकदरींत साराश हाच की, कोणी केवढ्याहि योग्यतेचा ग्रथकार असला तरी त्यावर हवी तशी चर्चा करण्यास हवा त्यास अधिकार आहे, आणि जोंपर्यंत आपण कोणाच्या घरगुती वगैरे गोष्टी न काढता केवळ लौकिक सबधाने कोणाविषयी बोलत आहों, तोंवर त्याची हवी तशी शोभा

---

* हा नामाकित ग्रथकार जगद्विख्यात 'लडन टैम्स' पत्राचा बातमीदार होता. आदल्या वर्षी क्रीमियाच्या लढाईचा वृत्तान्त त्या पत्रास पोचवून बडाच्या साली हा हिंदुस्थानात आला होता. येथील वृत्तान्तहि या साहेबाने अगदी चोख रीतीने आपल्या देशीं कळविला असो, एकंदरींत आमच्यावर राज्य करणाऱ्या लोकाच्या अनेक सद्गुणापैकी प्रत्यक्ष शत्रचीहि वाहवा करण्याची जी औदार्यान्वित सत्यप्रीति त्याच्यात दिसून येते ती परम आश्चर्यकारक खरी ! आणि आमच्या मेकॉलेसाहेबाप्रमाणे किंवा पाद्री बधूप्रमाणे सगळेच सत्यनिष्ठ नाहीत हीहि मोठ्याच आनदाची गोष्ट होय !

केल्यास काही गुन्हा होत नाही. इतके मात्र खरे की, येवढें जो धाडस करील त्याने त्याविषयी अगोदर आपणापाशीं तशीच कडेकोट तयारी करून ठेविली पाहिजे, आणि लोकाचा द्वेष जो त्याजवर येईल त्यानेहि आपण कचरणार नाही असा मनाचा पक्का धडा करून ठेवला पाहिजे.

१५. असो, आता सरते शेवटी वर सागितलेल्या गुणानी विशिष्ट असे टीकाकार निपजले असता भाषेचे व तद्द्वारा लोकाचे हित कोणतें होतें ते सागतों. चागले वाईट अशी काहीच निवडानिवड न करता हवें ते अन्न खाल्ले असता जसे शरीराचे पोषण होणे एकीकडेच राहून उलट्या त्यास व्याधि मात्र जडतात त्याचप्रमाणे ग्रथवाचनाचीहि गोष्ट होय. जे ग्रथ खरोखर वाचण्यालायक असतील,—म्हणजे ज्याची भाषासरणी उत्तम, विषयप्रतिपादन प्रौढ व सरस, ज्यापासून मनोरजन किंवा उपदेश अथवा दोन्हीहि एकदम प्राप्त होतात, असेच वाचणारानी वाचावे पण हे होण्यास वरच्यासारखे ग्रथ कोणते हे अगोदर अवश्य समजले पाहिजे हे ज्ञान वाचणारास प्रथमतः मुळीच नसतें: ते अनेक ग्रथाचें बहुत काल जेव्हा सतत परिशीलन करावे तेव्हाच प्राप्त व्हावयाचे तेव्हा अमुक ग्रथ वाचण्यासारखा आहे आणि अमुक नाही हे ज्ञान वाचकास करून देण्यास अर्थात्च निराळेच लोक पाहिजेत. ह लोक टीकाकार होत. मागील काळच्या श्रीमंताच्या घरीं जसे चोखे बाळगलेले असत, की त्यानी पदार्थ वाढायाला आला असता अगोदर आपण चोखून तो नीट उतरला असला तरच आपल्या यजमानाकडे जाऊ द्यावा त्याच्यासारखेच काही अर्शी टीकाकर्त्यांचे काम होय ग्रथकार हे मुदपाकातील पाकाध्यक्षासारखे होत, आपली सर्व करामत खर्च करून पदार्थ तयार करण्याचे त्याचे काम, एकदर वाचणारे लोक हे पाटावर बसलेल्या यजमानासारखे, त्यास जातीने पदार्थाचा बरेवाईटपणा फार करून कळायाचा नाहीच, आणि ग्रथाचे गुणदोषपरीक्षक हे अर्थात्च वर सागितलेल्या चोखेमडळीसारखे, याच्या सर्वानुमतें किंवा बहुमतें जो पदार्थ पसार होईल तो मग पुढे खाशाकडे जायचा. असो, तर याप्रमाणे चागले गुणदोषविवेचक असले म्हणजे एकदर लोकाचे त्यापासून येवढे हित होतें हे एक झाले म्हणजे याच्या पोटीं दुसऱ्याहि अनेक गोष्टी आल्या. चागले ग्रथकार निवडले गेले म्हणजे तशासच उत्तेजन

मिळून त्याच्या हातून उत्तरोत्तर भाषेची सुधारणा होत जाते. ते तिचें व्याकरण नीट बसवून तिजमधील अव्यवस्था मोडून टाकतात, आणि शेकडो नवे शब्द व नवे प्रयोग वगैरे प्रचारात आणून तिची अभिवृद्धि करतात. याप्रमाणे तिच्या ऊर्जितदशेस एकदा आरभ झाला म्हणजे कविजन-परंपरेच्या प्रसादाने तिजवर अधिकाधिक कळा येऊं लागून काही काळाने अभियुक्त भाषाच्या वर्गात मोडू लागण्याची तिचे ठायी योग्यता येते. ही योग्यता आली असता ती भाषा लोकात ज्ञानाचा प्रसार होण्यास केवढी साधनीभूत होते, व हा प्रसार देशाच्या वैभवाचें केवढे कारण आहे वगैरे गोष्टी सर्व विचारी मनुष्यास पूर्णपणे माहीत आहेतच असो, सरते शेवटी हाहि एक मोठा नफा सागितला पाहिजे कीं, नि पक्षपात व सहृदय असे ग्रथाचे परीक्षक असले म्हणजे बुद्धिमान् मनुष्यास एरवीच्या साधारण लोका-प्रमाणे मूर्ख व दुष्ट अशा धनिकाचे आर्जव करण्याची किंवा वरिष्ठ अधि-काराच्या पुढे पुढे करून पदरीं लघुत्व घेण्याची बिलकूल गरज राहत नाही. तर त्याच्या बुद्धिमहत्त्वास अत्यत अनुकूल, उचित आणि शोभादायक जी निःस्पृहता व स्वतत्रता ती खुशाल मिरवायास सापडते. *

---

* हा उत्कृष्ट साय छापखाने निघाल्यापासन ग्रथकारास अनुकूल झाली आहे. इग्लडात हिच्या योगान सपत्तिमान् हाऊन पुन स्वतत्र राहिलेला पहिला कवि **पोप** होय याम **होमर**च्या महाकाव्याच्या भाषातराने पन्नास हजारावर रुपये मिळून वतनवाडी, बागबगीचा अशा थाटात राहता आले त्याने म्हटले आहे:—

> And thanks to Homer, since I live and thrive,
> Indebted to no prince or peer alive!

याप्रमाणेच **सर वॉल्टर स्कॉट्** यास पधरा लाख रुपयाच्या व्यापारात ठोकर लागली असता आपल्या कादबऱ्याना वगैरे ती त्याने पैसान्पैसा फेडून टाकली हा गोष्ट सवप्रसिद्ध आहेच आपल्या महाराणीजवळच राजकवि **टेनिसन्** याचीहि प्राप्ति अशाच आहे. वषा दोन वर्षांनी एखाद काव्य रचाव की तीन चार लाखाची बगमा!

# आमचे आधुनिक विद्वान् अकालीं कां मरतात ?

गेल्या रविवारीं न्यायमूर्ति रा ब. रानडे याचे मुबईस जें व्याख्यान झाले ते फार महत्त्वाचें होतें डॉ. भाडारकर याचें व्हाइस चान्सलर या नात्याने युनिव्हर्सिटींत भाषण झाल्या दिवसापासून या विषयाकडे लोकाचे विशेष लक्ष लागले आहे. कित्येकाच्या मते डॉक्टरसाहेबानी काढलेलीं अनुमाने सर्वांशी ग्राह्य नव्हती, पण ज्या रीतीने डॉक्टरसाहेबानी या प्रश्नाचा ऊहापोह केला होता, तशाच रीतीने परतु त्याहून विशेष सूक्ष्मदृष्टया व शोधक बुद्धीने या विषयाचे विवेचन करून काय सिद्धान्त निघनात हे कोणी तरी एका चागल्या विद्वानाने पुनः पाहावयास पाहिजे होते. न्यायमूर्ति रा. ब महादेव गोविद रानडे यानी हे काम करण्याचें मनावर घेऊन बहुतेक प्रसिद्ध विद्वानास यासबधान आपले अभिप्राय कळविण्यास आज बरेच दिवसापूर्वी पत्रे लिहिली होतीं, व विशेपतः करून त्यास असे विचारले होते की, ( १ ) ग्रॅज्युएट लोकापैकी अकाली मेलेले आपणास किती गृहस्थ माहीत आहेत, व त्याच्या मृत्यूची कारणे काय ? आणि ( २ ) ग्रॅज्युएट मडळीतील किती लोकानी इग्रजींत अगर देशी भाषेत ग्रथ प्रसिद्ध केले आहेत ? रा ब. रानडे यानी एकदर सुमारे चारशे पत्रे लिहिली होती, पैकी निरनिराळ्या ठिकाणच्या दक्षिणी, पार्शी, गुजराथी वगैरे लोकाकडून सुमारे १३६ उत्तरे आलीं व हीं उत्तरे पाठविणारापैकी कित्येकानी बडोदे, सोलापूर, रत्नागिरी, भावनगर, अहमदाबाद, इदूर, पुणे, मुबई, कोल्हापूर, कराची, धुळे, हुशगाबाद, शिकारपूर वगैरे ठिकाणीं ग्रॅज्युएट लोकाच्या सभा भरवून त्या सभाचे मत रावबहादुरास कळविलें आहे. तेव्हा या उत्तरात दिलेल्या माहितीपासून जीं अनुमाने निघतील तीं एकतर्फी अगर एकपक्षीय आहेत अशी तक्रार करण्यास आता कोणतेहि कारण राहिले नाही. युनिव्हर्सिटीतून पास झालेले बरेच लोक अकाली मरावे आणि जिवत राहिलेल्या लोकात ग्रथकर्तृत्वादि विद्याव्यासग करण्याची मुळीच अभिरुचि किंवा शक्ति नसावी हे दोन आक्षेप खरे असल्यास ते आधुनिक विद्वानास भूषणास्पद नसून ते दूर करण्याचा त्यानी प्रयत्न केला

पाहिजे असें जें रा. ब. रानडे यानी बोलून दाखविले ते आम्हास पूर्णपणें मान्य आहे. प्रतिवर्षी विद्येने सस्कृत झालेल्या लोकापैकी बरेच लोक मृत्यूच्या मुखी पडावेत हे काही राष्ट्राचे सामान्य दुर्दैव नव्हे, व केवळ ग्रहादिकाच्या गतिस्थितिमुळे मनुष्यास मृत्यु येतो अशी ज्याची समजूत नसेल त्यानी या प्रश्नाचा व्यावहारिक दृष्ट्या विचार करण्यास लागावें हे त्याचें कर्तव्य होय. डॉ भाडारकर व न्यायमूर्ति रानडे ,या दोघा विद्वानाच्या हातून या प्रश्नाचें अशा रितीनें परीक्षण झाले आहे ही मोठ्या सुदैवाची गोष्ट होय व दोघाहि विद्वानाच्या चर्चेने जे सिद्धान्त अखेर कायम ते ग्राह्य मानण्यास काही हरकत नाही.

वर जे दोन प्रश्न सागितले त्यापैकी ग्रॅज्युएट लोक अकाली मरतात कीं नाही याचें डॉ. भाडारकर यानी जें विवेचन केलें होते, त्यात सन १८६२ ते ८० पर्यंत पास झालेल्या एम् ए. गृहस्थापैकी दाक्षिणी शेकडा ४४ आणि पार्शी शेकडा १६ मरतात, आणि बी ए पैकी दाक्षिणी शेकडा २०, गुजराथी शेकडा २२, आणि पार्शी शेकडा ९ मरतात, असे त्यानी आकड्यानी सिद्ध करून दाखविलें होते. हे आकडे रा. ब. रानडे यानी पुन. तपासून घेऊन सन १८९३ अखेरपर्यंत ( सन १८९३ साली पास होऊन १८९४ च्या फेब्रुवारीत ज्यानी डिग्री घेतली ते लोक सोडून देऊन ) युनिव्हर्सिटींतून बाहेर पडलेल्या सर्व ग्रॅज्युएटाची हकीकत आणविली. कित्येकाच्या मते ग्रॅज्युएट अकाली मरतात किंवा नाही हे पाहणे असल्यास दहा वर्षापूर्वीचे ग्रॅज्युएट घेतले पाहिजेत; परतु ही समज चुकीची आहे. जे लोक अकाली मरतात ते प्रायः ग्रॅज्युएट झाल्यापासून दहा-पधरा वर्षातच मरतात, करिता आजपर्यंत पास झालेले सर्व ग्रॅज्युएट घेऊन व त्याची हकीकत पाहून जे अनुमान निघेल तेच अधिक विश्वसनीय मानले पाहिजे खेरीज युनिव्हर्सिटी स्थापन झाल्याबरोबर पहिली काही वर्षे पार्शी व गुजराथी लोक याचा कॉलेजात फारसा भरणा नसे. सबब डॉ. भाडारकर यानी ज्याप्रमाणे सन १८६२ पासून सन १८८० पर्यंत म्हणजे पहिल्या अठरा वर्षाचीच सख्या घेऊन अनुमाने काढिलीं आहेत, तसे केलें असता निरनिराळ्या ज्ञातींतील परस्परप्रमाणहि बरोबर कळण्याचा सभव नाही. ह्यामुळे रा. ब.

रानडे यानी सन १८९३ अखेर सर्व ग्रॅज्युएट लोकाची सख्या घेऊन जे अनुमान केलें आहे तेंच अधिक प्रशस्त आहे असे मानलें पाहिजे.

सन १८९३ अखेर एकंदर ग्रॅज्युएटाची सख्या २१९८ असून, पैकी १०५ एम्. ए., १३२८ बी. ए, ३२ बी. एस्सी., ५ एम्. डी., ४२४ एल् एम् एस्., १ एम्. सी. ई. व ३०३ एल् सी. ई, आहेत, आणि बी. ए. व एम् ए मिळून एकदर १४३३ पैकी ३५६ एल्एल्. बी. झाले आहेत. या सर्वांचे जातवार प्रमाण पाहू गेलें असता असे आढळून येते कीं, यापैकी शेकडा ४७ दक्षिणी, शेकडा २५ पार्शी, १७ गुजराथी, ६ ख्रिश्चन, २ सिंधी, आणि मुसलमान शेकडा २ पेक्षाहि कमी आहेत. पैकी ख्रिस्ती, ज्यू, मुसलमान आणि सिंधी ह्यांची सख्या फारच कमी असल्यामुळें त्याच्याबद्दल कोणतेच निश्चयात्मक अनुमान बसविता येत नाही. बाकी दक्षिणी, गुजराथी आणि पार्शी राहिले. यांची सख्या १९७२ आहे. पैकीं एम्. ए , बी. ए. वगैरे कोणकोणत्या जातींत किती किती आहेत, व त्यापैकी अकाली मेलेले किती हे दुसरीकडे दिलेल्या दोन कोष्टकावरून दिसून येईल पार्शी लोक दक्षिणी किंवा गुजराथ्यापेक्षा एम्. ए.च्या किंवा एल्. एम्. एस्.च्या परीक्षेस जास्त जातात असें यावरून आढळून येते, व ते मुबईचेच स्थायिक राहणारे असतात यामुळे असें होणें अगदी साहजिक आहे. आता अकाली मयत झालेल्या लोकाची सख्या व प्रमाण पाहता असे आढळून येईल कीं, एल्. सी ई. सर्वात कमी मरतात, त्यापेक्षा बी. ए. झालेल्या लोकात मरण्याचे प्रमाण ( शेकडा ७ ) जास्त आहे नतर वाढत्या प्रमाणाने एल्. एम्. एस्., एल्एल्. बी. आणि एम् ए पदवीवाले येतात, व सर्वांत एम्. ए. एल्एल्. बी. जास्त म्हणजे २४ पैकी ९ अथवा शेकडा ३३ या मानाने मेले आहेत असे आढळून येते. हा सामान्य विचार झाला. जातीसबधाने पाहता असें आढळून येते कीं, मृत्यूचें प्रमाण पार्श्यांमधे शेकडा ४१ गुजराथ्यामधे शेंकडा ५ व दक्षिण्यामधे शेकडा १० असे आहे. म्हणजे दाक्षिणी लोकामधे मृत्यूचें प्रमाण सर्वांहून जास्त आहे, व पार्शी आणि गुजराथी या दोहोमध्ये यासबधाने फारसे अतर नाहीं असे आकड्यावरून सिद्ध होतें. दक्षिणी लोकापैकी, डॉक्टरात मृत्यूचे मान

शेकडा १९, एम्. ए. झालेल्यात शेकडा २४, नुसत्या बी. ए. झालेल्या लोकात शेकडा ९, आणि एलूएल्. बी. झालेल्यात शेकडा ८।। आहे असें दुसरीकडे दिलेल्या कोष्टकावरून दिसून येईल. भगवानदास पुरुषोत्तमदास-स्कालरशिप म्हणून संस्कृतात एम्. ए.च्या परीक्षेत जो पहिला येईल, त्यास बक्षीस देण्यात येत असते. हे बक्षीस ज्यांनी आजपर्यंत मिळविले आहे अशा १५ गृहस्थांपैकी १० मयत आहेत, व यातच कै०वा० आपटे, वैद्य, गोखले, भिडे, आठल्ये यांचा समावेश होतो. आकड्यावरून व कोष्टकावरून जे ठळक ठळक सिद्धान्त निघतात ते वर लिहिल्याप्रमाणे आहेत. आता यांची कारणे काय असावींत याचा विचार करू.

डॉ० भाडाग्कर यांनी असे म्हटले होतें की, दक्षिणी लोकांत मृत्यूचे जें अधिक प्रमाण आढळून येते त्याची मुख्य कारणें कदन्न, बालविवाह, आणि व्यायामविद्वेष हीं होत. पार्शी लोक अधिक चांगलें अन्न खातात, अधिक व्यायाम घेतात व उशीरां लग्न करतात, तेव्हा ते अर्थातच दक्षिणी लोकांपेक्षा अधिक जगतात असे डॉक्टरसाहेबांचे म्हणणे होते. हे म्हणणे आपणास कबूल नसल्याबद्दल आम्हीं त्याच वेळीं लिहिले होते, व हल्लीं रा. ब. रानडे यांनी या विषयाचें जे शोधकबुद्धीने परीक्षण केले आहे यावरूनहि आमचेंच म्हणणे खरें ठरते. डॉक्टरसाहेबांचे अनुमान जर बरोबर धरिले तर पार्श्यांपेक्षा गुजराथी लोकांतहि मृत्यूचे प्रमाण अधिक असावयास पाहिजे. कारण गुजराथी लोकांचे आहारविहार हे आमच्याप्रमाणेच पार्श्यांहून भिन्न आहेत. परंतु ज्या अर्थी पार्शी आणि गुजराथी या दोन्ही जातींत मृत्यूचे प्रमाण जवळ जवळ सारखेंच आहे असें आकड्यांनी सिद्ध होतें, त्या अर्थी डॉक्टर-साहेबांची कल्पना सोडून देऊन आहारविहार-विवाहादि स्थितींतील वैषम्यापेक्षा दुसरे कांही तरी कारण शोधून काढणे जरूर आहे. दाक्षिणी, पार्शी आणि गुजराथी यांच्या सामान्य म्हणजे एकंदर समाजात ( मग ते शिकलेले असोत वा नसोत ) जें मृत्यूचें मान आढळून येते त्यावरूनहि डॉक्टर-साहेबांची कल्पना निराधार ठरते. रा. ब. रानडे यांनी असे दाखविलें आहे की, मुंबई शहरात गेल्या पंधरा वर्षांत ब्राह्मण हजारीं २२ व पार्शी हजारीं २० मयत झाले, व सन १८९३ सालीं तर दोघांचेंहि प्रमाण हजारीं २३ च होते. पार्शांच्या आहारादिकांमुळे जर ते अधिक दीर्घायु झाले असते तर

वर दिलेलीं सामान्य प्रमाणें सारखी राहिलीं नसतीं, यावरून व गुजराथी व पार्शी पदवीधरात जे मृत्यूचें सारखेंच प्रमाण आढळून येतें त्यावरून डॉक्टर-साहेबाची कल्पना आकड्याशी जुळत नाही असे म्हणणे भाग पडते खेरीज पार्शी लोकामधे व्यायामशाळा वगैरे व्यायाम घेण्याच्या सोयी गेल्या दहा-पधरा वर्षांतच निघालेल्या आहेत. तेव्हा त्यामुळे आयुष्यमर्यादेत काही फेर झाला असल्यास तो ह्याच्यापुढे नजरेस यावयाचा. गेल्या तीस वर्षांतील ग्रॅज्युएटाच्या मृत्यूचे मान त्यामुळे कमीजास्त होण्याचा सभव नाही.

परतु डॉक्टरसाहेबाची कल्पना अग्राह्य धरिली तरी दक्षिणी ग्रॅज्युएट गुज-राथी अगर पार्शी ग्रॅज्युएटापेक्षा अकाली अधिक मरतात ही गोष्ट जर आक-ड्यानी सिद्ध आहे, तर तिचे कारण काय ह्याचे काही तरी आपणास सयु-क्तिक उत्तर दिलें पाहिजे. पार्शी लोक अधिक चागलें अन्न खातात हे खरे कारण नाहीं असे वर दिलेल्या हकीकतीवरून उघड दिसून येते, व विशेषतः गुजराथी व पार्शी ग्रॅज्युएट याच्यामधे ज्या अर्थी मृत्यूचें मान समसमानच आहे, त्या अर्थी डॉक्टरसाहेबाचा सिद्धान्त चुकीचा आहे असे निर्विवाद सिद्ध होते. परतु अमुक एक कल्पना चुकीची ठरली म्हणून तेवढ्यानेच आपले समाधान करून घेऊन उपयोगी नाही मराठे लोक गुजराथी लोकापेक्षा शरीराने आणि मनाने अधिक कटक व सशक्त आहेत. युनिव्हर्सिटीच्या पदव्या मिळाविण्यात, शेकडा ५० म्हणजे त्याचा पहिला नबर आहे व ग्रंथकर्तृत्वाच्या मानानेहि त्यानी जितके काम केले आहे तितके दुसऱ्या कोणींच केलें नाही. अशा स्थितींत आमच्या गुर्जर राष्ट्रीय बधूपेक्षा आमच्याकडील विद्वान् लोक अकाली का मरावेत हा मोठा महत्त्वाचा प्रश्न आहे या प्रश्नाचें रा. ब. रानडे यानी आपल्या व्याख्यानात जे उत्तर दिले आहे तेच डॉक्टरसाहेबाच्या कल्पनेपेक्षा एकदरींत अधिक सयुक्तिक व यथार्थ आहे असें आम्हास वाटते. ग्रॅज्युएट लोकाच्या वयाचें मान सरासरी २० पासून ४० पर्यंत धरिता येईल. या वयाच्या मुदतींत एकदर समाजात मृत्यूचें मान हजारीं ३० आहे, असे सन १८९२ सालाच्या खाने-सुमारीच्या रिपोर्टावरून आढळून येते. या मानाने पाहता पार्शी व गुजराथी ग्रॅज्युएटाच्या मृत्यूचे मान सामान्य मानापेक्षा दुप्पट, आणि दक्षिणी ग्रॅज्युएट

लोकांच्या तिपटीहून अधिक आहे असें दिसून येते. सामान्य लोकांप्रमाणे खाण्यापिण्याची विशेष भ्रांत नसता एकंदर ग्रॅज्युएट लोकांतच मृत्यूचें जर अधिक मान आहे, तर हा परिणाम शिक्षणाच्या फाजील ओझ्याने आणि दहशतीने होतो असें म्हणावें लागतें. मृत्यूच्या सामान्य मानासंबंधाने हा विचार झाला. आतां मराठी किंवा दाक्षिणी लोकांत सामान्य ग्रॅज्युएट लोकांपेक्षाहि जें अधिक मृत्यूचें मान आढळतें त्याचें कारण काय आहे तें पाहू. एकंदर लोकांपेक्षा ग्रॅज्युएट अधिक मरतात व ग्रॅज्युएटांतहि दाक्षिणी अधिक लवकर मरतात हें आंकड्यांनीच सिद्ध झालें आहे.

दाक्षिणी ग्रॅज्युएट मंडळींत विशेष भरणा ब्राह्मण लोकांचाच आहे, आणि ब्राह्मण म्हणजे दरिद्री हें सर्वश्रुतच आहे. करितां दरिद्रावस्थेत विद्याभ्यास करणाऱ्या लोकांस युनिव्हर्सिटीचा अभ्यासक्रम अकालमृत्युप्रद होतो असें सकृद्दर्शनीं दिसून येतें, व थोड्या विचारान्तीं दाक्षिणी ग्रॅज्युएटांत मृत्यूचें मान अधिक असण्याचें हेंच मुख्य कारण आहे अशी बहुतेकांची खात्री होईल. ब्राह्मणांतहि सुखवस्तु गृहस्थांच्या मुलांपेक्षा गरीबांचीं मुलें अधिक हुषार व मेहनती असतात ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. कोंकणांतील किती गरीब मुलें, वारानें किंवा कोणी तरी आप्तअगर स्नेही यांच्या मदतीनें उदर-निर्वाह करून बी.ए. एम्.ए.पर्यंत मजल मारतात, हें येथे नवीन सांगावयास पाहिजे असें नाहीं. डॉ. भांडारकर यांसहि ही स्थिति अवगत आहे, परंतु तिकडे थोडेसें दुर्लक्ष करून "लग्नांत पैसे खर्च करावयास सांपडतात तर विद्याभ्यासासाठीं कां खर्च करूं नये" अशा रीतीनें सदर वर्गांतील लोकांचा त्यांनीं थोडासा उपहास केला होता. रा. ब. रानडे यांच्या मतें हा उपहास अगदीं गैरवाजवी आहे. असल्या गरीब विद्यार्थ्यांस मुली देणारे गृहस्थच लग्नाचा सर्व खर्च सोसून शिवाय त्यांच्या विद्याभ्यासा-करितांहि कांहीं मदत करतात हें कदाचित् डॉक्टरसाहेबांच्या लक्षांत राहिलें नसेल. असो, अकालीं मेलेल्या कै० वा० आगाशे, आपटे, गोखले, वैद्य, बाळ, टुल्लु, जोशी, क्षीरसागर, मिरजकर, वगैरे सुमारें पन्नास लोकांच्या गृहस्थितीची चौकशी करितां असें आढळून येतें कीं, यापैकीं बहुतेक लोक अगदी गरीब स्थितींतून वाढले असून त्यांचा विद्याभ्यास वारांनीं, स्नेह्यांच्या मदतीनें किंवा स्कॉलरशिपनें झालेला आहे. इतकी दगदग व त्रास सोसून

युनिव्हर्सिटीच्या सर्व परीक्षा जे पास होतात, त्याच्या आयुष्याची दोरी बरीच ढिली व्हावी, व कोणत्याहि कारणाने विषमज्वरासारखे दुखणें आल्यास त्यातच त्याचा अंत व्हावा यात काही नवल नाही. आमच्या मते भगवानदास-पुरुषोत्तमदास-स्कॉलरशिप मिळविलेल्या १५ एम्. ए. गृहस्थापैकी आजपर्यंत दहा गृहस्थ अकाली मेले, ह्याचेहि हेंच कारण होय. संस्कृतची स्कॉलरशिप बहुतकरून दाक्षिणी लोकानीच मिळविली आहे व त्यापैकी बहुनेकास जगन्नाथशंकरशेटची स्कॉशरशिप मिळालेली होती. या स्कॉलरशिपा मिळविण्याकरिता गरीब विद्यार्थी जितकी मेहनत करतात तितकी सुखवस्तु गृहस्थाची मुले करीत नाहीत. तेव्हा संस्कृताची स्कॉलरशिप पहिल्यापासून मिळवून जे गरीब विद्यार्थी एम्. ए पर्यंत गेले व ज्यानी भगवानदास-पुरुषोत्तमदास स्कॉलरशिप मिळविली त्यास अकालीं मृत्यु यावा ह्यात काही विशेष आश्चर्य नाही. आता दरिद्री लोकानी अशा रीतीने वरिष्ठ शिक्षणाची हाव का धरावी असा कोणी प्रश्न करतील, तर त्यास उत्तर इतकेंच आहे कीं, दाक्षिणेतील ब्राह्मणास शिक्षणाखेरीज इतर धंदे फारसे अद्याप प्रिय वाटू लागले नाहीत व एका अर्थी इतर धंद्यास अवश्य लागणारे गुणहि त्याच्यामधे अद्याप कमी आहेत. दारिद्र्य आणि विद्याव्यासंग याचें ब्राह्मणाशीं आज हजारो वर्षांचें साहचर्य आहे, आणि हुशारी व मेहनत गरीब विद्यार्थ्यांच्या अंगी जितकी दिसून येते तितकी सुखवस्तु विद्यार्थ्यांत दिसून येत नाही असा अनुभव आहे. करिता या वर्गातील विद्यार्थ्यांस विशिष्ट शिक्षणापासून पराङ्मुख न करिता त्याच्या मार्गांत असलेल्या अडचणी काढून टाकून त्यास परंपरागत आलेला धंदा करण्यासच उत्तेजन द्यावें, ह्यात एकदर राष्ट्राचें हित आहे. विद्याव्यासंग कायम ठेवून नवीन शोध अगर ग्रंथ करण्याचें कामहि याच वर्गातील विद्यार्थ्यांकडून आज शेकडो वर्षें होत आलें आहे व पुढे होण्याचा संभव आहे. यासाठी याच्या अकालीं घडणाऱ्या मृत्यूची कारणे असतील ती जेणेकरून कमी होतील असे उपाय केले पाहिजेत यापैकी (१) पहिला उपाय सरकारच्या हातात आहे. म्हणजे त्यानी गरीब ब्राह्मण विद्यार्थ्यांस पगारी व नादारी विद्यार्थ्यांच्या जागा होईल तितक्या कमी देण्याचा जो ठराव केला आहे तो बदलला पाहिजे. (२) दुसरा उपाय युनिव्हर्सिटीचा शिक्षणक्रम हल्लीच्यापेक्षा अधिक

सोपा करणें हा होय. सर्व विषय परीक्षा पास होते वेळींच विद्यार्थ्यास अवगत असले पाहिजेत, अशा समजुतीने एकदर परीक्षा कठीण करण्यात काही हशील नाही. परीक्षेस १० विषय असले, व त्यापैकी विद्यार्थ्यास ५ चागले, ४ मध्यम आणि एक सुमाराचाच येत असला, तर त्या एका विषयाकरिता त्यास वारकरी बनविणें अगदी अप्रशस्त आहे. बी.ए.ची परीक्षा ही काही विद्वत्तेची सीमा नव्हे. साधारण रीत्या सुशिक्षित मनुष्यास जे ज्ञान असणे अवश्य आहे तितके ज्यास मिळाले आहे त्यास बी. ए. होता यावें. कोणत्याहि एका विशिष्ट विषयाचा व्यासग करून त्यात लौकिक मिळविणे हे पुढील काम आहे. त्याचा सामान्य परीक्षेशीं काही सबध असू नये, परंतु शिक्षणक्रम जरी अशा रीतीने सुधारला तरी विद्यार्थ्यांच्या हातातच अकालमृत्युहरणाचे जे उपाय आहेत ते त्यानी अवश्य केले पाहिजेत. यापैकी मुख्य उपाय म्हटला म्हणजे (३) ब्रह्मचर्य होय विद्या पुरी होई-पर्यंत तरी हें व्रत विद्यार्थ्यांनी अवश्य चालविले पाहिजे. इग्रजी राज्य होण्यापूर्वी आमच्या देशात जे विद्वान् शास्त्री व पडित झाले त्याचा यासंबधाने मोठा कटाक्ष असे, व एकदरीत हल्लीच्या गरीब स्थितींत तर अशा प्रकारच्या व्रताची फार जरूर आहे. रा० ब० रानडे यानी यापेक्षा काही जास्त सागितले नाही, तथापि आम्ही असे म्हणतो कीं, आजन्म किंवा दीर्घकाल ब्रह्मचर्य पाळणारे जर आमच्यामधे काही विद्वान् लोक निघतील तर त्यापासून त्याचे व राष्ट्राचे पुष्कळच हित होईल.

असो, याप्रमाणे महाराष्ट्र-पदवीधर-विद्वानाच्या अकालिक मृत्यूच्या कारणाचा विचार झाल्यावर आधुनिक विद्वान् विद्याव्यासगाचे काम परीक्षा सपल्यावर पुढे कोणत्या रीतीने चालवितात याची थोडीशी हकीकत त्यानी सागितली. ती हकीकत त्यास आलेल्या जबाबावरून व विशेषत. नेटिव्ह प्रेसचे रिपोर्टर यानी केलेल्या राजिस्टर झालेल्या पुस्तकाच्या यादीवरून घेतली आहे. त्यामुळे यासबधीं सर्व अनुमान ग्रॅज्युएट लोकानी लिहिलेल्या पुस्तकावरून केले आहे हें उघड आहे. ही रीत कित्येकाच्या मतें बरोबर नाही, कारण त्याच्या मते पुष्कळ ग्रॅज्युएट विद्याव्यासगात निमग्न असतील, परतु ग्रथ लिहिण्याची त्यास इच्छा अगर सवड नसेल हे म्हणणे काही अशी बरोबर आहे. प्रो० जिन्सीवाले याचे नाव ग्रथकाराच्या यादींत नसलें तरी त्यानी

आपला विद्याव्यासंग कायम राखिला नाही असें कोणीहि म्हणणार नाहीं. परंतु आम्हास जें अनुमान काढावयाचे आहे, तें व्यक्तीसंबधाने नसून सामान्य वर्गाबद्दलच आहे. ही गोष्ट जर वरील आक्षेपकार नीट लक्षात आणतील तर ग्रंथप्रकाशनाखेरीज सामान्य ग्रॅज्युएट वर्गाच्या परीक्षोत्तर विद्याव्यासंगाचे दुसरे कोणतेहि चागले द्योतक चिन्ह नाही असे यास आढळून येईल. गेल्या पंचवीस वर्षातील देशी भाषातील ग्रंथाचें सरकारी वार्षिक रिपोर्ट रा० ब० रानडे यानी तपासले आहेत. त्या रिपोर्टावरून असे अनुमान निघते की ग्रंथकर्तृत्वाच्या कामी दक्षिणी ग्रॅज्युएट लोकानी जितके काम केले आहे, त्यापेक्षा गुजराथी ग्रॅज्युएट मडळीचें काम पुष्कळच कमी आहे व पार्श्याचा नंबर तर दोहोंच्याहि खाली लागतो. मराठी ग्रॅज्युएट मंडळीत डॉ० भाडारकर, कुंटेद्वय, पंडित, तेलंग, चिपळूणकर, आपटे, वैद्य वगैरे पुष्कळ गृहस्थ आहेत. गुजराथी लोकात त्रिवेदी, कोठारे, देसाई, द्विवेदी, शहा, गुजर, त्रिपाठी वगैरे बरींच नावे आहेत, परंतु दाक्षिणी लोकापेक्षा त्याची संख्या कमी आहे. पार्शी लोकात सजाना, वाडिया, बर्जोरजी, दस्तुर, नायगमवाला, असे थोडेच लेखक आढळतात. दक्षिणी व गुजराथ्यानी लिहिलेल्या ग्रथापैकी बरेच ग्रंथ भाषातररूपी आहेत हे खरे. पण इंग्रजी व युरोपीय विद्याचा जर देशी भाषात संग्रह करणे असेल तर तो भाषांतररूपानेच केला पाहिजे, हे लक्षात आणले असता वरील दोषाचे महत्त्व कमी होते. डॉ० भाडारकर, कुंटे, तेलंग, पंडित, आपटे, वैद्य, याचे ग्रंथ केवळ भाषांतररूपी नाहीत हेहि लक्षात आणले पाहिजे. साराश दक्षिणी ग्रॅज्युएटापैकी पुष्कळ लोक जर अकालीं मरतात, तर त्या मानाने कामहि ते जास्त करितात हे विसरता कामा नये. रा. रा. महादेवराव आपटे यानी स्थापिलेला आश्रमहि या कामी आमच्या ग्रॅज्युएट मडळींत वास करीत असलेल्या निरपक्ष बुद्धीचीच साक्ष आहे. विलायतेंत शेकडा ५ विद्वानच काय ते विद्याव्यासंग पुढे कायम ठेवतात. या मानाने पाहिले तर आमच्याकडे शेकडा १० ग्रॅज्युएट आपले वाचन कायम ठेवतात, हे काही कमी नाही. दारिद्री ग्रॅज्युएट यापेक्षा आणखी जास्त काय करणार ? धंदेवाल्या ग्रॅज्युएटात ग्रंथरचनेच्या कामी डॉक्टराचा पहिला, कायदेपंडिताचा दुसरा, व इंजिनिअराचा तिसरा नंबर आहे.

याप्रमाणे भाषण झाल्यावर सरतेशेवटी रा० ब० रानडे यानी युनिव्ह-र्सिटीचा अभ्यासक्रम सुधारावा, ब्रह्मचर्यव्रत जास्त राखण्याची तजवीज करावी, बाहेरगावच्या लोकास अभ्यास पुढे चालविण्यास जेणेकरून साधन मिळेल अशा सस्था स्थापाव्या, अशा अर्थाच्या काही सूचना केल्या, व नतर त्याचे आभार मानून सभा बरखास्त झाली.

## सन १८९३ अखेरपर्यंतच्या ग्रॅज्युएटाची हकीकत

### कोष्टक १–ग्रॅज्युएटांची संख्या

| | दक्षिणी | गुजराथी | पार्शी | एकूण |
|---|---|---|---|---|
| एम्. ए. | ४६ | १३ | ४० | ९९ |
| बी. ए. | ७१८ | २४९ | २६४ | १२३१ |
| बी. एस्सी. | १० | ९ | ९ | २८ |
| एम्. डी. | ३ | ० | २ | ५ |
| एल्. एम्. एस्. | ८६ | ५० | १९४ | ३३० |
| एम्. सी. ई. | १ | ० | ० | १ |
| एल्. सी. ई. | १८० | ५१ | ४७ | २७८ |
| एलूएल्. बी. | १९० | ७१ | ६९ | ३३० |

# मूर्तिपूजेचा उद्भव

धर्मकल्पना पिशाचकल्पनेपासून आली आहे असें एकदा म्हटले म्हणजे पैशाचिक योनीप्रत पावलेल्या मृतात्म्याविषयी मनुष्यानी जे जे तर्क केले आहेत त्या बहुतेकाचा धर्माशीं आणि देवाशीं सबध जुळवून देता आला पाहिजे मूळ पिशाचाची कल्पना अशरीरी आत्म्यापासून आली हें अनेक वेळा सागितलेच आहे, व या अशरीरी आत्म्याची कल्पना स्वप्नात जागच्या जागीं नानातऱ्हेच्या सुखदुःखाचा जो भास होतो त्यापासून उत्पन्न होते ही गोष्ट प्रत्येकाला आपल्या अनुभवाने ठरविता येण्यासारखी आहे. झोंपेंतला आत्मा, मृतात्मा, पिशाचात्मा आणि देवात्मा—अशी ही चढती भाजणी आहे! तसेच थडगे, थडग्यावर किंवा थडग्यात ज्या वस्तु घालतात त्या आणि थडग्यावर केलेला मडप अथवा झोपडें यापासून स्थडिल, स्थडिलावर जीं होमद्रव्ये जाळतात तीं आणि देऊळ याची उत्पत्ति होतें, हें आतापर्यंत या विषयाच्या सबधाने जें लिहून गेले आहे त्यावरून वाचकाची खात्री झालीच असेल. मुर्जीत, लग्नात, श्रावणीला, किवा इतर प्रसगी मातीचे लहान कट्टे करून त्यावर दही, दूध, तूप, भात अथवा समिधा जाळण्याचा जो प्रकार चालतो त्यात, आणखी खड्ड्यात प्रेत पुरून त्यावर लादलेल्या मातीच्या ढिगावर अन्न आणून ठेवण्याचा, कोंबडीं किंवा बकरीं मारण्याचा आणि दारूच्या बाटल्या ओतण्याचा जो प्रकार चालतो त्यात, काय भेद आहे ? वास्तविक पाहता काही नाही, फक्त एकाला पूर्वजदान अथवा पिशाचदान आणि दुसऱ्याला देवदान अशीं पाहिजे तर निराळीं नावें देता येतील. तर मग आता देवळातच मूर्ति कोठून आल्या, व त्यात प्रार्थना करण्याचा परिपाठ कोठून पडला ?

धर्माची वशावळ लावणाराने या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर दिले पाहिजे. आतापर्यंत जें म्हटले आहे त्यावरून या प्रश्नाचा निकाल होत नाही. मृतात्म्याचे पिशाच व पिशाचाचा देव झाला असेल, थडग्यावरील मातींतून स्थडिल निघालें असेल, व थडग्यात पुरलेल्या प्रेतास पाऊस-वाऱ्याची बाधा होऊं नये म्हणून त्याचेभोवती चार मेढी पुरून त्यावर

घातलेल्या छपरापासून देवळाचा अवतार झाला असेल. परतु अमूर्त मृतानून मूर्त्युद्भव कसा झाला ? अशरीरी पिशाचाला देवरूपाने देवळात शरीर कोठून प्राप्त झाले ? व मनुष्यरूपी देवाच्या व देवींच्या मूर्ति जागोजाग कशा दृष्टीस पडू लागल्या याचा खुलासा होणे जरूर आहे.

बौद्ध, हिंदु, ख्रिस्ती. व महमदी हे सर्व धर्मांत चार प्रमुख धर्म होत. पैकी शेवटल्या दोहोत म्हणण्यासारखी मूर्तिपूजा नाही. बौद्ध लोक फक्त बुद्धमूर्तीची पूजा करतात. इतर देवास ते जुमानीत नाहीत आम्ही हिंदु लोक मात्र भले भक्कम मूर्तिपूजक आहो ! आमच्याप्रमाणेच जुने इजिप्शिअन, ग्रीशन व रोमन लोक मूर्तिपूजारत होते. यावरून काय दिसते की, मूर्तिपूजेला जसा पूर्वीच्या धर्माकडून उदार आश्रय मिळत होता तसा अलीकडील धर्माकडून मिळत नाही. आमचा हिंदु धर्म सध्या अस्तित्वात आहे तरी तो जुन्या धर्माप्रमाणे. त्यातहि मूर्तिपूजेचे मोठे बड असावें हे स्वाभाविक आहे. आता जुन्या धर्मात मूर्तिपूजेचे एवढे प्रस्थ का माजले असावे आणि अलीकडील धर्मातून तिला आपले अग काढून घेणे का भाग पडलें असावें, याचा निर्णय करणे हा अत्यत बोधपर व मनोरजक विषय आहे. पण आजच आम्हास त्यात पडण्याची गरज नाही. मूर्तिपूजा कोठेहि असो, ती तेथे कशी आली हें आम्हास प्रथम पाहावयाचे आहे.

मूर्तिपूजा तीन प्रकारची आहे. जड वस्तूची पूजा, वनस्पतींची पूजा, व प्राण्याची पूजा. नर्मदेतले दगड, वृंदावनातली तुळस व गोठ्यातली गाय—या तिन्हीहि वस्तू आपल्या देवता होत ! या तीन वस्तूंस तीन प्रकारच्या मूर्तींचे प्रतिनिधि मानून त्याचे तीन वर्ग अथवा गण मानले तरी चालेल. दगडाच्या गणात किंवा दृषदादि वर्गात चद्रसूर्यापासून मातीच्या पार्थिवापर्यंत पाहिजे त्या जड वस्तूचा समावेश करण्यास हरकत नाही. प्राणिगणात हवेत उडणाऱ्या, पृथ्वीवर चालणाऱ्या व पाण्यात पोहणाऱ्या पाहिजे त्या पक्ष्याचा, जनावराचा अथवा माशाच्या जातीचा अतर्भाव करता येईल. वनस्पतिवर्ग तर अमर्यादच आहे. याचा वैद्यशास्त्राशी सबध असल्यामुळे प्रत्येक झाडाला देवपण आलें आहे असे म्हटले तरी चालेल. अशा रीतीने विकास पावलेल्या त्रिविधात्मक मूर्तिपूजेचा उगम कोठे आहे हे निश्चयाने समजेल तर मोठी मौज वाटणार नाही काय ? अर्थात् वाटेल.

मूर्तिपूजेचें मूळ मनुष्याच्या स्वभावांतच आहे. जसा लहान मुलाला प्रबुद्ध व अप्रबुद्ध आणि सजीव व निर्जीव यातला भेद नीटसा कळत नाही, त्याप्रमाणेच प्रथमावस्थेंतील प्रौढ मनुष्यानाहि तो कळत नाही. मार्जेरें, कुत्रीं, वासरें वगैरेवर लहान मुलाचें प्रेम किती असते हे सर्वांना ठाऊक आहेच. त्याना ती आपल्या संवगड्यासारखीं अथवा कुटुंबातील इतर माणसासारखीं वाटतात. तसेच, पायरीवरून पडलें असता पायरीस मारल्याने त्याचे समाधान होते हेहि पुष्कळानी पाहिले असेल. या उदाहरणावरून आपल्या मनोधर्मासारखे मनोधर्म आपल्या सभोवतालच्या सजीव व निर्जीव पदार्थांत असावे अशीं ती सहजगत्या अनुमाने करतात असें दिसतें. उत्तरोत्तर असलीं अनुमानें चुकीची आहेत असा त्यास प्रत्यय येतो. पण तो येण्यास बराच काळ लागतो, आणि आला तरी काही गोष्टीविषयीं त्याचे ग्रह त्या अवकाशात इतके दृढ होऊन जातात कीं, पुढे ते काही केले तरी नाहींसे होत नाहीत. मूळ वस्तूचे गुण तिच्या प्रतिमेंत उरतात हा एक अशा प्रकारचा ग्रह होय, व हाच ग्रह प्रधानतः मूर्तिपूजेच्या मुळाशीं आहे. प्रथमावस्थेतील लोकाना प्रकृति आणि तिची छाया अथवा प्रतिकृति, यातील भेद बरोबर न समजल्यामुळे लहान मुलाप्रमाणे एकीचे गुण दुसरींत उतरतात असा त्याचाहि समज असतो, आणि म्हणून त्याना असे वाटतें की जर मृत मनुष्याच्या थडग्यावर त्याची प्रतिमा ठेवली तर तींत त्याचें पिशाच शिरेल, कारण त्याला हा आपलाच देह आहे अशी भ्रांति होईल. पुढे मृताचे चित्र थडग्यावर असो किंवा दुसरे कोठेहि असो, त्यात त्याच्या पिशाचाचा संचार होईल अशी खात्री वाटू लागते. एकदा अशा प्रकारच्या प्रतिकृतींत मृताचे आत्मे प्रवेश करतात अशी कल्पना दृढ झाली म्हणजे मृताच्या प्रेताप्रमाणेच त्याची सेवा ते करू लागतात. आफ्रिकेंत **निआंझा** नावाचे जे सरोवर आहे त्याच्या काठीं राहणाऱ्या नीग्रो लोकाविषयी जगप्रसिद्ध प्रवाशी लिव्हिंगस्टन याने असे म्हटले आहे की, हे लोक आपल्या मृताच्या मूर्ती करून त्याना आपल्या निरनिराळ्या आप्ताची नावे देतात, आणि प्रतिदिवशीं तांदूळ, कणीक, भांग, तंबाखू वगैरे वस्तू त्यापुढे ठेवून त्याना चिलमी फुकता याव्या म्हणून विस्तव तयार करूनहि ठेवतात! अशा रीतीने मृताची सेवा केली असता त्याना मोठा आनंद होतो, असा या

लोकांचा समज आहे. सिएरालीओन येथील एका नीग्रो स्त्रीविषयी बॅस्टि-अन याने असें सांगितलें आहे कीं, तिनें आपल्या खोलींत एकंदर चार मूर्ति करून ठेविल्या होत्या. एक आपल्या मेलेल्या नवऱ्याची, एक खुद्द आपली आणि दोन आपल्या दोन मुलांच्या. या मूर्तीस ती प्रतिदिवशीं मक्याचें पीठ आणि खोबरेल यांचें चोपडण करीत असे. अशा प्रकारें ज्या मूर्तींची आराधना करण्यांत येते त्यांचें मुळाशीं विशेष साम्य असावें लागत नाहीं. कधीं कधीं तर त्यांत व मुळांत फारच वैषम्य असतें. देवयोनीप्रत पावलेल्या पितरांच्या प्रतिकृतिस्थानीं दमारा लोकांनी लाकडाच्या दोन तुकड्यांची योजना करून ठेविलेली असते. विशेषप्रसंगीं अशा प्रकारच्या प्रतिकृति ते बाहेर काढतात. आपल्या लोकांतील भिल्ल व इतर जातींच्या अडाणी लोकांच्या मूर्तीविषयीं येथें विशेष सांगण्याची जरूरी नाहीं. एखादा मोठासा तेडाबागडा दगड पाहून त्यावर अर्ध शेर, पाव शेर शेंदूर अथवा हिंगूळ चोपडला किंवा थोडेसें तेल ओतलें कीं बनला तो म्हसोबा, पिरोबा, खंडोबा अथवा मारुती आणि झाली त्यापुढें अन्नाचे व मांसाचे नैवद्य व बळी देण्याची सुरुवात ! यावरून काय दिसतें कीं, मेलेल्या मूळच्या मनुष्यांत आणि पुढें त्याच्या नावानें केलेल्या प्रतिकृतींत कांही साम्य असो अथवा नसो; त्या प्रतिकृतींत मेलेल्याचे आत्मे संचार करतात, अशा या प्रतिकृति करणा-रांचा पूर्ण विश्वास असतो. तेव्हां ज्या लोकांत अशा प्रतिकृति दृष्टीस पडत नसतील त्या लोकांत अशा प्रकारचा विश्वास नसला पाहिजे असें अनुमान करणें जरूर आहे, आणि शोधाअंतीं वस्तुस्थितीहि तशीच आहे असें दिसून आलें आहे. आफ्रिकेंत वहाबी नावाचे लोक आहेत त्यांत असल्या कल्पना मुळींच नाहींत. असल्या आचरटपणाच्या मूर्तिपूजेचा यत्किंचित् देखील मागमूस त्या लोकांत लागत नाहीं. पण हें सांगतांना त्या लोकांस मृता-विषयीं पूज्यबुद्धिहि मुळींच नाहीं हेंहि सांगितलें पाहिजे. ते आपल्या मृतांचीं प्रेतें जंगलांत फेकून देतात, आणि तेथें तीं बहुधा व्याघ्रांच्या अथवा इतर वन्यपशूंच्या भक्ष्यस्थानीं पडतात.

मूर्तिपूजेचा उद्भव झाल्यानंतर लवकरच जडवस्तुपूजा, प्राणिपूजा व वनस्पतिपूजा असे तिचे पुढें तीन प्रकार होतात असें वर सांगितलेंच आहे. या प्रकाराविषयीं थोड्याशा खुलाशानें लिहून नंतर त्यापासून

जीं अनुमानें स्वाभाविकपणे निघतात तीं काढावयाचीं असा इरादा आहे.

आपण झाडें का पूजतों ? अर्थात् इतर वस्तूची पूजा करण्यास जीं कारणें असतील तींच झाडाची पूजा करण्यासहि असलीं पाहिजेत. जो मनुष्य स्वतः पराक्रमी आहे, किंवा ज्याचा पराक्रमी पुरुषाशीं कोणत्याहि प्रकारचा संबध आहे, अथवा ज्यापासून लोकाचें कोणत्याहि प्रकारचें मोठें हित होत आहे, अशा प्रकारच्या मनुष्याला बहुधा लोकात मान मिळतो. हाच मान वाढला म्हणजे त्याला पूजा म्हणतात, व ही पूजा करण्याची बुद्धि आपल्या अतः-करणात उत्पन्न झाली म्हणजे आपण तिला पूज्यबुद्धि म्हणतों. वड, पिंपळ, उबर, आपटा, शमी, तुळस, बेल वगैरे झाडाविषयीं आमच्या मनात जी पूज्यबुद्धि उत्पन्न झाली आहे ती वर थोडक्यात सागितलेल्या कारणापैकी कोणत्या तरी कारणानी उद्भवली असावी यात सशय नाही. **जिरेनिअम**-प्रमाणे तुळशींत हवा स्वच्छ करण्याचा गुण फार आहे, म्हणून आम्ही सारे तिचे भक्त बनलों आहो, किंवा **सर टी माधवरावांनी** एकदा सुचविल्याप्रमाणे बेल, तुळस, आणि गवती चहा याचा चहा ऊर्फ गोड काढा रोज सकाळीं घेतल्यास वातपित्तकफाची विशेष बाधा न होता प्रकृति साफ राहण्यासारखे गुण तीत आहेत, म्हणून आम्ही तिला देवाच्या पूजेतील एक अत्यावश्यक द्रव्य केलं आणि सर्व ऋतूत बायकाना तिच्याभोवती प्रदक्षिणा घालण्यास लाविले, हे निश्चयाने सागता येत नाही, तथापि येवढें खरे आहे की ह्या झाडाच्या अगच्या कसल्या तरी चागल्या गुणाबद्दल त्याला आमच्या घरात व देवळात इतके महत्त्वाचे स्थान मिळालें असावें ! वड, पिंपळ, उबर वगैरे मोठ्या गर्द छायेचीं झाडे आहेत, आणि त्यापासून पान्थास व इतरास मोठें सुख होते म्हणून त्यास देवत्व प्राप्त झाले असावे असे प्रथम दर्शनीं वाटण्याचा सभव आहे. पण वास्तविक कारण तसें दिसत नाही. तसे असेल तर आबा, बकुळ, फणस वगैरे दाट छायेचीं झाडे पूज्य का झालीं नाही ? आबा व फणस छायेला चागले असून खायलाहि काही वाईट नाहीत ! तेव्हा फायद्याच्या दृष्टीने ही झाडे विशेष पूज्य व्हायला पाहिजे होतीं. तसेंच याच दृष्टीने गुलाब, दवणा, मरवा, जाई, जुई, मोगरा वगैरे सुवासिक पानाचीं व फुलाचीं झाडेहि देवकोटींत जायला पाहिजे होतीं. पण तसेंहि झालेलें नाही. यावरून वड, पिंपळ वगैरे झाडास देवपण येण्यास दुसरें काही

तरी कारण झालें असावें. आमची कल्पना अशी आहे कीं, आबा, बकुळ, फणस वगैरे झाडाप्रमाणे हीं झाडें लावण्यास कष्ट पडत नाहीत, तीं आपल्या आपण कोठेहि येतात, व एकदा वाढीस लागलीं म्हणजे प्रचड विस्तार पावतात. गावच्या ओढ्याच्या किंवा नदीच्या काठीं, मोठमोठ्या देवळाजवळच्या पटागणात, पडक्या विहिरींत, भितीत व बुरुजात, प्रेतें पुरण्याच्या जागा असतील तेथे, अशा ठिकाणीं ही झाडें इकडचे बीं तिकडे आणि तिकडचें बी इकडे आपोआप पडून उत्पन्न होतात, आणि त्याची कोणी काळजी घेतल्याशिवाय मोठ्या झपाट्याने वाढत जातात आणि प्रचड विस्तार पावतात. कोणत्याहि भव्य पदार्थाविषयी जात्याच एकप्रकारची आदरबुद्धि उत्पन्न होते तशात दुसरे काही कारण झाले म्हणजे तो विशेष आदरणीय होतो. स्मशानात वाढणाऱ्या पिपळावर अथवा वडावर स्मशानात जाळलेल्या किंवा पुरलेल्या स्त्रियाचे व पुरुषाचे आत्मे पिशाचरूपाने येऊन बसत असतील अशी कल्पना, एकदा मनात आली कीं, तिने तुम्हाला घेरले म्हणून समजा. ज्या गावात भुताचे बसण्याउठण्याचे झाड नाही असा गाव बहुधा या देशात सापडावयाचा नाही. ही कामगिरी बहुधा पिपळाकडे येते. तथापि कधी कधी ह्या वायुस्वरूपी प्राण्याना चिंचेच्या झाडावर देखील सचार करण्यात मोठी मौज वाटते! तात्पर्य, झाडास जे देवपण आलें आहे ते पिशाचाचे अथवा देवाचे वसतिस्थान झाल्यामुळे आले आहे असें दिसते.

वनस्पतिपूजेचे रहस्य कळल्यावर प्राणिपूजेचें कळणे मुळीच कठीण नाही. स्मशानात किंवा ज्या दुसऱ्या ठिकाणीं भूतेखेतें नेहमी हिंडतात फिरतात असा विश्वास बसून गेलेला असतो, त्या ठिकाणीं येणारींजाणारीं जनावरे मृतात्म्यानीं धरलीं जातात असा समज होतो घुबडे, पाकोळ्या, साप वगैरे प्राण्याची पूजा कोणी करो अथवा न करो, मेलेल्या स्त्रियाचे व पुरुषाचे आत्मे त्यात प्रवेश करून आपल्या जुन्या ठिकाणी वारंवार येतात असे सर्व अडाणी लोक मानतात. विशेषतः साप अशा तऱ्हेने फार दृष्टीस पडतात असा सार्वजनिक समज आहे. "आमच्या घरचा नाग फार जुना असून त्याचे अगावर वीत वीत केस आहेत, रात्रीचा तो जाऊ लागला म्हणजे त्याच्याभोवतीं उजेड पडतो, तो कोणास कधी त्रास देत नाही, लहान मुलाबाळाच्या अंगावरून जातो, पण कधी कोणाला दश करावयाचा नाही;

त्याच्या छायेखाली आम्हाला कशाचेंहि भय वाटत नाही. एखादे वेळीं जाण्यायेण्याच्या वाटेवर पडल्यामुळे रस्ता बद होतो, मग थोडी प्रार्थना केली, आणि काही अपराध झाला असेल तर वडिलानी क्षमा केली पाहिजे, असें म्हटले म्हणजे मुकाट्याने निघून जातो."—अशा प्रकारच्या या जनावराच्या गोष्टी घरातील म्हाताऱ्या व म्हातारे सागताना पुष्कळानी ऐकल्या असतील. सर्परूपाने पिशाचे दश करतात, व चागल्या पचाक्षऱ्याच्या मारात तीं सापडली असता बोलू लागून दश करण्याचे कारण सागतात आणि त्याचे जे देणे असेल ते दिले म्हणजे विष उतरून घेऊन चालती होतात, असेंहि पुष्कळाचे म्हणणे आहे. दश केलेल्या मनुष्याच्या अगात मात्रिकाने आणिल्यावर तो बोलू लागला आणि दश करणारा साप सर्वांसमक्ष फरपटत येऊन व जखमेच्या जागीं आपले तोड लावून विष उतरून घेऊन गेला—अशी एका सर्पदशाची हकीकत आम्हास एका बी. ए. मामलतदाराने 'मी आपल्या डोळ्यानी पाहिली' असे सागितल्याचें स्मरते! काय असेल ते असो, बऱ्याच लोकात अशा प्रकारचा विश्वास असतो यात सशय नाही. आपण ज्याप्रमाणे नागपचमीला वैदूनी आणिलेल्या नागास दूध घालतो, त्याप्रमाणे पोलडचे लोक एका जातीच्या काळ्या सापाला दूध व अडी घालतात. एशिया यूरोप, आफ्रिका, व अमेरिका या चारहि खडातील बहुतेक देशात हा विश्वास आढळतो. आमचे श्रीकृष्ण परमात्मे शेषमचकावर पहुडले असून श्रीलक्ष्मी त्याचे पादसवाहन करीत असते हे कोणाहि हिदूला सागावयास नको. ज्ञानवृक्षाचे फळ खाण्यास मनुष्याच्या आद्य मातेला सैतानाने जो भुरळ पाडला तो सर्परूप धारण करून पाडला, असा ख्रिस्ती लोकाचा विश्वास आहे. गाय व बैल याची पूजा येथे रूढ होण्यास त्याची उपयुक्तता कारण झाली असावी हें उघडच आहे इतर देशातहि अत्यत उपयुक्त जनावराची पूजा करण्याचा परिपाठ असतो. ही पूज्य जनावरे खाण्याकरिता मारू नयेत असा निर्बंध सर्वत्र असतो असे नाही. पूर्वी आमचे लोक गाईची पूजा करीत असूनहि पहिपाहुणा आला असता घरच्या गाईच्या ताज्या गोऱ्ह्याचा अथवा पाडीचा समाचार घेण्यास मागेपुढे पाहात नसत, हे सुप्रसिद्ध आहे. तसेच धनगरानी किंवा आम्हीं ब्राह्मणानी बकरीं अगोदर पुजून मारून खाल्लीं, तरी त्यात त्याच्या अथवा आमच्या धर्मबुद्धीला मालिन्य

येतें असें श्रद्धावान् धनगरास व ब्राह्मणास वाटण्याचा संभव नाही ! फ्रेंच लोकाप्रमाणे आमचे लोकहि अश्वमेध करीत असत, व महिषमेध अजून करतात ! आपले आप्त मेल्यावर हरिण होतात असा उत्तरध्रुवाकडील काही लोकांचा समज असल्यामुळे ते हरणाच्या मासाला स्पर्श करीत नाहीत. मुसलमान लोकास वराहमासाची व नावाची जी इतकी चीड येते ती अशाच प्रकारच्या एखाद्या समजुतीमुळे येऊ लागली असावी. पण इंग्रज लोक याच मासाला मिष्टान्न समजतात ! जशी इंग्रज लोकास डुकराच्या मासाची तशी फ्रेंच लोकास घोड्याच्या मासाची प्रतिष्ठा वाटते, व दोघेहि एकमेकाच्या रुचिवैचित्र्याचा उपहास करतात ! आपण दिवाभीताला अमंगळ समजतो, पण जुन्या रोमन लोकाच्या निशाणावर त्याचें चित्र असे ! तात्पर्य, कोण लोक कोणते जनावर पूज्य मानतील आणि कोणत्या रीतीने त्याची पूजा करतील हे सागता येणे कठिण आहे. तथापि झाडाप्रमाणे जनावराची पूजा करण्याकडे मनुष्याच्या अंत:करणाची एका स्थितींत स्वाभाविक प्रवृत्ति होते हें मात्र निर्विवादपणें सिद्ध करून देता येण्यासारखे आहे

काही लोकातील आडनावाचा या प्राणिपूजेशीं बराच संबंध आहे असे अलीकडे दाखविण्यात येऊ लागले आहे. अमुक जनावरे पूज्य झालीं म्हणजे त्याशीं ज्या मनुष्याचे वास्तविक किंवा काल्पनिक साम्य असेल अशाना त्याचीं नावें देण्याचा परिपाठ पडतो. सिंहाप्रमाणें ज्याचा पराक्रम आहे त्याला सिंह म्हणण्यास काही हरकत नाही. ज्याचे आडनाव सिंह आहे अशाच्या कुटुंबाचा मूळ उत्पादक पुरुष प्रत्यक्ष सिंह असला पाहिजे असे नाही, सिंहाचे काही गुण त्यात असले तरी त्याला ते नाव देण्यास पुरे होतात. आमच्या लोकात सिंह, लाडगा, बैल, घोडा, कुत्रा, माजर, ससा वगैरे आडनावें पडलेली नाहीत. ख्रिस्ती लोकात तीं बरींच दृष्टीस पडतात, पण आमच्या लोकात मुळीच नाहीत असें नाही. वाघ, रेडे कावळे, आखलें वगैरे आडनावें पुष्कळाच्या ऐकण्यात असतील. या कुटुंबांचे मूळ पुरुष वाघ आणि रेडे असतील अशी कल्पना आज करणें जरी केवळ हास्यास्पद होणार आहे, तरी मनुष्याच्या मनात अशा कल्पना येऊन त्यावर त्याची श्रद्धा बसणें अशक्य नव्हतें असें मानण्यास पुष्कळ आधार सापडतो. असल्या आचरट कल्पनानी आपलीं पुराणें तुडुंब भरलीं आहेत. आपापल्या कामवासना तृप्त करण्या-

साठीं, आपापलीं वैरें साधण्यासाठी, अथवा भक्ताचे व मित्राचे मनोरथ पूर्ण करण्यासाठी मनुष्यानी व देवदानवानी ज्या अनेक हिकमती केल्या आहेत व जीं अनेक रूपे घेतलीं आहेत, त्याचे मजेदार मासले आपल्या भारतात व रामायणात बरेच सापडतील, अशी आमची पक्की खातरी आहे. गर्भधारणाला जेथे द्रोण किंवा घट पुरे होतो तेथे मुगी, माशी, झुरळ, साप, मासा, डुकर, कुत्रा, गाय, म्हैस असले प्राणी चाललेच पाहिजेत! त्यातल्या त्यात आमचे लोकाना परकायाप्रवेशविद्या पूर्वीपासून माहीत होती हे ध्यानात ठेवले, म्हणजे पिशाचयोनीप्रत पावलेल्या किंवा देवयोनीप्रत पावलेल्या मृतात्म्यानी या पृथ्वीवरील कोणत्या वस्तूशीं किंवा जीवाशीं समागम करून काय क्रीडा करावी अथवा कसली सृष्टि निर्माण करावी याविषयी कोणताहि नियम घालता येत नाही, किंवा अजमास करवत नाही! तसेच, जड वस्तू चैतन्यमय भासू लागून त्याशीं मृतात्म्याचा सबध होऊ लागला म्हणजे सूर्यचद्रापर्यंत त्याच्या गतीस अप्रतिहतत्व येतें. असें झाल्यावर भक्तवत्सल चद्राने, सूर्याने, मारुतीने, आगस्तीनें, नागाने, ध्रुवाने, किंवा खगोलातील अथवा भूगोलावरील दुसऱ्या कोणत्याहि लहान मोठ्या वस्तूने किंवा तिच्या शक्तीने मानवी स्त्रीशीं अथवा पुरुषाशीं स्वप्ना-वस्थेंत किंवा जागृतावस्थेंत समागम करून विलक्षण सृष्टि कधी कधी निर्माण केली, जननमरणाच्या सामान्य नियमाचें उल्लघन केलें, आणि कित्येक कुटुंबात आपलीं नावें कायम केली तर त्यात काय नवल आहे ? आणि मग त्याच्या आजच्या वशजानी आपल्या त्या दैवी, पिशाचयोनींतील अनैसर्गिक पूर्वजाची मूर्तिरूपाने प्राणप्रतिष्ठा करून पूजा चालू ठेवली तर त्यात नवल वाटण्याचे कोणालाहि कारण नाही

# इतिहासाचा अभ्यास

राष्ट्रीय शिक्षणाची चर्चा ज्या वेळीं प्रथम देशात सुरू झाली, त्या वेळीं प्रथम इतिहासाकडे सर्वांचे लक्ष वेधले. कारण आरभी तरी राष्ट्रीय व सरकारी किंवा निमसरकारी शाळातील एकदर अभ्यासक्रमात फारसा फरक नव्हता. तेच विषय, व दोन्हीहि प्रकारच्या शाळात विषयाची व्याप्ति देखील जवळ जवळ सारखीच होती. राष्ट्रीय शिक्षणमडळामार्फत तळेगाव येथे निघालेल्या समर्थ विद्यालयाचा अभ्यासक्रम मुबईच्या मॅट्रिक्युलेशनसारखाच होता. शिक्षण देण्याच्या पद्धतींत मात्र समर्थ विद्यालयाने आघाडी मारली. गणितादि विषय परभाषेतून शिकविण्याऐवजी स्वभाषेतून शिकविले तर विद्यार्थ्यांना साहजिकच लवकर समजतात, व त्यामुळे त्याच्या मनावर अभ्यासाचा फारसा बोजाहि पडत नाही, ही साधी गोष्ट समर्थ विद्यालयाच्या चालकाच्या चटकन् लक्षात आली, व त्यानी ती प्रचारातहि आणली. याचा उपक्रम पूर्वीच सर्व सरकारी व निमसरकारी शाळातून व्हावयास पाहिजे होता. परतु येथील शिक्षणाचीं सूत्रे इग्रजी अधिकाऱ्याच्या हातात असल्यामुळे त्यानी या गोष्टीची हेळसाडच केली. हिंदी मुलाविषयी आपलेपणाचा जिव्हाळा कोणत्याहि इग्रज शिक्षकाला—त्याने तसा कितीहि डौल आणला तरी—वाटणे शक्य नाही. वाटला असता तर हिदी मुलाची गेलीं साठ वर्षे झालेली बौद्धिक कुचबणा खात्रीने टळली असती. प्रत्येक साहेबाला ठाऊक आहे कीं, इग्लडच्या शाळात जर्मन भाषेतून गणित शिकवीत नाहीत. परतु हिदी मुलाच्या बाबतींत हा विचार करतो कोण? याशिवाय दुसरी गोष्ट ही कीं, आपल्यातील सुरेद्रनाथ बानर्जीसारखे काही पुढारी इग्रजी शिक्षणाने इतके दिपले होते कीं, हिदी मुलाना हुबेहूब साहेबासारखे इग्रजी बोलता आलें पाहिजे, हिंदी मुलानी साहेबाचा अस्पष्ट बोबडा उच्चार देखील जसाच्या तसाच गिरविला पाहिजे, असा आग्रह ते धरीत. आणि त्यामुळे, लोकाच्या चळवळीमुळे शिक्षणाचे माध्यम ठरविण्यासाठी जी शिक्षणविषयक तज्ज्ञाची सिमला येथें कान्फरन्स भरली, तिच्यातून काहीच निष्पन्न झालें नाही. नवीन सुधारणान्वये शिक्षणाची सर्व सूत्रें

लोकप्रतिनिधींना जबाबदार असणाऱ्या, व त्याच्यातूनच नेमलेल्या दिवाणाच्या हातीं गेल्यानंतरच त्या प्रश्नाला दहा वर्षानंतर पुनः चालन मिळालें व मध्यप्रांतांत तर बहुतेक सर्व सरकारी शाळांतून मातृभाषेच्या द्वारें शिक्षण देण्यास सुरुवात झाली देखील या साध्या प्रश्नाकडे इंग्रज लोकांनी जे भयंकर दुर्लक्ष केले त्याचा विचार करता, समर्थविद्यालयाची ती कामगिरी अत्यंत प्रशंसनीय ठरते. शिक्षणाच्या माध्यमाबद्दल आज जवळजवळ एकमत आहे, पण पंचवीस वर्षांपूर्वी ती नवी गोष्टच होती.

समर्थ विद्यालयाने विद्यार्थ्यांना बाहेर सहलींना नेणे, त्यांना नीतिपाठ देणे वगैरे शिक्षणाच्या पद्धतींत सुधारणा केल्या. पण त्यांनी आखलेला अभ्यासक्रम मुंबई युनिव्हर्सिटीच्याहून फारसा भिन्न नव्हता. प्रचलित अभ्यासक्रमांत सर्वतोपरी क्रांति केली पाहिजे, अशा मताचे थोडेबहुत लोक आज असतील, पण असहकारितेच्या चळवळीमुळे निघालेल्या नव्या राष्ट्रीय शाळेंतील अभ्यासक्रमहि सरकारी शाळांच्या नमुन्यावरच आहे विषयाच्या मांडणींत त्यांनी बदल केला आहे ही गोष्ट खरी, पण हा शिक्षणपद्धतीचा बदल आहे ही गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. त्यानें फार तर एवढेच सिद्ध होईल कीं, प्रचलित शिक्षणपद्धति वाईट आहे, परंतु प्रचलित अभ्यासक्रमाविरुद्ध असहकारितावाद्यानांहि कांही म्हणावयाचे नाही. याचे कारण उघड आहे. भूगोल, गणित, पदार्थविज्ञान वगैरे शास्त्रांतील प्रमेयें राष्ट्रीय शाळा झाल्या तरी त्या कशा बदलणार ? आणि विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण शिक्षणाला ते विषय नकोत, असे तरी कोण म्हणणार ?

परंतु इतिहास मात्र या विषयाच्या यादींतून सपशेल निसटला. सरकारी शाळांतून शिकविण्यात येणाऱ्या इतिहासाविरुद्ध फार दिवसांपासून ओरड सुरू झाली आहे. केसरीचे जुने अंक उघडून पाहिले तर ही ओरड फार दिवसाची जुनी आहे असे आढळून येईल, आणि या ओरडीचा मुख्य पुरावा, **शिवाजी लुटारू होता**, असें आमच्या मुलांना शिकविण्यात येतें, हाच ठिकठिकाणीं निरनिराळ्या स्वरूपांत मांडण्यात येत असे. **'शिवाजी लुटारू होता'** याऐवजी **छत्रपति श्रीशिवाजीमहाराजांनी गोब्राह्मणप्रतिपालनाचे व्रत अंगीकारून हिंदवी स्वराज्याची**

**स्थापना केली**, असें वाक्य आपापल्या इतिहासातून मार्सडेनप्रभृति ग्रंथकारानी घातलें असते, तर हे सर्व आक्षेपक मार्सडेनवर खूष झाले असते, व त्याच्यासारखा मराठ्याचा इतिहास जाणणारा इंग्रज झाला नाही, अशी त्याला सर्व राष्ट्रीय वृत्तपत्रातून शाबासकीहि मिळाली असती. कारण, या प्रश्नाचा बारकाईने विचार केला आहे कोणी ? चारदोन मनाला बोंचणारीं वाक्यें वाचून मार्सडेनप्रभृतींवर घसरणारा वाचकवर्ग असल्या एका वाक्याने त्याच्यावर बालबाल खूष झाला असता. बिचारा मार्सडेन दुर्दैवी ! हिंदी लोकांच्या मताने उत्तम इतिहासकार होण्याचा हा सोपा रामबाण उपाय त्याला सुचला नाही. आमच्या या लिहिण्यात ज्याना अतिशयोक्ति वाटत असेल, त्यानी **किंकेड, रालिन्सन** वगैरे लोकानी शिवाजीमहाराजाना व मराठ्याना लाडाने थोडेसे चुचकारताच ते कसे निःपक्षपाती इतिहासकार ठरले, व त्याच्या पुस्तकाचीं नेमस्त व राष्ट्रीय या दोन्ही पक्षाच्या विद्वानाकडून कशी प्रशंसा झाली ही गोष्ट लक्षात घ्यावी, म्हणजे आमचें लिहिणे त्याना पटेल

मनाला प्रथमदर्शनी बोंचणारीं चारदोन वाक्ये काढून हा प्रश्न सुटण्यासारखा नाही. आज अनेक वर्षे रूढ झालेली इतिहासाच्या अभ्यासाची मूलभूत कल्पनाच बदलल्याशिवाय हा प्रश्न सुटणारा नाही. आमच्या म्हणण्याच्या स्पष्टीकरणार्थ, हिंदुस्थानात सर्वांच्या परिचयाचे झालेले दोन प्रसिद्ध इंग्रज इतिहासकार **ग्रँट डफ** व **टॉड** यांची उदाहरणे घेतलीं म्हणजे पुरे. ग्रँट डफच्या इतिहासात कितीहि चुका असल्या तरी त्याने प्रथमच मराठ्याचा सगतवार इतिहास लिहून केलेली सेवा कोणीहि विसरणार नाही. टॉडने लिहिलेला अप्रतिम ग्रंथ थोडासा कादंबरी वळणावर गेला असला तरी राजस्थानच्या इतिहासावर त्याने मोठाच प्रकाश पाडला, अशी अनेक विद्वानानी अनेक वेळा कबूली दिली आहे. इतकेच नव्हे, तर सामान्य जनतेंतसुद्धा टॉडचा इतिहास व त्यातील कथा प्रचलित झाल्या, व रजपुताच्या शौर्याचें मुक्तकंठाने वर्णन करून त्याच्या धीरोदात्त गुणाची जगाला ओळख करून दिल्याबद्दल टॉडचा सर्वत्र बोलबाला झाला. उलटपक्षी हिंदी विद्वानापेक्षा इंग्रजातच ग्रँट डफचे कौतुक झालें. ज्या हिंदी विद्वानानी तो ग्रंथ वाचला त्यांनी त्याची व त्याच्या कर्त्याची मनसोक्त निंदाच केली, आणि

सामान्य जनतेंत तर मराठ्याची बदनामी करणारे एक लहानसे भिकार चोपडे लिहिणारा भिकार लेखक, यापेक्षा ग्रँट डफचे नाव अधिक प्रसिद्ध नाही पण भारत इतिहाससंशोधक मंडळ जन्मास येण्यापूर्वी किंवा महाराष्ट्र-इतिहास-संशोधनाचार्य राजवाडे यानी आपल्या कार्याला प्रारंभ करण्यापूर्वी कैक वर्षे, ग्रँट डफने, त्याला मिळविता आली तितकी महत्त्वाची साधनें मिळवून, तो परकीय असल्यामुळे बखरींचें हृद्गत त्याला समजेल तितके नीट समजून घेऊन, अतिशय परिश्रमाने मराठ्याचा सगतवार इतिहास लिहून हिंदुस्थानच्या इतिहासात स्वतंत्र मराठी रियासतीचें अस्तित्व जगाच्या नजरेस आणलें व भावि संशोधनकार्याचा भरभक्कम पाया घातला. इतकें असूनहि, त्याच्या कपाळावर काळा शिक्का मारला गेला उलटपक्षी, टॉडने इतिहासापेक्षा प्रेमपूर्ण कथाना अधिक महत्त्व दिले, राष्ट्राच्या मार्गक्रमणापेक्षा व्यक्तीच्या धडाडीकडे अधिक लक्ष पुरविले, व एक रम्य ऐतिहासिक व वाचावयास मनोरंजक असे बाड वाचकाच्या हातीं दिले. टॉड ही गोष्ट जाणून होता, व म्हणूनच त्याने आपल्या ग्रंथाला इतिहास ( History of Rajasthan ) असें नाव न देता कथासारमाला ( Annals of Rajasthan ) असें नाव दिले. या दोन्ही पाश्चात्य ग्रंथकाराच्या कृतींत इतिहासाच्या दृष्टीने असा जमीनअस्मानाचा फरक असताना, टॉडचा बोलबाला होतो व ग्रँट डफ आचरट व दुष्ट ठरतो ! ही मौज कशी घडून आली ? हा चमत्कार असला तरी, त्याची मीमांसा लावणें फारसे कठीण नाही. टॉडच्या इतिहासात आमच्या हल्लीच्या कर्तृत्वशून्य मनाला पूर्ववैभवाची आठवण करून देऊन क्षणभर गुदगुल्या करणारीं वाक्ये इतस्ततः पसरलीं आहेत. उलटपक्षी, ग्रँट डफच्या इतिहासात अशा गुदगुल्या करणाऱ्या वाक्याचा अभाव असून, मनाला थोडींबहुत बोचणारींच वाक्ये ठिकठिकाणीं आढळतात. हिंदी लोकाना इतिहासलेखनात कसें खूष करता येईल, ही मख्खी इतक्या उशीरा जन्माला आलेल्या मार्सडेनला कळली नाही, तर ती बिचाऱ्या पुराणकालीन ग्रँट डफला कशी कळावी ? त्याने जर छत्रपति शिवाजीमहाराजाकडून हिंदवी स्वराज्याची घोषणा वेळींप्रसंगी करविली असती, तर त्याचा इतका दुर्लौकिक न होता. ज्या कारणानी किंकेड, राॅलिन्सनप्रभृति फाटक्या इतिहासकाराचा बोलबाला

झाला, तींच कारणें टॉडच्या कीर्तीलाहि उपयोगी पडलीं; कारण त्याच्या ग्रथात 'रजपूत लोकाचा यशोगौरव', 'त्याचा कीर्तिदुदुभि', 'त्याच्या पराक्रमाचें वर्णन राजस्थानातील प्रत्येक लहानमोठी टेकडी देखील अनत कालपर्यंत करील', अशी गोड वाक्ये ठिकठिकाणीं पसरलीं आहेत, आणि म्हणूनच टॉडचा जयजयकार व ग्रँट डफचा निषेध वेळप्रसगी बहुजन-समाजात होत असतो खरें म्हटले तर रजपुताच्या इतिहासात हिंदी राष्ट्राने अभिमान धरण्याजोगी अशी कोणती गोष्ट आहे ? राणा प्रतापसिंह अत्यत शूर व स्वाभिमानी होता, आणि अनेक सकटे सोसूनहि तो अकबर बाद-शहाच्या प्रचड सैन्याशी वर्षानुवर्षे झुजत राहिला, पण त्याला शरण गेला नाही, ( एका प्रसगाने याहि गोष्टीला दुर्दैवाने गालबोट लागले आहे. उद्वेगाच्या भरात राणा प्रतापसिंहाने एकदा अकबर बादशहाला तहाचा सदेश पाठविला होता पण पृथ्वीराजाने तो कागद बनावट आहे, असे अक-बरला ठासून सागितले, आणि अत्यत उत्तेजनपर दोहे पाठवून प्रतापाला लढण्यासाठी पुनः उद्युक्त केले या प्रसगीं प्रतापसिंहाची लाज अक-बराच्या दरबारातील पृथ्वीराज या राजकवीनेच राखली ) ही गोष्ट खरी आहे. प्रतापसिंहाच्या शौर्याचे कितीहि कौतुक केले, तरी प्रतापसिंहाला राजस्थानच्या सर्व रजपुतात एकी घडविता आली नाही, व सबध राजपुताना अकबराच्या सत्तेशी आपल्या अधिपत्याखाली घेऊन झुंजविता आला नाही, ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. तसें जर प्रतापसिंहाला करता आले असते तर शिवाजीमहाराजाचे यश प्रतापसिंहाच्या पदरात पडले असतें, आणि रज-पूत लोकाच्या शूरत्वामुळे हिंदु पातशाहीची स्थापना केव्हाच झाली असती. अकबरासारख्या धूर्त बादशहाला हे कळत असल्यामुळे तो प्रतापाची वेळ-प्रसगीं प्रशसा करी, परंतु मैत्री मात्र इतर रजपूत राजाशीं करी. प्रताप-सिंहाचे नाव वगळले तर राजस्थानच्या इतिहासात काय आढळते : टॉडने रजपूत लोकाची कितीहि प्रशसा केली असली तरी ह्या प्रशसेने हिंदी राष्ट्र कायमचे आंधळे होऊ शकत नाही. एखाद्या क्षुल्लक कारणावरून दोन रजपूत घराण्यात एकदा वाकडे आलें म्हणजे त्याच्यापैकी प्रत्येकाने सधि साधून दुसऱ्याचा मुलूख बेचिराख करावा, दुसऱ्याचीं मुलेंमाणसें जीं कोणी हातीं लागतील त्याची सरसहा कत्तल करावी, त्याच्या राजवाड्याची पेटवून होळी करावी, आणि

दुदुंभि वाजवीत विजयोत्सवाने परत आपल्या राजधानीला यावे! दुसऱ्या पक्षानेहि अनुकूल काळ येताच याच अत्याचाराची पुनरावृत्ति करावी. बरें हें वैर चालविण्याची मुदत तरी असावयाची ? छे! हे वैर पिढ्यान्‌पिढ्या चालावयाचे ? बापाने मरताना या वैराची ठेव मुलासाठी ठेवावयाची व 'पुरा सूड उगवीन' अशी मुलाने प्रतिज्ञा करताच बापाच्या शरिरातील घुटमळणारा आत्मा तृप्त होऊन स्वर्गाला जावयाचा! त्या दोन घराण्याचे जे कोणी मित्र असतील त्यानींहि आपापल्या मित्राचे अभिमान धरून असलेच अत्याचार आपसात करीत राहावयाचे जिवावर उदार होऊन शत्रूचा पुरा सूड उगवायचा, हेंच त्याचे ब्रीदवाक्य आणि भाऊबदकी हेंच त्याच्या जीवनाचें ध्येय! रजपुताच्या शौर्याचा जो दिव्य इतिहास टॉडने वर्णन केला तो हाच! या आपापसातील मूर्खपणाच्या कलहामुळे राजस्थानातील मुलूख बेचिराख झाला, व शूर आणि तरुण लढवय्ये मृत्युमुखीं पडले! मोगलाना त्यामुळे या प्रदेशावर आपले स्वामित्व चुटकीसरसे बसविता आले. बरें, परस्थ मोगल लोकाशी याची वर्तणूक वाचली म्हणजे प्रत्येक स्वाभिमानी हिंदी माणसाला याच्या नावाने खाली मान घातलीच पाहिजे. या रजपूत राजानी व सरदारानी मुसलमानाच्या नोकऱ्या पत्करल्या, त्याची थुकी झेलून त्याच्या आज्ञेनेच या बहाद्दरानी आपल्याच लोकाशी युद्ध करून त्याना आपल्यासारखेच गुलाम बनविले! फार काय, पण या रणशूर म्हणून नावाजलेल्या वीरराजानी निर्लज्जपणाने आपल्या लेकीबहिणी मोगलाच्या जनानखान्यात कोंबल्या, व 'आज आम्ही आणि आमचे स्वर्गातले पितर धन्य झालो' असा जयघोष केला! हेंच रजपुताचे शौर्य व हाच त्याचा स्वाभिमान आणि यशोगौरव! मुसलमानानी याच्या लेकीबहिणी आपल्या जनान्यात खेचून याच्या तोंडाला इतिहासाच्या दृष्टीने कायमचे डांबर फासले, तरी याचे आपसातील कलह व अत्याचार पूर्वीसारखेच जोमाने चालू होते. यान्यातील अनेक कर्मचांडाळ, मोठ्या नोकरीच्या किंवा मनसबदारीच्या लालचीने, स्वधर्मावर लाथ मारून मुसलमान बनले. मानसिंगाचा मोहोबतखान होणे, ही गोष्ट त्या वेळी सामान्यच समजली जात होती. अकबराच्या मीनाबाजारात याच्या घरच्या कुलदेवताच्या सौंदर्याची लूट चालली होती, पण याना त्यात

आनंदच वाटे! कारण बादशहाची, युवराजाची, किंवा दुसऱ्या एखाद्या पराक्रमी मुसलमान सरदाराची आपल्या कुलांगनावर मेहेरनजर झाली, तर त्या शिफारशीने आपला उत्कर्ष झपाट्याने होईल! एखादी पतिव्रता अशी अडचणीत सापडली म्हणजे प्रसंगीं कट्यारीच्या साहाय्याने आपल्या देहाचा अंत करीत असे, परंतु कुलांगनाचें पातिव्रत्य बळी देऊन मोठे होणारे अनेक कुलांगार राजस्थानांत त्या वेळी जन्मास आले, हाच राजस्थानचा यशोमंडित इतिहास! अफूच्या गोळ्या खाऊन त्यांच्यापैकी बहुतेक लोक त्या कैफांत जिवावर उदार होऊन लढत असत, ही गोष्ट कबूल केली पाहिजे, पण राष्ट्राच्या दृष्टीने हे व्यक्तिविषयक कैफी शौर्य काय कामाचें? खऱ्या शूराला प्रसंगीं माघार घ्यावी लागते, प्रसंगीं नमतें घेऊन तहहि करावा लागतो, व राष्ट्राच्या बचावाकरितां स्वतःची व्यक्तिविषयक मानहानीहि होऊं द्यावी लागते! रजपूत लोक अफूची नागीण खाऊन एकदा बाहेर पडले म्हणजे यापैकी काहीच करीत नसत. रणांगणावर आपण सर्वच्या सर्व गळलो तर देशाचें विलक्षण नुकसान होईल, ही साधी गोष्ट त्यांच्या स्वप्नींहि येत नसे. मुत्सद्देगिरीचा तर या गांजेकसांना गंधहि असणे शक्य नाही. अफूच्या निशेंत दाखविलेलें शौर्य अविचारी ठरणे स्वाभाविक आहे, आणि म्हणूनच रजपुतांच्या या अचाट शौर्याने राष्ट्राच्या दृष्टीने कोणताहि दिग्विजय लावला नाही. या अफिमी शौर्याचे कौतुक केलें तरी घरच्या म्हातारीचे काळ व परक्याचे दास झालेले रजपूत राष्ट्राच्या दृष्टीने तुच्छच ठरतात. रजपुतांचा इतिहास आजच्या हिंदी राष्ट्राला काळिमा आणणारा आहे. हिंदी लोकांची दिशाभूल व्हावी या दृष्टीनेंच कदाचित् टॉडने तो कथाभाग इतक्या उठावदार रीतीने व गौरवून लिहिला असेल, आणि टॉडचा तसा उद्देश असल्यास तो सिद्धीसहि गेला, असें म्हटलें पाहिजे. कारण हिंदी लोकांची इतिहासाविषयी खरोखरच दिशाभूल झाली, आणि रजपुतांच्या शौर्याच्या गोष्टी* लोक मोठ्या

---

* नाही म्हणावयास श्री नारायण हरि आपटे या प्रसिद्ध कादंबरीकाराने लिहिलेल्या 'रजपुतांचा भीष्म' व 'संधिकाल' या कादंबऱ्यांत रजपुतांच्या शौर्याची दुसरी काळी बाजू थोडी फार दाखविली आहे. परंतु टॉडने उत्पन्न केलेल्या ऐतिहासिक नजरबंदींतून तेहि पुरतेपणी सुटल्याचं दिसत नाही.

अभिमानाने व गौरवाने सभातून, वृत्तपत्रातून व कादबऱ्यातून सागू लागले. या उत्पन्न झालेल्या ऐतिहासिक नजरबदीने लोकाचे डोळे फिरून गेले आणि इतिहासाच्या अभ्यासाला निराळेंच विकृत वळण लागले.

रजपूत लोकात अफूचे व्यसन फारच बोकाळले होतें. महमद घोरीच्या वेळीं जितक्या प्रेमाने व उत्साहाने अफूचे सेवन रजपूत लोक करीत असत तितक्याच प्रेमाने अकबराच्या वेळीहि ते करीत असत. राजपुतान्यात व शेजारच्या माळव्यात अफू फार पिकते. वीस वर्षापूर्वी या लहानशा प्रदेशातील अफूच्या करामुळे बारापधरा कोट रुपयाचे हिंदुस्थान सरकारला उत्पन्न होत असे. अफूच्या जोडीला भाग गाजाहि तिकडे पिकत असल्यामुळे, रजपूत लोक साहजिकच नशेबाज बनले गाजा, चरस, माजूम वगैरे अनेक नशाचे पदार्थ तेथील दुकानातून मुबलक विकत मिळतात. अफू बाहेर जाताना तिच्यावर सरकारी कर बसतो व ती महाग होते. परतु खास राजपुतान्यात अफू, भाग वगैरे पदार्थ अत्यत स्वस्त मिळतात. तेथे अजूनहि हे पदार्थ आपल्याला कल्पना करता येणार नाही इतके स्वस्त विकले जातात. ज्याप्रमाणे आपण काद्याची किंवा गिलक्याची भर्जी करतो, त्याप्रमाणे तिकडे लोक अफूच्या हिरव्या कोवळ्या कोवळ्या बोडाची भर्जी करतात, व मुलाबाळाना देखील ती खुशाल खाऊ घालतात. अफूच्या विषाचे घातुक परिणाम ज्यानी 'Confessions of an Opium-eater' ( अफीमबाजाची कबूली ) हे पुस्तक वाचले असेल, त्याच्या लक्षात सहज येतील. चिनी लोकात अजूनहि अफू खाण्याची व ओढण्याची सवय असल्यामुळे अफीमघराची वर्णने इग्रजी कादबऱ्यातून ठिकठिकाणी वाचावयास मिळतात जशीं कोकणात चहाबाजाच्या सोयीसाठीं खेड्यापाड्यातून देखील हॉटेले आढळतात, त्याचप्रमाणे लडन येथे राहणाऱ्या चिनी लोकानी आपल्या सुखसोयीकरिता तेथेहि अफीम-घरे ( opium dens ) उघडलीं आहेत. त्याचे वर्णन वाचूनच साधारण माणसाच्या अगावर शहारे येतात, व 'नको हा नरकाचा देखावा' असे होऊन पुस्तक घटकाभर तरी तो बाजूस सारतो. पण अफीमबाजाना त्यातच ब्रह्मानद वाटणार. राजस्थानात हे व्यसन इतकें बोकाळले आहे कीं, महाराष्ट्रातील दहा माणसें सहज मृत्यु-

मुखीं पडतील एवढी अफूची गोळी रोज सकाळीं खाऊन पचविणारे अनेक रजपूत पठ्ठे तेथे आढळतील. कित्येकाच्या अंगात तर अफूचें विष इतकें भिनलें असतें की, भयंकर विषारी काळा नाग चावला तरी त्यांना विषबाधा होत नाही. दारूपेक्षा अफू किती भयंकर विष आहे, हे डॉक्टर व वैद्यच यथातथ्य सांगू शकतील. या अफूच्या पिढ्यानूपिढ्या चालत आलेल्या नशामुळे रजपूत लोकांची बुद्धि व नीति मातींत मिळाली तर त्यात नवल नाही. नशांत एकदा जी धुंदी यावयाची तिच्यापुढे सारासार विचार कसा व कोठून टिकणार? इतिहासप्रसिद्ध चितोडगडावर अलाउद्दिनाच्या वेळीं पहिला जोहार झाला, त्या वेळीं रजपुतांनी केलेला आचरटपणा प्रसिद्धच आहे. मुसलमानाच्या हरामखोरीची माहिती होऊनहि अलाउद्दिनाला गडावर नेऊन आरशातून सती पद्मिनीचे स्वरूप त्याला दाखविणे दोन्ही पक्षांत लढाई चालू असतां अलाउद्दिनाला पोहोचविण्याकरितां म्हणून राण्याने गडाखाली जाणे व शत्रूच्या कैदेत पडणे—वगैरे आचरटपणा अफीमबाजाला साजेसाच आहे. पण टॉडने या मूर्खपणाचा सत्याच्या नावाने जयघोष केला आहे. रजपूत लोक सत्यवचनी असल्यामुळे त्यांनीं मुसलमानावर विश्वास टाकला, अशी मखलाशी टॉडने या प्रकरणावर केली आहे हे खरे म्हणावें तर रजपुतांनी जेव्हा जेव्हा मुसलमानांशीं प्रसंग आला तेव्हा तेव्हा अशाच मासल्याचा आचरटपणा करून, आपल्या पायावर धोंडा पाडून घेतला आहे. शुद्धीवर असलेला मनुष्य विश्वास टाकून एकदा फसेल, दर वेळेस खास फसणार नाही प्रत्येक वेळीं तो तसा फसू लागला तर त्याच्या बुद्धीची रक्षा झाली, असेच म्हणणे भाग पडेल विश्वासाचा असा खेळखंडोबा संसार सोडून साधु झालेल्या एखाद्या दुसऱ्या संतश्रेष्ठाला शोभेल, राज्यकर्त्यांना तो शोभू शकत नाही कृष्णाकुमारीच्या वेळेला तर राण्याला कसलाच भरवसा वाटला नाही तो एका पक्षाला निश्चयाने चिकटून बसला असता, तर कृष्णाकुमारीचे व राज्याचेहि रक्षण झाले असतें. पण अफूच्या सेवनाने जळलेल्या बुद्धीला हे कसे सुचणार? मुत्सद्देगिरीला तर तो पारखाच! बिचारी कृष्णा मात्र अकालीं आणि तीहि पित्याच्या हातून मारली गेली. देशाच्या कल्याणासाठी कृष्णेने आपले स्वेच्छेने बलिदान केले म्हणून टॉडने कितीहि मल्लिनाथी लढविली, तरी तिच्या बापाची—

त्या अफीमबाजाची—बुद्धि इतकी भ्रष्ट झाली होती कीं, दुसरा कोणताहि मार्ग शोधून न काढता त्याने आपल्या कन्येचा खून केला, ही गोष्ट छपत नाही. ज्याचा विश्वास धरावयाचा त्याच्याशीं दुष्टपणाने वागावयाचें व करीमखानासारख्या हलकट परस्थाच्या भुलथापावर विश्वास टाकावयाचा, ही अफीमबाजाची बुद्धि असणे स्वाभाविक आहे. चितोडगडावर रजपुताच्या हातून अनेक मूर्खपणाचे प्रकार घडले, याचे कारण म्हणजे तेथे असलेला अफूचा विलक्षण प्रचार हे होय. वीस वर्षांपूर्वी चितोडच्या सरकारी अफूकाट्यावर अफूच्या सरकारी कराची रकम एक कोटीच्या वर जात असे, ही गोष्ट आम्ही विसरलो नाही.

या सर्व मूर्खपणावर टॉडने पाघरूण घालून, प्रत्येक गोष्टीबद्दल रजपूत लोकाची स्तुतीच केली आहे. एखाद्याचा बडेजाव करावयाचा असे मनाने एकदा घेतले म्हणजे पुरे. त्याने चोरी केली तर 'गरीबीमुळे त्याने चोरी केली. तो श्रीमत असता तर चोरी कधीहि न करता. घरची परिस्थिति इतकी प्रतिकूल असताहि त्याने इतके दिवस मनावर जय मिळवून चोरी केली नाही, व चोरी करताना रक्तपातहि मुळीच घडू दिला नाही याबद्दल त्याची प्रशसाच केली पाहिजे', असे या निष्कारण स्तुतिपाठकाला सहज म्हणता येईल. एवढेच काय तर अनीतीच्या मुळाशीं दारिद्य आहे, असें प्रतिपादून, दारिद्याची हकालपट्टी करण्यात लोकाना गुतवून मूळ चोरीच्या विषयावरून त्याचे मन त्याला दुसरीकडे वळविता येईल एखाद्याने खून केला तर त्यात त्याचा लष्करी बाणा व तेजस्वी स्वभाव प्रगट झाला असे म्हणून, हडेलहप्पी करणारा शिपाईगडी वेळप्रसगीं मन शात ठेवू शकत नाही, हा ठाम सिद्धान्तहि स्थापन करता येईल एखाद्याची तारीफ करावयाचे ठरले म्हणजे, मुखदुर्बळाला नम्र, वाचाळाला सभापडित, कजुषाला मितव्ययी, उधळ्याला उदार अशी विशेषणे लावून, लोकाची नजरबदी करणे फारसे कठीण नाही. टॉडने याच राजमार्गाचे अवलबन केले. रजपूत लोकाच्या अफीमबाजीच्या नशात घालवलेल्या राष्ट्रघातकी व निद्य जीवनक्रमाला, ओजस्वी, शूर, यशोमडित, उदार, सत्यवचनी अशीं विशेषणे लावून त्याच्या हिंदी राष्ट्राला काळिमा आणणाऱ्या इतिहासाला सत्याचा व शौर्याचा

आदर्श ठरविलें. साहेबलोकांच्या तोंडून आमच्या दुबळ्या मनाला गुदगुल्या करणारे दोनचार शब्द बाहेर पडले म्हणजे आम्ही त्याना कसें उराशीं धरतों, हे आरभींच किंकेड व रालिन्सन याच्या उदाहरणानी दाखविलें आहे. तेव्हा टॉडने या उत्पन्न केलेल्या गोड नजरबंदीने हिंदी लोक इतके आधळे झाले कीं, रजपुताच्या इतिहासाच्या चष्म्यातूनच हिदी इतिहासाकडे पाहण्याची परपरा सुरू झाली, व ती आजलाहि चालू आहे

याच्या स्पष्टीकरणार्थ सर्वांच्या परिचयाचे एक उदाहरण घेऊ. शिवाजीन अफझुलखानाचा वध केला, ही इतिहासप्रसिद्ध गोष्ट आहे. अफझुलखान हा शिवाजीचा शत्रु होता व तो शिवाजीला मारण्याचा किंवा जिवत पकड ण्याचा विडा उचलून विजापुराहून निघाला होता. त्याला ठार मारल्याशिवाय किवा पकडून कैद केल्याशिवाय शिवाजीला दुसरे गत्यतर नव्हते. कारण, नाही तर मराठी राज्य स्थापन करण्याचे शिवाजीचे बेत तडीला जाणे शक्य नव्हतें. तेव्हा **साधल्या मार्गाने योग्य प्रसंग पाहून शिवाजीने त्याचा वध केला हा मार्ग साधला नसता तर दुसरा एखादा मार्ग योजून त्याचा वध करणे शिवाजीला भाग होते.** तो शिवाजीच्या वाटेत आलेला काटा होता, आणि वाटेंतले सर्व कटक झाडून मोडल्याशिवाय पुढे वाट चालणे शिवाजीला शक्य नव्हतें. परतु टॉडने उपस्थित केलेल्या गौडबगालामुळे या साऱ्या विचारसरणीवर कोणाचीच समजूत भागेना. शिवाजीने केलेली ही गोष्ट नीतिमूलक होती, कीं अन्याय्य होती, असा वाद उपस्थित झाला. कारण रजपुताच्या पराभवाचें खापर त्याच्या मूर्खपणावर व व्यसनाधीनतेवर न फोडता युक्तीने त्याच्या सत्यप्रियतेचा टॉडने गाजावाजा केला होता तेव्हा विश्वास दाखवून शत्रूचा वध करणारा शिवाजी व त्याचे पराक्रम, रजपुताच्या सत्यप्रिय यशोगौरवापुढें (!) फिक्के पडले! यामुळे इतिहासज्ञात भयकर रणकदन माजले. शिवाजीच्या नीतीचें समर्थन करण्यात बाडेच्या बाडें लिहिलीं गेलीं 'अफझुलखानाने प्रथम वार केला', किवा 'अफझुलखानाने शिवाजीला बगलेंत दाबून मारण्याचा प्रयत्न केला', असे पोरकट शोध शिवाजीच्या समर्थनार्थ प्रसिद्ध झाले! अफझुलखान प्रथम वार करीपर्यंत शिवाजी

साळसुदासारखा स्तब्ध उभा राहिला असेल,तर आम्ही त्याला मूर्खपणाच्या बाबतीत रजपूत अफीमबाजाच्याच पक्तींत बसवू. दुष्टबुद्धि खानाला पहिला वार करण्याची संधि देण्याइतका शिवाजी खात्रीने बावळट नव्हता. कारण दुर्दैवाने खानाचा वार न चुकता, तर शिवाजीची व त्याच्या महत्त्वाकाक्षाची होळी होती खानाला मारल्याशिवाय गत्यतर नसल्यामुळे शिवाजीने त्याला यमलोक दाखविला, ही सरळ गोष्ट आहे हीच युद्धनीति! परतु 'सत्य', 'नीति', 'न्याय', या ढोंगी शब्दाचे अवडबर टॉड व त्याचे अनुयायी यानी उभारल्यामुळे हिंदी इतिहासज्ञाची दिशाभूल झाली, व बिचाऱ्या शिवाजीचे समर्थन करता करता इतिहासज्ञाना निबध व बाडे खरडावीं लागलीं प्रेसिडेंट वुइलसनच्या चवदा मुद्द्याचा बागुलबोवा पुढे करून इग्लड वगैरे दोस्त राष्ट्रानी जगाला चकविलें व महायुद्धानतर त्या बागुलबोवाच्या आड्न आपला स्वार्थ साधून घेतला. त्यातलाच हाहि एक प्रकार झाला.

सत्य, न्याय, नीति, हे शब्द मनावर तात्काल परिणाम करतात, आणि म्हणून त्याच्या खोट्या अवडबरामुळे मनुष्य प्रथम भाबावतोच. मोलीएरच्या एका प्रहसनात, शिकलेल्या डॉक्टराच्या शास्त्रीय उपचारानी मरणे, हे गावढळ वैदूच्या अशास्त्रीय उपचारानीं जगण्यापेक्षा रोग्याच्या दृष्टीनेहि अधिक श्रेयस्कर आहे, असे चेष्टेने प्रतिपादन केले आहे या मोठमोठ्या शब्दाच्या जादूमुळे सत्य व नीतीपायीं राजस्थानची धूळधाण करणारे व कुटुंबाचा घात करणारे रजपूत, तरतमबुद्धि चालवून राजमार्गाने मुसलमानाचा पराभव करून स्वराज्य स्थापन करणाऱ्या शिवाजीपेक्षा व त्याच्या सहचारी मराठ्यापेक्षा श्रेष्ठ आहेत, अशी काही लोकाची भावना झाली व त्यामुळे विभूति मानलेल्या शिवाजीवरील आरोप (?) दूर करण्याकरिता अनेक इतिहासज्ञ पुढे सरसावले व शिवाजीच्या प्रत्येक कृत्याला न्याय व नीतीचीं पुटे देऊ लागले महाराष्ट्रातील लोकमान्य टिळकादि अनेक इतिहाससशोधकाचे व भक्ताचे या बाबतींतील आजपर्यंत प्रसिद्ध झालेले अनेक लेख वरच्या विधानाचें समर्थन करतील, ते नुसते चाळले तरी पुरे. या निष्कारण काथ्याकुटाची खरोखर मुळीच जरूर नव्हती. इतिहास म्हणजे न्यायशास्त्र नव्हे व नीतिशास्त्र तर नव्हेच नव्हे. शिवाजी जर त्याला ठार मारण्याचा किंवा कैद करण्याचा विडा उचललेल्या

मुसलमान सरदाराला, हिंदुधर्माच्या द्वेष्ट्याला, गाईच्या हत्या व मूर्तींचे भंजन यांनी आपल्या स्वारीचा मार्ग कलंकित करणाऱ्याला–पहिला वार करण्याची व त्यामुळे आपल्या स्वतःच्या गोब्राह्मणप्रतिपालनाच्या व्रताची राखरांगोळी करण्याची संधि देण्याइतका बावळट असता, तर मराठ्यांचे साम्राज्य त्यांच्या हातून स्थापन झालेंच नसते. नीतीच्या कसावर शिवाजीला घासतां घासतां आपण त्याला बावळट बनवीत आहों, हे या संशोधकाच्या ध्यानींहि आले नाहीं. शिवाजीच्या थोरवीला अशा पुराव्याची पुस्ती जोडणें म्हणजे शालजोडीला घोंगडीचें ठिगळ लावणें होय.

रजपुतांच्या शौर्याची ही नजरबंदी आधुनिक महाराष्ट्राप्रमाणें शिवकालीन महाराष्ट्रालाही जडली होती. मराठ्यांचें पराक्रम थोर व त्यांची कर्तबगारीहि अचाट आणि श्रीशिवछत्रपतींनी तर गोब्राह्मण व स्वधर्म यांच्या रक्षणाचें कंकण हातांत बांधून हिंदवी स्वराज्याची भरभक्कम पायावर प्राणप्रतिष्ठा केली. परंतु रजपूत लोकांचें क्षत्रियत्व मान्य करणाऱ्या शिवकालीन महाराष्ट्राला रजपुतांपेक्षां अनेक पटींनी क्षत्रियगुणांत श्रेष्ठ असलेल्या मराठ्यांचें क्षत्रियत्व कबूल करवेना आणि रजपूत लोकांना पितृस्थानीं बसविल्याखेरीज महाराजांचें वेदोक्त राज्यारोहण देखील होऊं शकलें नाहीं. रजपुतांच्या नकली नाण्यानें दिपलेला समाज मराठ्यांचें अस्सल नाणें सहजासहजीं कबूल करीना. खऱ्या पाच-माणकांपेक्षां नकली लाल व हिरव्या रंगाचे दीडदमडी किंमतीचे कांचेचे तुकडेच अधिक सुंदर व आकर्षक दिसतात, ही गोष्ट सर्वांच्या परिचयाची आहे. एकदां नजरबंदी झाल्यानंतर सर्वच गोष्टी या खोट्या मापांनीं मोजल्या जाऊन त्यांची किंमत ठरविण्यांत येऊं लागली. रजपूत हेच खरे क्षत्रिय ठरल्यानंतर, त्यांच्या वंशजांस क्षत्रियत्वाचा शिक्का मिळूं लागला, आणि त्यामुळें शिवराज्याभिषेकाच्या समयीं भोसल्यांनी आपला संबंध शिसोदिया वंशाशीं लावला, आणि हा प्रघात आजला इतका सर्वसामान्य झाला आहे कीं, हल्लीं प्रत्येक प्रमुख मराठ्या कुलानें कोणत्या ना कोणत्या तरी रजपूत घराण्याला आपल्या पितृस्थानीं बसविलें आहे. प्रत्येक मराठेकुलाच्या रजपूत घराण्याशीं संबंध दर्शविणाऱ्या खोट्यानाट्या वंशावळ्या आज तयार आहेत, आणि जों जों दिवस लोटतील तों तों त्यांची सत्यताहि अधिक विश्वसनीय ठरत जाणार. छत्रपतींनी नाइलाजानें

घालून दिलेला पायडा त्याच्या अनुयायांनी गिरविला तर त्यात नवल कोणतेच नाही. पण हा सर्व दोष मराठ्यांच्या पराक्रमादि गुणांवर व त्यांच्या सन्मान्य कर्तबगारीवर त्यांचे क्षत्रियत्व मान्य न करणाऱ्या महाराष्ट्र समाजाला—विशेषतः ब्राह्मणवर्गाला—लावला पाहिजे.

इतिहासाच्या अभ्यासात या व अशाच नमुन्याच्या भुलथापी नजरेस पडतात. कंपनी बहादूरच्या पराक्रमाचें वर्णन वाचतांना तर सर्वांत अधिक मौज आढळून येते. पांचसातशे इंग्रज शिपाई नबाबाच्या तीसचाळीस हजार फौजेचा धुव्वा उडवून, प्रचंड विजय सहज लीलेने ठिकठिकाणी संपादन करतात. पाश्चात्य युद्धकला यांत्रिक शास्त्राच्या विलक्षण प्रगतीमुळे अलीकडे फार श्रेष्ठ झाली आहे. विमाने, बाँबगोळे, पंचवीस तीस मैल गोळे फेकणाऱ्या राक्षसी तोफा, यांच्या साहाय्याने तरवार व भाले-बर्चीशिवाय दुसरी हत्यारे माहीत नसणाऱ्या लोकांविरुद्ध असे चमत्कार हल्ली कदाचित् घडून येतील. पण त्या वेळी इंग्रज लोक ज्या तलवारींनी लढत त्याच तलवारींनी हिंदी शिपाईहि लढत असत. तीच हत्यारे व त्याच तोड्याच्या बंदुका दोघांच्याहि जवळ होत्या. मग ही असंभवनीय गोष्ट कशी घडून येईल? कवायती फौजेच्या चतुराईच्या सबबीखाली असल्या मूर्खपणाच्या थापा इतिहासांत आजलाहि सहज पचतात. इंग्रजांची व हिंदी लोकांची हत्यारें एकाच नमुन्याची, आणि दोघांच्याहि फौजा बेतावातांच्या कवाईत शिकलेल्या असत. डच, पोर्तुगीज किंवा फ्रेंच लोक, फौजेला कवाईत शिकविण्याकरिता प्रत्येकाच्या पदरी असत, व पेशवे निजाम, टिपू निजाम यांच्यांत लढाया झाल्या तर फौजेच्या संख्याबलावरच बहुधा लढाईचा शेवट लागत असे. थोडी बहुत कमी फौज असूनहि यश सेनापतीच्या विशेष रणचातुर्याने प्रसंगविशेषी मिळत असे, नाही असे नाही. परंतु इंग्रजांशी संबंध आला कीं, पांचशे इंग्रज दहावीस हजार हिंदी फौजेचा सहजगत्या पराभव करून त्यांना चौफेर उधळून लावीत! कवायती फौजेचा विशेष उपयोग होण्याइतकें पाश्चात्य युद्धशास्त्र त्या वेळीं नावारूपास चढले नसताहि, हे चमत्कार घडलेले लहानमोठ्या प्रत्येक इतिहासांत वाचावयास सांपडतात, आणि कवायतीच्या नजरबंदीने वाचक ते सहज पचवतात!

इंग्रज कंपनीला या देशांत हिंदी राजेरजवाड्यांविरुद्ध लढाईत यश आले

हे खरे, पण ते या कवायतीच्या लष्करी शिस्तीने खास आले नाही! सातशे इंग्रज सुजाउदौल्याच्या वीस हजार फौजेचा पराभव करीत, पण केव्हा? जेव्हा सुजाचा सेनापति मीर जाफर त्या वीस हजारांपैकी पंधरा हजार फौज घेऊन इंग्रजांना जाऊन मिळे तेव्हा. आणि मीर जाफरचा जावई मीर कासीम इंग्रजांना बहुतेक नबाबी फौज घेऊन मिळाला, म्हणजे इंग्रजांचे हजार शिपाई मीर जाफरच्या असंख्य सेनेचा तेव्हाच विध्वंस करून टाकीत. इतके असूनहि कवायती शिस्तीची नजरबंदी हिंदी इतिहासकारांना सुटत नाही. हिंदी इतिहासकार न्याय व नीति यांच्या नजरबंदीने भारले आहेत. त्यामुळे मीर जाफरच्या लढाईत आढळलेला इंग्रजांचा खोटेपणा व भेदनीति, टिपू सुलतानाच्या बाबतीतहि घडली असेल, प्रत्यक्ष कागदोपत्री पुरावा हाती लागल्याशिवाय असे मानण्यास ते तयार नाहीत. एखादा तत्कालीन कागद त्यांच्या हाती सापडला, तरच ते टिपूचा इंग्रजांनी फंदफितुरीने पराभव केला असे म्हणतील, मात्र त्या कागदाच्या खरेपणाविषयीं पुरती शहानिशा झाली पाहिजे, आणि त्याला इतर प्रत्यंतर पुरावा पाठराखणी-बद्दल स्वतंत्रपणे मिळाला पाहिजे. नाहीपेक्षा त्यांच्या इतिहासप्रियतेमुळे त्यांच्या हातून चुकून सत्याचा खून होऊन मोक्षाचे द्वार त्यांना बंद व्हावयाचें! एखाद्या माणसाच्या हातून दोनतीनदा एका विवक्षित तऱ्हेची लबाडी घडली, तरी एका विशिष्ट गोष्टींत ती घडली नाही असे त्या माणसानें सिद्ध करीपर्यंत, त्याची लबाडी गृहीत धरणें व्यवहार्य होईल. न्यायशास्त्राच्या दृष्टीने हें रास्त होणार नाही. दहादा चोरी करणारा अकरावे वेळीं सापडला तरी तो निरपराधी आहे, असेच त्याच्यावर गुन्हा शाबीत होईपर्यंत न्यायाधीशाला धरावे लागते. न्याय करताना संशयाचा फायदा आरोपीला देण्यात येऊन, फिर्यादीला पुरावा द्यावा लागतो. पण इतिहास म्हणजे न्यायशास्त्र नव्हे, व इतिहासकार हे न्यायाधीशहि नव्हत हिंदी इतिहासकार स्वतःला न्यायाधीशाचे फुसके अवसान आणून इतिहास लिहितात, ही गोष्ट निराळी. त्यामुळे त्यांचा व्यावहारिक धरबंद सुटतो, व म्हणूनच इंग्रजी ग्रंथकारांनी लिहिलेल्या ग्रंथांच्या वाचनाने मनावर झालेले दुष्परिणाम, हिंदी लोकांनी लिहिलेल्या इतिहासग्रंथांच्या वाचनाने नाहीसे होत नाहीत. कारण न्याय व नीतीचें गौडबंगाल उभारून आणि

हिंदी संशोधकांना त्यांत गुंतवून देऊन, इंग्रज ग्रंथकार स्वतः इतिहास लिहितांना न्याय व नीतीपासून अलिप्तच राहिले आहेत. ही नजरबंदी उत्पन्न करण्याचा त्यांचा मूळ उद्देश होता व तो थोडा फार यशस्वी झाला, असेंच म्हटले पाहिजे कारण हिंदी इतिहासकार खरोखरच, ज्या राष्ट्राचा ते इतिहास लिहितात त्याच्या अब्रूपेक्षा सत्याचीच छाननी करण्यांत व सत्याला कुठें धक्का तर लागणार नाहीं ना, या विवंचनेंत गर्क असतात. सत्यापुढे राष्ट्राच्या अब्रूची त्यांना मातब्बरीच वाटत नाहीं. उलटपक्षीं इंग्रज ग्रंथकार दुसऱ्या राष्ट्राचा इतिहास लिहितांना सत्याचा विलक्षण आव आणतील, शक्य तेवढीं दुसऱ्या राष्ट्राचीं वैगुण्यें शोधून काढतील, पण स्वतःच्या राष्ट्राचा प्रश्न आला म्हणजे क्लाइव्ह व वारन हेस्टिंग्ज यांचीं घोर दुष्कृत्येंहि त्यांना समर्थनीय वाटूं लागतात, आणि निरनिराळीं खोटींनाटीं तर्कटें लढवून ते आपल्या राष्ट्राच्या अब्रूचें संरक्षण करतात

या न्याय व नीतीच्या अवडंबरांतून हिंदी इतिहासकारांनी स्वतःची सोडवणूक करून घेतली पाहिजे. कारण इतिहास म्हणजे न्यायशास्त्र नव्हे व इतिहासकार हा न्यायाधीशहि नव्हे इतिहास हा व्यवहार आहे. मात्र तो व्यवहार व्यक्तींचा नसून राष्ट्राचा आहे इतिहास हें राष्ट्राचें चरित्र आहे. आपल्याला प्रिय असलेल्या व्यक्तीचें जेव्हां आपण चरित्र लिहितों, तेव्हां त्याच्या गुणांचा विस्तार व अवगुणांचा संक्षेप करतों. त्या व्यक्तीच्या चरित्रवाचनानें तिच्या गुणांचा व चारित्र्याचा वाचकांच्या मनावर योग्य परिणाम होऊन, ते अधिक कर्तबगार व चांगले व्हावे हाच चरित्रग्रंथाचा उद्देश असतो. चरित्रनायकाच्या अंगीं असलेले अवगुण वाचकानें टाळावे एवढ्याकरितां त्याच्या अवगुणांचें संक्षेपानें चरित्रग्रंथांत दिग्दर्शन केलेलें असतें. इतिहास ही देखील राजाची किंवा लढायांची जंत्री नव्हे. इतिहास हा राष्ट्राचा अप्रतिम चरित्रग्रंथ होय. हा चरित्रग्रंथ राष्ट्रांतील अनेक व्यक्तींना मार्गदर्शक व्हावयाचा असतो. आपल्या राष्ट्राच्या वैभवाचा व गुणांचा विस्तार इतिहासांत करून लोकांचें स्वराष्ट्राविषयीं स्वाभिमानाचें प्रेम वाढविणें, हें प्रत्येक इतिहासकाराचें पवित्र कर्तव्य आहे. राष्ट्राच्या हातून घडलेले दोष व चुक्या यांचे संक्षेपानें निषेधपूर्वक दिग्दर्शन केलें, म्हणजे

आजच्या राष्ट्राला ते दोष टाळण्यास मदत होईल. राष्ट्राचा प्राचीन इतिहास राष्ट्राच्या आजच्या कर्तबगारीवर प्रकाश पाडणारा असला पाहिजे; एवढेच नव्हे, तर राष्ट्राच्या भविष्यकालीन ध्येयाचें दिग्दर्शन करणारा असला पाहिजे, तरच तो उत्तम चरित्राप्रमाणे उत्तम इतिहास या संज्ञेस पात्र होईल.

दुर्दैवाने आमच्या हिंदी इतिहासकाराना या न्याय व नीतीच्या नजरबंदीने वा परिस्थितीने घेरले असल्यामुळे, अंगीं योग्यता असूनहि राष्ट्राचा उत्तम इतिहास आज त्याच्या हातून निर्माण होऊ शकत नाही. कोणत्याहि इतिहासकाराने लिहिलेली हिंदुस्थानची मुसलमानी कारकीर्द शेकडो पृष्ठे वाचून पाहावीं. खून, मारामाऱ्या, पदच्युति याशिवाय काहीच दुसरे त्यात आढळणार नाही जणू काही मुसलमानाच्या पाचशे वर्षांच्या कारकीर्दीत नाव घेण्यासारखी कर्तबगारी कुठेच कोणाला आढळली नाही त्याच्या राज्यव्यवस्थेचे विशेष गुण, त्याचे प्रजानुरंजन —कशाचाच पत्ता नाही. सुलतानाच्या व त्याच्या हातून घडलेल्या जुलमाच्या जत्र्या, याशिवाय या प्रचंड कालात काहीच वाचावयास मिळत नाही. त्या लिहिलेल्या गोष्टी खोट्या आहेत, असे माझे म्हणणे नाही. परंतु त्या जुलमाबरोबरच सुलतानाच्या हातून जी अनेक परोपकाराची कामे झालीं त्याचा मागमूस कुठेच लागत नाही, ही नवलाची गोष्ट होय. निव्वळ जुलमी कारकीर्द पाचशे वर्षे काय पण पाचशे दिवस देखील कोणत्याहि राष्ट्रात टिकावयाची नाही हे इंग्रज इतिहासकाराचे अंध अनुकरण आहे. त्याना देखील उमाजी नाइकाचीं किंवा तट्या भिल्लाचीं केवळ दुष्कृत्येच दिसतात अशा तऱ्हेचा इतिहास वाचून आजच्या हिंदी राष्ट्रातील तरुण मुलाना मुसलमानाविषयी प्रेम व आपलेपणा कसा वाटावा? असला इतिहास राष्ट्राला मार्गदर्शक कसा व्हावा?

इतिहासकाराचे यावर ठराविक उत्तर असतें. "आम्ही तरी काय करणार? जे सत्य असेल ते आम्ही लिहितो, परिणामाकडे बघून कसें चालणार? मुलाच्या मनावर चागला परिणाम व्हावा व त्या योगे राष्ट्राला उत्तम मार्ग लाभावा, यासाठी खोटा इतिहास थोडाच तयार करावयाचा आहे?" हे ठराविक उत्तर अनेकाचें समाधान करते. ते म्हणतात कीं, खरेच, इतिहासात

सत्य लपविता येत नाही. परतु इतिहासात सत्य जरी असले, तरी तें माडावयाची पद्धति राष्ट्राभिमानाला पोषक अशी असावी लागते. एखाद्या मुलाचा अभ्यास सर्व विषयात उत्तम असून, त्याला परीक्षेत चागले गुण मिळाले व एक गणितविषय त्याचा कच्चा राहिला, तर उत्तम शिक्षक काय करील? तो त्या मुलाची त्याच्या हुषारीबद्दल प्रशसा करून त्याला उत्तेजन देईल, व इतर विषयाबरोबर गणिताचीहि काळजी घ्यावी, असे हळूच ध्वनित करील. परतु दुसरा रद्द्ड शिक्षक मात्र त्या मुलाच्या उत्साहावर विरजण घालील!

एक.—"तुला इतके चागले गुण परीक्षेत मिळाले याबद्दल मला कौतुक वाटते, व असा बुद्धिमान् मुलगा माझ्या शाळेत आहे, याबद्दल मला अभिमान वाटतो. तू असाच नेटाने चालशील तर आपले व त्याबरोबर सर्व शाळेचे नाव काढशील. तुझ्यासारखा हुशार मुलगा मनात आणील तर हा हा म्हणता गणितात देखील प्रावीण्य सपादन करील. बुद्धिमत्तेला काय अशक्य आहे?"

दुसरा:—"शेवटीं, गणितात बोब मारली तर! एक विषयात नापास काय व दहा विषयात नापास काय, सारखेच! नापास तो नापासच! बाकीच्या विषयात उत्तम गुण मिळाले तरी ते काय जाळावयाचे आहेत. या गणितापायीं त्या सर्वांवर डाबर फासले गेले आहे? तू परीक्षेत असा गाढवपणा करशील असे मला वाटले नव्हतें. पण तुमच्या हातून दुसरे काय व्हावयाचे आहे? अखेर वळणावर गेलासच!"

दोघेहि शिक्षक एकच गोष्ट बोलतात, आणि दोहोत एकच गोष्ट सत्य आहे ती ही कीं, मुलाचे सगळे विषय उत्तम असून गणित तेवढे कच्चें आहे. पण त्या दोघाच्या मल्लिनाथीचा विद्यार्थ्याच्या मनावर किती भिन्न भिन्न परिणाम होईल?

हेच उदाहरण इतिहासकाराना लागू आहे इतिहास लिहिताना सत्याचा अपहार करता येत नाही, हे खरे परतु चरित्रग्रथाप्रमाणे गुणाचा अभिमानपूर्वक विस्तार व अवगुणाचा निषेधार्थी सक्षेप इतिहासकाराने करणे जरूर आहे. नाहीपेक्षा राष्ट्राचे पाय धरून मागे ओढण्याचा गुन्हा त्याच्या हातून

घडेल. इतिहासात सत्य असले तरी त्याचा अंश फारच थोडा असतो. इतिहासातील 'जन्त्र्या' सत्य असतात हे खरे. कोणत्याहि इतिहासकाराला अफझुलखानाकडून शिवाजीला मारविता येणार नाही, किंवा प्लासीच्या लढाईची तारीखहि बदलता येणार नाही. परंतु शकावल्या बरोबर देणे, किंवा निरनिराळया राजवंशातील राजांची नावे व त्यांच्या कारकीर्दीतील लढायांची अचूक यादी देणे, म्हणजे इतिहास नव्हे. कोणत्याहि देशाचा असला जंत्रीमय इतिहास दहावीस पानातच मावू शकेल, आणि तो निवळ सत्य असतोहि. परीक्षेला बसणाऱ्या मुलांच्यासाठी असे शेकडो टिपणी इतिहास दरवर्षी प्रसिद्ध होतात आणि तिकडे विद्यार्थ्यांखेरीज दुसरे कोणी फारसे लक्षहि देत नाहीत, पण ही असली सत्यपूर्ण जंत्री म्हणजे खरा इतिहास नव्हे

खरा इतिहास म्हणजे राष्ट्राचे चरित्र होय, आणि राष्ट्राभिमानाच्या दृष्टीनेच तें चरित्र लिहिले पाहिजे. कोणतीहि ऐतिहासिक व्यक्ति आपल्या मनातील गूढ भावना पुढील इतिहासकारासाठी रोजनिशींत नियमाने लिहून ठेवीत नसते. त्या काळचीं पत्रें सापडलीं तरी तीं फारशी विश्वसनीय असतातच असे नाही. कित्येक पत्रे गैरसमजुतीने लिहिलीं गेलीं असतात, कित्येक अर्धवट माहितीवर विसंबून लिहिली जातात, आणि कित्येक तर लोकांच्या डोळयात मुद्दाम धूळ टाकण्याकरिता खरडलेली असतात. त्यामुळे दोनशेतीनशे वर्षांनतर सापडलेलीं पत्रे यापैकी कोणत्या सदरात पडतील हे सांगणें शक्य नसतें. त्यामुळे जंत्रीभोंवतीं असलेला राष्ट्राचा इतिहास निवळ सत्यावर अधिष्ठित झाला असतो, हें म्हणणें धाडसाचे आहे. परवाच्या युरोपियन महायुद्धासंबधीं निरनिराळया देशातील निरनिराळीं वर्तमानपत्रे आज वाचली व प्रसिद्ध मुत्सद्द्यांच्या मुलाखती घेतल्या तरी सत्याचा कण हातीं लागत नाही. मग शेपन्नास वर्षांनंतर काय स्थिति होईल? प्रत्येक राष्ट्र या महायुद्धाचा इतिहास आपापल्या परीने रंगवील, आणि तुलनात्मक दृष्टीने कोणी त्याचा अभ्यास करू लागल्यास केवळ जंत्री काय ती खरी ठरेल.

कोणत्याहि राष्ट्राच्या इतिहासांतील जंत्री काय ती सत्यपूर्ण असते. इतर गोष्टी राष्ट्राची आजची परिस्थिति, भविष्यकालीन ध्येय, आणि इतिहास-

लेखकाची मनोरचना याच्यावर अवलबून असतात. तीस वर्षापूर्वीपर्यंत १८५७ सालच्या धुमश्चक्रीला शिपायाचे बड म्हणत असत, पण श्री० विनायकराव सावरकर याच्या दृष्टीला तीच गोष्ट हिंदुस्थानाचे स्वातन्त्र्य सपादनार्थ केलेला पहिला प्रयत्न, या स्वरूपात दिसली. जे शिवाजीमहाराज पूर्वी गोब्राह्मणप्रतिपालक म्हणून प्रसिद्ध असत, तेच आज 'हिंदवी स्वराज्याचे सस्थापक' म्हणून गणले जातात. शिवकालीन जत्री पूर्वीप्रमाणेच आजहि कायम आहे, पण राष्ट्राची आजची परिस्थिति व भविष्यकालीन ध्येय बदलल्यामुळे जत्री कायम राहूनहि पूर्व इतिहास बदल पाहात आहे.

जुन्या काळचे सर्वच कागदपत्र व पूर्वकालीन ऐतिहासिक पुरुषाचे शपथेवर घेतलेले प्रतिज्ञालेख, मनातील गूढ भावना चित्रित केलेल्या डायऱ्या आणि अतःकरणाचा ठावठिकाणा दाखविणारे फोटोग्राफ् उपलब्ध असल्या-शिवाय, सापडतील तेवढ्या जुजबी जुन्या कागदपत्राच्या जोरावर सत्याची टिमकी वाजवणाऱ्या इतिहासभक्ताना आमचे एवढेच सागणे आहे कीं, तुम्ही कितीहि कठशोप केला तरी राष्ट्राचे चरित्र या दृष्टीने लिहिला गेलेला इतिहास, निवळ सत्यावर अधिष्ठित नसतो. इतिहासात जत्री काय ती सत्य असते, आणि प्रत्येक राष्ट्र ती जत्री आधारभूत धरून आपल्या राष्ट्राला मार्ग-दर्शक असा स्वाभिमानपूर्ण इतिहास तयार करते व तो जगभर पसरवितें. इंग्लडने तेंच केले आहे, फ्रान्सने तेंच केलें आहे, आणि हिंदुस्थानालाहि तसेंच वागणे जरूर आहे. तेव्हा इंग्लिश इतिहासकारानी मुद्दाम मथविलेल्या या सत्याच्या नजरबदीने हिंदी इतिहासकारानी फसून जाऊन राष्ट्राभिमान-भावना खर्ची करण्याचे पातक करूं नये. जत्रीबाहेरील इतिहास, लेखकाची मनोरचना, राष्ट्राची वर्तमान परिस्थिति व भविष्यकालीन ध्येय ह्या तीन गोष्टीवर सर्वस्वी अवलबून असतो, आणि त्यालाच खरा इतिहास असें नाव देण्यात येतें.

# मराठी भाषेचें शुद्धीकरण

दक्षिण व उत्तर या हिंदुस्थानातील दोन प्रमुख विभागात आज दक्षिण उत्तर ध्रुवाइतके अतर दृष्टीस पडते उत्तरेचा रीतिरिवाज दक्षिणेहून अगदीच भिन्न आहे उत्तर हिदुस्थानात हिंदु मुसलमानात तटेभाडणे जोमाने नित्य चालली आहेत मारामाऱ्यावाचून एकहि सण सहसा सुना जात नाही. ह्या हिदूंच्या हिंदुस्थानातील बगाल व पजाब या प्रातात मुसल्मानाचे हिदूंपेक्षा सख्याधिक्य आहे, आणि म्हणूनच त्या दोन प्रातापुरते आपणास लोकसख्येच्या प्रमाणात कायदेकौन्सिले, स्थानिक स्वराज्यसस्था, व सरकारी नोकऱ्या, या राज्यकारभाराच्या सर्व बाबतींत रास्त प्रतिनिधीत्व मिळालें पाहिजे असा मुसलमानाचा आज हक्क आहे. उत्तर हिदुस्थानात मुसलमानाचे हे सख्याधिक्य कसे झाले ? मुसलमानी राज्य अनेक शतके त्या प्रदेशावर असल्यामुळे साम, दाम, दड, भेद या चतुर्विध उपायानी मुसलमानानी आपलें सख्याबल तिकडे वाढविले. उत्तर हिदुस्थानातील मुसलमानात खास काबूल-कदाहारकडून विजय सपादन करण्यासाठी आलेल्या विलायती मुसलमानाची संख्या शेकडा दहा-पाचच भरेल. बाकीचे सर्व हिदुस्थानातील हिदूंतूनच बाटले आहेत. हे सर्वच्या सर्व बळजबरीने तलवारीच्या धारेवर धरून बाटविले गेलेत असे मात्र नाही. आज ख्रिस्ती राज्यकर्त्यांचे या देशावर राज्य असल्यामुळे त्याच्या धर्माचे व सस्कृतीचे जित लोकावर गोडीगुलाबीने का होईना पण थोडेबहुत दडपण पडतेच. राज्यकर्त्यांच्या जातीचे आपण झालों, म्हणजे आपणाला मोठमोठ्या नोकऱ्या मिळून आपला बडेजाव होईल या मोहाने, मनाने हलके असलेले अनेक लोक आज देखील धर्मातर करीत आहेत. राज्यकर्त्यांचा धर्म स्वीकारला म्हणजे थोड्या विद्येत मोठी नोकरी आणि थोड्या पैशात ऐसपैस जागेचा आगगाडीतील स्पेशल डबा आज देखील मिळतो. मग मुसलमानी अमलात या गळाला अनेक मासे अडकले असले तर त्यात नवल नाही. मोहनसिंगाचा मोहबतखान होऊन सेनापतीची जागा पटकावणारे हरीचे लाल पैगबर हजरतचे बदे गुलाम त्या काळी झाले.

याशिवाय मुसलमानी संस्कृति चढाईच्या स्वरूपाची असल्यामुळे हिंदूंच्या मुली आपल्या गोटात घेऊन किंवा जिंकलेल्या लोकांना आपल्या धर्माची दीक्षा देऊन व नंतर जीवदान देऊन मुसलमानी प्रजेची उत्तर हिंदुस्थानात झपाट्याने वाढ झाली. अस्सल मुसलमानापेक्षा हा बनावटी माल अधिकच कट्टर असतो. खऱ्या सोन्यापेक्षा रोल्डगोल्डची सफाई व झिलई अधिक उठावदार दिसते, त्याप्रमाणे ह्या बाटग्या लोकांचे प्रेमहि आपल्या नव्या धर्मावर इतके कमालीचे जडते कीं, जाळीं टाकून नवीन सावजे पकडण्यास ते कमालीचा यत्न करतात. स्वतंत्र जंगली हत्ती पकडण्यासाठी पाळीव माणसाळलेले हत्ती उपयोगात आणतात, त्यातलाच हा प्रकार समजावयाचा! त्यामुळे उत्तर हिंदुस्थानातील मुसलमानांची संख्या गणितश्रेढीने वाढली. मुसलमानांच्या या वाढत्या संख्येला राजसत्तेचे पाठबळ लाभले असल्यामुळे उत्तर हिंदुस्थानात हिंदु संस्कृति व हिंदी भाषा यांच्यावर मुसलमानी व अफगाणी संस्कृतीचा बोजा वाढू लागला. उत्तर हिंदुस्थानात जे हिंदु उरले त्यांनी आपलीं धोतरे सोडून मुसलमानी धर्तीचे चोळणे स्वीकारले, आणि हिंदु स्त्रियांच्या साड्याऐवजी मुसलमानी पद्धतीचे लहेंगे अंतःपुरात वावरू लागले. मुसलमानी बुरखा हिंदु स्त्रियांच्या मुखावर बसला, आणि त्यांच्यासाठी जनानखान्याचा किल्लेकोट उभारण्यात आला. हिंदु पुरुषांनी संस्कृत व संस्कृतोद्भव हिंदी भाषांना शेवटचा रामराम ठोकून फारशी व आरबी भाषांची आराधना चालविली. याप्रमाणे उत्तर हिंदुस्थानात मुसलमानांचे एकछत्री साम्राज्य सुरू झाले, एवढेच नव्हे, तर मुसलमानी संस्कृतीने हिंदु संस्कृतीवर पूर्णपणे कुरघोडी केली.

या भीषण परिस्थितीमुळे उत्तर हिंदुस्थानातील संस्कृतोद्भव हिंदी भाषांची फारच दुर्दशा झाली. त्यांच्यात नवीन व तेजस्वी ग्रंथरचना होईना. कारण उर्दू ही दरबारी भाषा असल्यामुळे उर्दू व तिच्या माता आणि मावशी—फारशी व आरबी यांच्या आराधनेत हिंदु विद्वान् व बुद्धिमान पुरुष आपला अमोलिक वेळ खर्च करू लागले. राज्यकर्त्यांची भाषा शिकणें व्यवहारी दृष्टीने जरूर असतें, आणि तिच्यात प्रावीण्य मिळालेल्या इसमाचा बाजारभाव बरा लागतो हा अनुभव आजहि नवीन नाहीं. आज हिंदुस्थानात इंग्रजीचें जे माहात्म्य व स्तोम आहे तेंच त्या वेळीं

या मुसलमानी भाषांचें माजलें होतें. संस्कृताची सर्वत्र हेळसांड सुरू झाली! ज्या भाषेत धर्मग्रंथाचा भरणा होता तिची विटंबना व हेटाळणी चालू असतां देशी भाषावर कसा कठीण प्रसंग ओढवला असेल याची सहज कोणालाहि कल्पना करतां येईल. उर्दू भाषेनें दरबारांतून माजघरांत देखील आक्रमण केलें. घरीं, दारीं लोक उर्दू बोलूं लागले. खरें पाहिलें तर उर्दू ही भाषा फारशी व हिंदी भाषा यांच्या मिश्रणानें बनली होती. परंतु राज्यकर्त्यांना फारशी व आरबी भाषांचा साहाजिकच अभिमान वाटत असल्यामुळें उर्दू भाषेंतील हिंदी शब्दांची हळूहळू उचलबांगडी होऊन त्यांची जागा फारशी शब्द भरून काढूं लागले. आजकाल बड्या धेंड्यांना समाजांत वावरतांना किंवा कचेरींत किंवा प्रसंगविशेषीं घरीं देखील मराठी भाषा बोलतांना, इंग्रजी शब्द मधून मधून वापरतांना आपण पाहतों. असे इंग्रजी शब्द मराठी भाषेंत मिसळून, ती खिचडीवजा भाषा बोलणें हें सुधारकीय कुटुंबांत शिष्टलक्षण होऊन बसलें आहे. तसलाच प्रकार त्या वेळीं उर्दू भाषेसंबंधीं रूढ होता. घरच्या हिंदी भाषेंतील संस्कृतोद्भव शब्दांची हकालपट्टी होऊन फारशी शब्द त्यांची जागा भरून काढूं लागले हा प्रकार उत्तर हिंदुस्थानांत जवळजवळ पांचशें वर्षें सुरू होता. त्यामुळें हिंदी भाषा फारशी व उर्दूची जणूं गुलामच बनून गेल्याप्रमाणें दिसूं लागली!

गेल्या पन्नास वर्षांत इंग्रजी शिक्षणानें असो अथवा इंग्रजांच्या संसर्गानें असो, हिंदी राष्ट्राचा स्वाभिमान जागृत झाला. त्या वेळीं देशाच्या विपन्नावस्थेबरोबरच स्वभाषेच्या अनुकंपनीय स्थितीनें बऱ्याच देशभक्तांचें चित्त वेधलें. उत्तर हिंदुस्थानांतील प्रमुख बहुजनसमाजाची संस्कृतोद्भव भाषा हिंदी ही होय. व्रज, बुंदेली, कनोजी, आवधी, छत्तीसगडी वगैरे प्रांतवार पोटभेद या भाषेंत स्थल-कालाच्या ओघाबरोबर पडले असले, तरी उत्तर हिंदुस्थानांतील सर्व हिंदूंना समजावयास व व्यवहाराचें साधन म्हणून ही भाषा अत्यंत सुलभ आहे. तुलसीदास, सूरदास वगैरे नामांकित कवि-संतांनीं या भाषेंत अत्यंत सुंदर ग्रंथसंपत्ति मागील विपत्तीच्या काळांत देखील सांठवून ठेवली होती. परंतु ही अमोल वंशपरंपरागत ठेव जवळ असतांना देखील उत्तर हिंदुस्थानांतील हिंदूंत उर्दूचें स्तोम इतकें माजलें होतें कीं, पन्नास वर्षांपूर्वीं व्यवहारांतील हिंदी भाषा संस्कृतपासून निघाली कीं फारशीपासून उत्पन्न झाली, याचाच

संदेह वाटूं लागला होता. हिंदु संस्कृतीवरील हे संकट पाहून प्रसिद्ध हिंदी देशभक्तांनी मातृभाषेच्या उद्धारार्थ कंबर कसली व तिला फारशीच्या गुलामगिरींतून मुक्त करण्याचा निश्चय केला. बाबू हरिश्चंद्र, श्री० शामसुंदरदास, श्री० मदनमोहन मालवीय, श्री० महावीरप्रसाद द्विवेदी, यांच्यासारख्या हिंदु संस्कृतीच्या कट्टया अभिमान्यांच्या सतत प्रयत्नाने हे कार्य बरेचसें तडीस गेले आहे गेल्या पन्नास वर्षांत हिंदी लिखाणांतून फारशी शब्दांचे उच्चाटन करून त्यांची जागा–तत्सम व तद्भव अशा दोन्ही प्रकारच्या संस्कृत शब्दांनी भरून काढण्याचा नेटाचा प्रयत्न करण्यात आला. वक्ते सभांतून फारशी शब्दांना बहिष्कृत मानून संस्कृतप्रचुर हिंदी भाषा बोलूं लागले. या संस्कृतप्रचुर भाषेत अनेक हिंदी ग्रंथ निर्माण झाले संस्कृतच्या पावलावर पाऊल टाकून नवें हिंदी व्याकरण रचण्यात आले, आणि नाना तऱ्हेचे काव्यप्रबंध व कथानकें या नव हिंदींतून निर्माण झालीं ! या क्रांतींत काशी येथील नागरीप्रचारिणी सभेच्या कार्याची जितकी थोरवी गावी तितकी थोडीच होईल.

लोकांत स्वाभिमान व स्वत्व जागृत झाले असल्यामुळे या प्रयत्नाला बरेंच यश आले. पंजाब व दिल्ली कनोज प्रांत सोडला तर लेखी व बोली हिंदी आज पुनः पूर्वीप्रमाणे संस्कृतोद्भव भाषा म्हणून शोभूं लागली आहे. ही क्रांति सहजासहजी घडून आली नाहीं. आपले पांचशे वर्षांचे हिंदु संस्कृति व हिंदी भाषा मारण्याचे श्रम फुकट जातात, हे पाहून मुसलमानांनी या चळवळीस बराच विरोध केला. परंतु त्यांच्या हातीं पूर्वीसारखा अधिकार नसल्यामुळे हिंदी लेखक कवींची कुचेष्टा व हेटाळणी करण्यापलीकडे अधिक कांही त्यांना करता येणे शक्य नव्हते. स्वराज्याचे हक्क संपादन करण्याच्या चळवळीस, परकीय नोकरशाहींचे त्या चळवळींत हितसंबंध गुंतले असल्यामुळे सडकून विरोध होतो. परंतु या चळवळीकडे दुर्लक्ष करणे सरकारला भागच होते कारण ही स्वसंकृस्तीच्या व मायभाषेच्या जोपासनेची चळवळ होती. इंग्रजी राज्यांत लाभलेल्या या संधीचा व शांततेचा स्वाभिमानी हिंदी लेखकांनी चांगलाच फायदा घेतला. त्यांनी हिंदी भाषेंत स्वतंत्र व प्रतिभासंपन्न ग्रंथ तर लिहिलेच, परंतु त्याबरोबर युरोपियन भाषांतील, विशेषत इंग्रजीचे बरेचसे ज्ञानभांडार हिंदी भाषेंत उतरवले. त्यांनी विज्ञानावर नवेनवे ग्रंथ लिहिले आणि सर्वस्वी शास्त्रीय विषयाला वाहिलेलीं.

मासिके व त्रैमासिकें सुरू करून तीं नेटाने चालविलीं. संस्कृतमधील जुनें रत्नभांडार हिंदी वाचकांना खुले करून आपले संस्कृतशी नाते पुनः एकदा या नव्या स्नेहसंबंधाने दृढ केले. इतकेंच नव्हे तर संस्कृतवरच बहुशी पुष्ट झालेल्या बंगभाषेच्या वाङ्मयाला आणि थोड्याबहुत प्रमाणांत जुन्या प्रासादिक मराठी वाङ्मयाला हिंदीच्या आंगणांत क्रीडावयास लावले. उत्तर हिंदुस्थानातील मुसलमानांनीं पांचशे वर्षे घातलेला हैदोसदुल्ला व चढाईचा हट्ट लक्षांत घेता या चळवळीच्या यशाचे माप हिंदी लेखक-कवींच्या पदरात भरपूर टाकणें भाग आहे. महाराष्ट्राच्या दृष्टीने यांतील अभिमानाची विशेष गोष्ट म्हणजे, मूळ महाराष्ट्रीय असलेले श्री० माधवरावजी सप्रेप्रभृती मंडळी या यशाचे वाटेकरी आहेत, ही होय !

हिंदी लोकांची चळवळ यशस्वी झाली, याचा अर्थ हिंदी भाषेतून फारशी शब्दांची संपूर्ण उचलबांगडी झाली असा मात्र नव्हे. आजच्या हिंदी भाषेत अनेक फारशी शब्द प्रचलित आहेत कोणत्याहि एका भाषेचा इतर नव्या भाषांशीं संबंध आला, म्हणजे निरनिराळ्या कल्पना व्यक्त करण्या-करिता किंवा एकाच कल्पनेचे तरतमभाव स्पष्ट करून दाखविण्याकरिता परक्या नवीन भाषांतील शब्द जुन्या भाषेंत प्रचारात येणे अपरिहार्य आहे. हिंदी भाषेत पूर्वी फारशी शब्दांनी प्रवेश केला, तसा गेल्या दीडशे वर्षांत इंग्रजी शब्दांनीहि आपला पाय त्या भाषेत दिला आहे. आणि ह्या शब्दांची आज भाषेंतून उचलबांगडी होणे अशक्य आहे. कारण ते प्रत्येकाच्या अतिशय अंगवळणीं पडले आहेत. फक्त जेत्याच्या भाषेतील शब्दच जित लोकांच्या भाषांत आक्रमण करतात असे नाही. ही देवाण घेवाण परस्पर चालू असते. आजच्या इंग्रजी भाषेतहि ' घी, रयत, किरसाण, सती वगैरे अनेक हिंदी शब्द रूढ झालेले आहेत, व इंग्रजी ग्रंथकार त्यांचा चापून उपयोग करतात शब्दांच्या अशा भरण्यामुळे भाषेला कमीपणा येतो ही कल्पनाच मुळी चुकीची आहे. कोणत्याहि भाषेतील शब्दसंपत्ति विपुल असली, तरच तिचा मोठेपणा प्रस्थापित होतो. अपुऱ्या शब्दसंपत्तीच्या बळावर कोणत्याहि भाषा वाढत्या विचारांचें वाहन होऊं शकत नाहीत. फारशी व इंग्रजी शब्दांना स्वभाषेतून आज हाकून देऊं म्हटलें तरी ते जाणार नाहीत, आणि ते जर गेले तर भाषेचे दुर्दैव ओढवलें असे म्हटलें पाहिजे. परक्या

भाषेतील शब्द स्वभाषेंत घेतल्याने भाषेला कमीपणा न येता प्रौढता मात्र येते. एक मात्र खबरदारी घेणे जरूर आहे. ती ही की, या नव्या शब्दाना हिन्दु करून घेऊनच त्याचा स्वभाषेत समावेश करून घेतला पाहिजे नवीन शब्द फारशी असो, आरबी असो, वा इग्रजी असो, तो हिन्दी सस्कृतोद्भव भाषात आला, म्हणजे तो शुद्धीकरणाने हिन्दु झाला असेंच लेखले पाहिजे. भाषेला जो कमीपणा येतो तो नव्या शब्दानी न येता, नवीन चालीरीति, नवे पोषाख व नवे सस्कार स्वीकारल्याने येतो. म्हणजे भाषेची घटना व रचना पूर्णपणे सस्कृतोद्भव पद्धतीची ठेवून नव्या शब्दाचा उपयोग केल्यास भाषा भ्रष्ट होत नाही हिन्दी लेखकानी हेच ध्येय डोळ्यासमोर ठेवून भाषेचे शुद्धीकरण केले आहे उर्दू व फारशी भाषाच्या अनिष्ट अनुकरणाने हिन्दी भाषेला जो मुसलमानी पेहराव चढला होता, तो त्यानी काढून फेकून दिला, मुसलमानी फॅशन म्हणून जे शब्द घरात शिरले होते त्याना हद्दपार केले परतु जे शुद्धीकरणसस्काराला कबूल होऊन हिंदू झाले, त्याना आपल्या घरात खुशाल बरोबरीच्या नात्याने वावरू दिलें

उत्तर हिंदुस्थानातील हिंदूत उर्दू लिपीचे पन्नास वर्षांपूर्वी अत्यत प्राबल्य होतें. अर्जाची भाषा हिन्दी असली तरी तो अर्ज उर्दू लिपीत लिहिला जाई. उत्तर हिंदुस्थानातील सरकारी दप्तराची लिपी इग्रजानी उर्दू ठरविली होती. जणू काय मुसलमानी धर्मानेच सर्व उत्तर हिंदुस्थान व्यापलें होते. परतु ह्या गोष्टीचा विधिनिषेध मात्र कोणाला वाटत नसे. उत्तर हिंदुस्थानातील हिंदू कारकून व इतर सुशिक्षित कायस्थ उर्दू लिपी लिहिण्यात फर्डे असत. देवनागरी लिपीची आळख त्याना अगदीच तात्पुरती असे, व कित्येक हिंदूना तर देवनागरी लिपी मुळी वाचताच येत नसे. गेल्या पन्नास वर्षांत मात्र उत्तर हिंदुस्थानात विलक्षण क्राति घडून आली हिंदी भाषेने व हिंदु लोकानी उर्दूचा त्याग करून देवनागरी लिपीचे पाणिग्रहण केले. त्यामुळे सरकारदरबारात उर्दूबरोबरच देवनागरीलाहि बसावयास स्थान मिळालें. उत्तर हिंदुस्थानातील मुसलमानाना या गोष्टीचा विषाद वाटणें साहजिक आहे. अजून देखील प्रयाग-काशीची ही नवी लाट दिल्ली-लाहोर-पर्यंत पोहोचली नाही, परतु पाचपचवीस वर्षांत तिकडेहि हे इष्ट स्थित्यतर झाल्याशिवाय राहणार नाही, अशीं चिन्हें आज दिसू लागलीं आहेत.

पंजाबातील हिंदू आज देखील उर्दू भाषा बोलतात. त्यांच्या मातृभाषेला ते केवळ हिंदू म्हणूनच सौजन्याने हिंदी म्हणता येईल, इतकी संस्कृतोद्भव शब्दांची विरलता त्यांच्या भाषणांत सापडते. फारशी शब्दभांडाराचें मात्र त्यांना भरपूर ज्ञान असते. अपवाद म्हणूनच एखादा संस्कृतोद्भव शब्द ते कधी काळी वापरतात त्यांची मुले प्राथमिक शाळांतून उर्दू लिपी लिहावयास व वाचावयास शिकतात, आणि पंजाबांतील बहुतांश हिंदूंची देवनागरी लिपीशी तोंडओळख देखील नसते.

उत्तर व दक्षिण हिंदुस्थान ह्यांत जमीन-अस्मानाचें अंतर आहे. मुसलमानी अमलाखाली देखील दक्षिणेंत उर्दूचें प्राबल्य वाढलें नाही. आदिलशाही व निजामशाही राज्यांत देखील सरकारी दप्तर मराठी भाषेत व लिपींत ठेवलें जात असे. दक्षिणेंत मुसलमान राज्यकर्ते आले ते केवळ उपऱ्याप्रमाणे आले, आणि त्यांना तेथे हिंदूप्रमाणेच राहावे लागले. देवगिरीच्या यादवांचे राज्य नष्ट झाल्यावर मुसलमानी साम्राज्य दक्षिणेंत स्थापन झाले, परंतु ते फार दिवस टिकले नाही. विजयानगरच्या हिंदु राज्याचा उदय लवकरच झाला आणि विजयानगराला ग्रहण लागल्यानंतर उदयास आलेली मुसलमानी राज्यें हीं ब्राह्मणी राज्याची वाटणी होऊन उत्पन्न झाली होती. खुद्द बहामनी राज्य किती ब्राह्मणी स्वरूपाचें होतें, हे संस्थापक हुसेन गंगोबद्दल प्रचलित असलेल्या ऐतिहासिक दंतकथावरून कळून येते दक्षिणेतील मुसलमान राजवटींत भाषा मराठ्यांची, सरदारी मराठ्यांची व मुत्सद्देगिरीहि मराठ्यांचीच होती. मुरार जगदेव, जाधव, निंबाळकर, मोरे वगैरे अस्सल मराठे सरदारच या मुसलमानी राज्यांचे आधारस्तंभ होते. उत्तर हिंदुस्थानांतील हिंदूंवर परसातल्या काबूल-कंदाहारची कडवी तरवार सारखी उगारलेली असल्यामुळे, मुसलमानी राज्याबरोबर मुसलमानी संस्कृतीने त्यांच्यावर चढाई केली असल्यास नवल नाही. परंतु दक्षिणेहून दिल्लीच फार दूर होती, तर मग काबूल-कंदाहारची गोष्टच कशाला? शिवाय विंध्याद्रीची भिंत, नर्मदा-तापी या नद्यांचे खंदक, आणि गोंड-भिल्लांचा घोर अरण्यमय गोंडवन प्रांत दक्षिणेचें रक्षण करण्यास समर्थ होता. यामुळे देवगिरी, विजयानगर, रायगड व पुणे ही हिंदु राज्यें दक्षिणेंत एकामागून एक उदयास आली व मुसलमानांची पाळेंमुळें दक्षिणेत कधीच

खोल रुजूं शकलीं नाहीत. आदिलशाही-निजामशाहीनी जरा मग्रूरी करताच शिवाजीमहाराज भोसल्यानी त्याची मस्ती जिरवून हिंदु राज्याची स्थापना केली, आणि भोसल्याच्या घराण्यातील हा पुरुष इतका थोर राजकारणी व दूरदर्शी होता कीं, स्वराज्याबरोबरच स्वधर्म व स्वभाषा याच्या उद्धाराकडेहि त्याने लक्ष दिले. लोक त्याला प्रत्यक्ष परमेश्वराचा अवतार समजून अजूनहि आळवितात, तें उगीच नाही श्रीशिवछत्रपतींच्या पुण्याईने शुद्धीकरणाच्या चळवळीची इतकी तीव्र जाणीव दक्षिणेस होत नाही उत्तर हिंदुस्थानात दुर्दैवाने कोणी शिवाजी झाला नाही त्यामुळे स्वाभिमान जागृत झालेल्या हिंदूना यापुढे जगात मानाने जगावयाचे व नादावयाचे असले, तर शुद्धीकरणाची कास धरल्याशिवाय अन्य मार्ग दिसत नाही. बगाल व पजाब प्रातात तर आज मुसलमान बहुसख्याक आहेत, आणि उत्तर हिंदुस्थानातील इतर प्रातात देखील ते अल्पसख्याक असले तरी दुर्लक्ष करण्याइतके थोडे नाहीत. आम्ही अल्पसख्याक असलो तरी ऐतिहासिक महत्त्वाच्या दृष्टीने आमचे घोडे हिदूच्या पुढे प्रत्येक बाबतींत दामटले जावे असा त्याचा आग्रह आहे. राजकारण, धर्म, सस्कृति व भाषा या चारी बाबतींत त्याचे चढाईचे धोरण सररास चालू आहे, आणि जणू काही दिल्लीस ऐतिहासिक मोगल बादशाहीचे छत्र आजहि धरले जात आहे, अशा आढ्यतेखोर भावनेने त्याची कामगिरी निर्धोक चालू आहे. त्यामुळे केवळ जगावयाचें झालें तरी शुद्धीकरणाची कास धरल्याशिवाय हिदूना गत्यतर उरलें नाही.

परतु श्रीशिवछत्रपतीच्या कृपेने दक्षिणेत तसा प्रसग ओढवला नाही, व स्वत्वाच्या जाणिवेनतर आता यापुढे तो ओढवणे शक्य नाही कारण, हल्ली सर्वत्र आपलेपणाची जाणीव झाली आहे. दक्षिणेत मुसलमान अगदीच अल्पसख्याक आहेत, आणि या हल्लीच्या शुद्धिकरणाच्या स्वाभिमानी व स्वधर्माभिमानी प्रबल लाटाना तुडवून त्याची सख्या यापुढे वाढणें शक्य नाही. आजचे शाहणे झालेले हिंदू सख्येच्या अल्पत्वामुळे राजकारणात देखील त्याचे प्रस्थ वाजवीपेक्षा फाजील वाढू देणार नाहीत. कारण स्वार्थत्याग हा दुहेरी असतो. 'माझे ते माझें व तुझें ते माझ्या बापाचें', हा अन्याय कोणत्याहि समाजाला फार दिवस खपणें शक्य नाही. ज्या प्रातात आम्ही बहुसख्याक आहोत तेथे आमचे राजकीय वर्चस्व राहिलेंच पाहिजे, परतु जेथे

आम्ही अल्पसंख्याक आहोत तेथे देखील आमचा फाजील बडेजाव चालला पाहिजे, हा मुसलमानी न्याय हिंदूना आता पटणे शक्य नाही. 'आम्ही आमच्या उन्नतीकरता संघटण करतो, तिकडे तुम्ही लक्ष देऊ नका, परंतु तुम्ही मात्र संघटण करू नका, कारण त्यामुळे आम्हाला सात्त्विक संताप येतो. धर्मप्रसाराची आम्हाला पैगंबराची व कुराणाची आज्ञा आहे. सबब आम्ही बऱ्यावाईट मार्गांनी हिंदु लोक बाटविणार. परंतु तुम्ही धर्मभ्रष्टाना देखील शुद्ध करून घेऊ नका, कारण ते मुसलमानी धर्मतत्त्वाविरुद्ध आहे. तुमचा आमचा सलोखा कायम टिकावयाचा असेल, तर हिंदूंच्या बायका मुसलमानानी एकदा पळवून बाटवल्या तरी त्या परत मागू नका. कारण मुसलमानी धर्माविरुद्ध तो गुन्हा आहे–' या नमुन्याच्या मुसलमानी तर्कशास्त्रास आता कोणीहि कवडीची किंमत देणार नाही.

भाषा व संस्कृति या बाबतीत देखील छत्रपतींच्या कृपेने दक्षिणेत हिंदूंचाच वरचष्मा आहे दक्षिणेतील मुसलमानांची राहणी इतकी हिंदू पद्धतीची असते की, बाह्य वेषावरून अमका मुसलमान म्हणून कोणी सहज ओळखू शकणार नाही. मुसलमानी राज्य असतानाहि दक्षिणेत हिंदु संस्कृतिच राज्य करीत होती. रोमन लोकांनी जेव्हा ग्रीस देश जिंकला, तेव्हा ग्रीक संस्कृति उलट रोमन लोकांच्या डोक्यावर चढली. त्याचप्रमाणे मुसलमानानी दक्षिण जिंकली, तरी हिंदु संस्कृति त्यांच्या शिरावर चढून बसली. दक्षिणेतील अनेक मुसलमानांना उर्दू भाषा लिहिता वाचता येत नाही, तेव्हा हिंदूंची गोष्ट दूरच राहिली. दक्षिणेतील बरेच मुसलमान उर्दू लिपीच्याऐवजी देवनागरीतून व प्रसंगविशेषी मोडीतून देखील पत्रव्यवहार करतात. त्यामुळे दक्षिणेत शुद्धीकरणाची फारशी जरूरी नाही. परंतु खिलाफतीच्या चळवळी-पासून सर्व हिंदुस्थानभर मुसलमानांचे विलक्षण संघटन झाले आहे, आणि हिंदूंवर चढाई करण्याचे त्यांचे व्यवस्थित प्रयत्न चालू आहेत. तेव्हा उत्तर हिंदुस्थानासारखा अनवस्था प्रसंग दक्षिणेत ओढवण्यापूर्वीच, बॅरिस्टर सावरकरानी धोक्याची सूचना देण्यापुरते रणशिंग फुंकले, ते ठीकच झालें. कारण आपण प्रथमच सावध राहून बचावाचें धोरण स्वीकारले तर त्यात कोणतेंच नुकसान नसतें. फार तर लोक आपल्याला भारी शंकेखोर म्हणतील, परंतु पुढे येणारी किंवा निदान संभवनीय असलेली भावी आपत्ति तरी

त्यामुळे खास टळेल. धर्माच्या दृष्टीने शुद्धीकरणाच्या चळवळीची दक्षिणेंत फार जरूरी आहे. कारण हिंदु धर्माचें शुद्ध व कणखर स्वरूप दाक्षिणेतच दृष्टीस पडतें. उत्तरेस मुसलमानी ससर्गाने ओवळा झालेला बाटगा हिंदुधर्म दक्षिणेत एखाद्या म्हाताऱ्या आजीबाईप्रमाणे कडकडीत सोवळा आहे. त्यामुळे अस्पृश्यत्वासारखी अन्यायी सामाजिक विषमता येथे कडक रीतीने दृष्टोत्पत्तीस येते. या सामाजिक जाचाने गाजलेल्या अस्पृश्यामधे मुसलमानी धर्माचा प्रसार करण्याची महत्त्वाकाक्षा मुसलमानी पुढाऱ्यानी धरली आहे, आणि त्यानी त्या दिशेने नेटाने चळवळ चालविली आहे. तेव्हा शुद्धीकरणाचा काटशह हिंदूनी त्या चळवळीस देणे जरूर आहे. कारण हिंदु धर्म बळावला तरच हिंदु सस्कृति बळावेल

परतु भाषेची गोष्ट फार निराळी आहे. मराठी भाषा आज उर्दू किंवा फारशी भाषाच्या आहारी गेली नाही. महाराष्ट्रातील मुसलमानानाच उर्दू भाषा व उर्दू लिपी फारशी येत नाही. तर मग हिंदूचे नावच त्या बाबतीत घ्यावयास नको मराठी भाषेचे वळण सस्कृतच्या पावलावर पावले टाकूनच बनले आहे. सस्कृतमधील तद्भव व तत्सम शब्दाचा मराठींत भरपूर भरणा आहे व प्रत्यही नवीन भर त्यात पडत आहे. मग सावरकराच्या तक्रारीस जागा कुठे आहे ? हजार वर्षाच्या मुसलमानी साहचर्यामुळे काही फार्शी व आरबी व थोडसे तुर्की शब्द मराठी भाषेत घुसले आहेत ही गोष्ट खरी. श्री० सावरकर व त्याच्यानतर इतरानीहि मराठी भाषेतील वीसपचवीस मुसलमानी शब्दाची प्रत्येकी उदाहरणे दिली होती. परतु या मुसलमानी भाषातून मराठी भाषेत किती शब्द आले आहेत या गोष्टीची कल्पना येण्यास प्रो० पटवर्धन यानी प्रसिद्ध केलेला फारशी-मराठी कोश चाळला पाहिजे. श्री० वा. गो आपटे याच्या मताने जवळ जवळ शेकडा सतरा टक्के शब्द मुसलमानी भाषातून मराठींत आले आहेत हिंदुस्थानात मुसलमानाचे ८०० वर्षे राज्य होतें, व आजहि व्यवहारात हिंदुमुसलमानाचा नित्य निकट सबध येत आहे. अशी वस्तुस्थिति असताना मुसलमानी शब्द मराठी भाषेत न येणे हीच नवलाची गोष्ट झाली असती. याशिवाय मराठी भाषेत बऱ्हाणपूर-ससर या मार्गाने हिंदी, सुरत-भडोच या मार्गाने गुजराथी, या सस्कृतोद्भव भाषाचे शब्द आले इतकेच नव्हे, तर विजापूर-बेळगाव मार्गे कानडी व चादा एदला-

बाद मार्गे तेलगू, या अनार्य परतु हिंदु भाषातील शब्दाचाहि भरणा झाला आहे. मराठी भाषा बोलणाऱ्या प्रांताच्या चतु:सीमेवर अन्य भाषा बोलणारे जे प्रात आहेत, त्याचा परिणाम मराठी भाषेवर झाल्याशिवाय कसा राहील? महाराष्ट्र हा काही पेटीत बद केलेला एक निर्जीव देश नाही तेव्हा महाराष्ट्रातील भाषा एखाद्या अस्पृश्याप्रमाणे किंवा विटाळशा स्त्रीप्रमाण एका कोपऱ्यात ताब्या पालथा घालून अन्य भाषाचा विटाळ होऊ न देता राहील, अशातला भाग नाही. जी भाषा इतकी सोवळी राहील, ती नष्ट होण्याच्या पथास लागली असे खुशाल समजावे या हिंदी भाषाशिवाय ( मुसलमानी भाषाना हिंदु नाही तरी हिंदी म्हणणे भाग आहे ) गोव्याच्या मार्गाने पोर्तुगीज, व इंग्रजी राजवटीत इंग्रजी, फ्रेंच भाषेतून देखील काही शब्द मराठीत घुसले आहेत. या दोन युरोपियन भाषातील शब्दाचाहि भरणा मराठीत झाला आहे.

मराठी भाषेतील शब्दाची खानेसुमारी करून त्याचे वर्गीकरण केले तर खालील जातिभेद त्या शब्दात दृष्टीस पडतील:--

| | | |
|---|---|---|
| शुद्ध सस्कृत | १४ | टक्के |
| विकृत सस्कृत | १८ | ,, |
| प्राकृत--द्वारा | ३० | ,, |
| कानडी | ३ | ,, |
| गुजराथी | १ | ,, |
| तामील व तेलगू | १ | ,, |
| हिंदी | २ | ,, |
| उर्दू, फारशी, आरबी, तुर्की | २० | ,, |
| युरोपियन | ५ | ,, |
| अशोधित | ६ | ,, |
| एकंदर | १०० | |

मराठी भाषेतील जाती व पोटजाती वरप्रमाणे सरासरी पडतील. मराठी भाषेतील एकदर शब्दसपत्ति सढळ हाताने व स्वाभिमान दृष्टीने मोजली तरी एक लक्षाच्या वर ती जाऊ शकत नाही उलट इग्रजी भाषेची शब्दसपत्ति ५ ते ६ लक्ष आहे. भाषेचे सामर्थ्य तिच्या शब्दसपत्तीवर सर्वांशीं अवलबून आहे. कारण अत्युत्तम व अभिजात ग्रथकाराच्या ग्रथानी भाषेला महत्त्व येत असले, तरी भाषेची शब्दसपत्ति भिकार असताना उत्तम ग्रथ निर्माण होणें दुरापास्त आहे. पाचसहा हजार रुपयात ताजमहाल बाधू म्हटला तरी तो उमद्या कारागिराला देखील बाधता येणार नाही. इच्छा, बुद्धि व कर्तृत्व एकत्र झालीं तरी त्याना सपत्तीची मदत घ्यावी लागतेच. इग्रजी भाषेसारख्या सपन्न भाषेला देखील परभाषातील—बरोबरीच्या युरोपियन राष्ट्राच्याच नव्हे तर जित राष्ट्राच्या देखील—शब्द आपल्या भाषेत सामावून घेताना कमीपणा वाटत नाही. मग मराठीने मुसलमानी शब्दावर बहिष्कार पुकारणे कितपत व्यवहार्य व इष्ट आहे? खुद्द श्री० सावरकर याच्या लिखाणातच कित्येक मुसलमानी शब्द त्याना न कळत घुसल्याचे त्याच्या टीकाकारानी अनेक ठिकाणीं दाखवून दिलें आहे. हा बहिष्कार व हे भाषेचें शुद्धीकरण शक्य नाही व इष्टहि नाही. मात्र नमस्काराऐवजी 'आलेकम सलाम' किंवा 'गुड मॉर्निंग' म्हणणाऱ्या, मनाने बाटलेल्या व स्वसंस्कृतीपासून च्युत झालेल्या, आणि विलायती पोषाखाने नटलेल्या तरुणाना त्याचे लेख धोक्याची सूचना म्हणून उपयोगी पडणारे आहेत.

---

# मराठी साहित्य-विचार

महाराष्ट्र साहित्य-संमेलनाचा मुख्य हेतु म्हटला तर तो आपल्या मराठी भाषेची अभिवृद्धि करणें हाच होय, हे उघड आहे. आपल्या भाषाभिवृद्धीचे निरनिराळ्या लोकांकडून वैयक्तिक प्रयत्न चाललेलेच असतात. परंतु त्या भिन्नभिन्न प्रयत्नांचें एकीकरण व्हावें, त्याच्यांत एकसूत्रीपणा उत्पन्न व्हावा आणि त्यांना हल्लींच्या आपल्या राष्ट्रीय आकांक्षांच्या दृष्टीनें सुसंघटित स्वरूप यावें, हाच मुख्यत्वेंकरून असलीं सामुदायिक संमेलनें भरविण्यांतील हेतु असतो. भाषाभिवृद्धि हाच जर हेतु असेल, तर ती भाषेची अभिवृद्धि दोन प्रकारांनी होत असते, हे उघड आहे. ते दोन प्रकार म्हणजे एक नैसर्गिक व दुसरा कृत्रिम यांत नैसर्गिक प्रकार हाच खरा महत्त्वाचा होय, आणि कृत्रिम प्रकार हे फक्त त्या निसर्गाला केवळ मदत करण्याकरितां म्हणूनच उपयोजावयाचे असतात. मेघोदरांतून पाऊसच पडला नाहीं, तर त्या पावसाचें पाणी सांचवावयाचे कोठलें आणि त्याचे कालवे बांधून त्याच्या योगानें शेतें सुपीक करावयाचीं कशीं? सारांश, निसर्गाच्या अनुकूलतेवरच मानवी प्राण्यांच्या कृत्रिम उपायांची सगळी धडपड चाललेली असते. भाषेची वाढ ती निसर्गाच्या नियमाप्रमाणें आपोआपच होत असते 'देवीं वाचमजयन्त देवा.' या मन्त्रांत म्हटल्याप्रमाणें परमेश्वरानें वाचाशक्ति निर्माण करून दिल्यापासून स्थलकालादिकांच्या भेदानुसार निरनिराळे लोक आपापल्या निरनिराळ्या भाषा बोलूं लागलेले आहेत, आणि त्या भाषांच्या द्वारानें सर्व लोक आपापले नित्याचे लौकिक व्यवहार साध्य करून घेत आलेले आहेत. पण आहारनिद्रादिक क्षुद्र लौकिक व्यवहार साध्य करून घेणें, एवढ्यानेंच कांही वाग्देवतेच्या निर्मितीची इतिकर्तव्यता संपते, असें कोणीहि समंजस मनुष्य समजणार नाहीं. वाग्देवतेच्या प्रसादानें निर्माण होणाऱ्या वाङ्मयाचें कर्तव्यक्षेत्र याच्यापेक्षां किती तरी विस्तृत, विशुद्ध आणि वैदग्ध्ययुक्त असें आहे. आणि येथेंच मनुष्याच्या कृत्रिम उपायांच्या योजनेला या विषयामध्ये प्रवेश पावण्याला अवकाश सांपडतो.

## भाषाभिवृद्धीचें एक साधन—वाढती लोकसंख्या

व्यवहार आणि विचारविनिमय हे हेतू सिद्धीस नेण्याकरिता पृथ्वीच्या पाठीवर आतापर्यंत किती भाषा निर्माण झाल्या असतील आणि किती लयाला गेल्या असतील, याचा कोणत्याहि इतिहासाला आणि कोणत्याहि प्राचीन आकडेशास्त्राला अद्यापि पत्ता लागलेला नाही. फार काय पण हल्लीं पृथ्वीच्या पाठीवर ज्या अनेक भाषा बोलल्या जात आहेत, त्यांचेंहि परिसंख्यान करणे अशक्य आहे. मग त्या भाषा रानटी लोकाच्या असोत किंवा सुधारलेल्या लोकाच्या असोत, त्या भाषा बोलणारांपैकी प्रत्येकाला त्या आपापल्या भाषेचा मोठा अभिमान वाटत असतो. सर्वच भाषा देवाने दिलेल्या कंठातून निघून देवाने दिलेल्या जिव्हेच्या द्वाराने अभिव्यक्त होत असतात, अशी जरी वास्तविक स्थिति आहे, तरी माझी भाषा तेवढी देवभाषा आहे, देव माझ्याच भाषेत बोलत असतात आणि नंदनवनातील देवांगना माझ्या भाषेतच आपली गाणीं गात असतात, अशी लोक आपल्या भाषेबद्दल प्रौढि मिरवू लागतात. ते आपल्या भाषेला मातृभाषा असें नाव देऊन तिला मातृवत् पूज्य मानू लागतात, आणि जगाच्या प्रारंभापासून आपले पूर्वज या भाषेंत बोलत आले आणि जगाच्या अंतापर्यंत आपले वंशज याच भाषेत बोलत राहणार, अशा स्वतःच्या भाषेबद्दल स्वाभिमानमूलक कल्पना त्यांच्या डोक्यात प्रसव पावू लागतात अशा निरनिराळ्या प्रकारच्या कल्पनांनी आणि कारणांनी मनुष्याच्या मनात आपल्या भाषेच्याबद्दल अभिमान उत्पन्न झाला, म्हणजे मग त्या भाषेची अभिवृद्धि कशी होईल, याच्याबद्दल त्याच्या मनात सहजच पुढे विचार उत्पन्न होऊ लागतात पण कोणत्याहि भाषेची अभिवृद्धि कशी होईल, या प्रश्नाबद्दलचे अगदी पहिलें आणि अगदी साधे उत्तर असे आहे कीं, जितके त्या भाषेचे बोलणारे जास्त, तितकी त्या भाषेची अभिवृद्धि जास्त म्हणजे थोडक्यात सांगावयाचें झाले, तर भाषेची अभिवृद्धि ही त्या भाषेतील लोकसंख्येवरून अजमावली जाते. पण अशा लोकांची संख्या वाढणें हे देखील फिरून थोड्याबहुत अंशाने निसर्गावरच अवलंबून राहते. अशा स्थितीमधे एखादी विशिष्ट भाषा बोलणाऱ्या

लोकांची संख्या वाढविण्याला नैसर्गिक मार्गांशिवाय काही कृत्रिम साधने उपयोगात आणता येतात किंवा नाही असा प्रश्न आपल्यापुढे विचाराकरिता उपस्थित होतो.

## इतर साधने—राज्याभिवृद्धीने भाषावृद्धि

या प्रश्नाच्या समाधानाकरिता आपण जगाच्या इतिहासाची पाने चाळूं लागलो, तर त्यात आपल्याला असे आढळून येते की, राज्याभिवृद्धीने पुष्कळ वेळा भाषाभिवृद्धि होत असते रोमन लोकांच्या प्रजासत्तात्मक राज्यातील आणि साम्राज्यातील योद्धे जिकडे जिकडे प्रांत काबीज करीत गेले, तिकडे तिकडे त्यांची लॅटिन भाषा त्यांच्या पाठीमागून गेली. आणि युरोपखंडातील बहुतेक देशांतील सुप्रबुद्ध लोकांमध्ये थोड्या शतकापूर्वी त्याच लॅटिन भाषेचा जिकडे तिकडे अत्यंत प्रसार झालेला होता. हल्लीच्या इंग्लिश भाषेचीहि तशीच गोष्ट झालेली आहे. इंग्लिशांनी जे जे मुलूख, आपल्या तागडीच्या किंवा तरवारीच्या जोरावर काबीज केले आणि जे जे त्यांनी आपल्या वसाहतींनी वसविले आणि व्यापारांनी वाढविले, तेथे तेथे इंग्लिश बोलणाऱ्या लोकांची संख्या आज जर पुष्कळ वाढली असली, तर त्यांची राज्याभिवृद्धि हेच त्यांच्या भाषाभिवृद्धीचे एक प्रमुख आणि प्रबळ कारण आहे, असें म्हणण्यास काही प्रत्यवाय दिसत नाही. हल्ली सगळ्या जगातील इंग्रजी भाषा बोलणाऱ्या लोकांची संख्या अकरा आणि बारा कोटी यांच्या दरम्यान आहे व इतकी मोठी संख्या दुसरी कोणतीहि भाषा बोलणाऱ्या लोकांची नाही. अथवा इतरांची उदाहरणे कशाला पाहिजेत ? आपल्या मराठी भाषेचीच गोष्ट आपण घेतली, तर तेथेहि आपल्याला वरील सिद्धान्ताचे प्रत्यंतर दृष्टोत्पत्तीस येतें. मराठी भाषा ही वास्तविक पाहिलें असता मूळची फक्त महाराष्ट्राची भाषा. पण ती आज मद्रासेंतील तंजावरांत, गुजराथेंतील बडोद्यांत, गोंडवनांतील नागपुरांत आणि उत्तर हिंदुस्थानांतील धार, देवास, इंदूर, ग्वाल्हेर, सागर, झांशी, इत्यादि ठिकाणीं जी बोलली जात आहे, त्याचें कारण काय ? मद्रास इलाख्यातील मराठीचा प्रसार अलीकडे जरी कमी झाला असला तरी एकदा अशी एक वेळ होती कीं, ज्या वेळीं खुद्द मद्रास सरकारचे आणि दक्षिण हिंदुस्थानांतील इतरहि कित्येक संस्थानांचे जमाखर्ची

हिशेब मराठीमधे ठेवले जात असत. या सर्व ठिकाणी पूर्वीच्या शूर मराठे शिपायानी आणि सरदारानी आपली मराठी राज्ये स्थापन केली, म्हणूनच तेथे मराठी भाषा बोलली जात आहे, असे नव्हे काय ? धनाजी जाधव आणि सताजी घोरपडे हे आपले मराठ्याचें लष्कर आपल्याबरोबर घेऊन चदीचदावरकडे मुलुखगिरी करीत चालले होते, त्या वेळेला ते आपल्या स्वराज्याबरोबर न कळत आपल्या स्वभाषेचाहि मद्रास इलाख्यात सोंडूर, गुत्ती, तजावर, वगैरे अनेक ठिकाणी प्रसार करीत चालले होते, हें भाषाभ्यासी लोकानी विसरता कामा नये. पुस्तके लिहून भाषेचा प्रसार केला जातो, अशी अलीकडच्या इग्रजीशाहीमधे एक कल्पना रूढ झालेली आहे पण ती अगदी बरोबरच आहे, असे नाही. अथवा एका निराळ्या दृष्टीने बालावयाचे झाल्यास ती थोडीशी खरीहि आहे ! कारण, दक्षिणेतून निघून हिंदुस्थानच्या उत्तरेच्या टोकापर्यंत जाणारे बाजीराव बल्लाळ, राघोबा-दादा, भाऊसाहेब पेशवे, रघोजीराव भोसले, मल्हारराव होळकर, महादजी शिंदे, वगैरे लोक हेहि एका दृष्टीने एक प्रकारचे ग्रथकारच होते ! मात्र त्याची ग्रथ लिहिण्याची तऱ्हा थोडी वेगळी होती ! ते घोड्यावर बसून आपले घोडे भरधाव फेकीत असता असता एकीकडे ते आपले ग्रथ लिहीत असत ! शत्रूच्या अगातील रक्त ही त्याची शाई ! त्याच्या तरवारी या त्याच्या लेखण्या ! आणि उत्तरेकडील रणक्षेत्रे हे त्याचे ग्रथ लिहिण्याचे कागद ! अशा सामग्रीने त्यानी आपले मराठी भाषेतील विजयग्रथ लिहून ठेविलेले आहेत ! आणि त्या ग्रथाच्या योगाने उत्तर हिंदुस्थानात त्यानी आपल्या मराठी भाषेची कायमची प्रस्थापना करून ठेविली आहे !

आपल्या मराठी भाषेने वर सागितल्याप्रमाणे जसे काही नवीन प्रात काबीज केले आहेत, त्याचप्रमाणे तिने आपल्या ताब्यातील काही जुने प्रात आपल्या हातून घालविल्याचीहि काही उदाहरणें आपल्या या दुर्दैवी देशाच्या इतिहासामधे आजमितीला उपलब्ध होत आहेत इंग्रजी भाषेने आपल्या मराठी भाषेच्या हद्दीमधे केलेले अतिक्रमण तर महशूरच आहे. पण त्याशिवाय हल्ली दक्षिण हैदराबाद या नावाने जो प्रात ओळखिला जात आहे, व हल्ली जेथें मुसलमानी अमदानी चालू आहे, तो मूळचा बहुतेक प्रात आपल्या मराठी भाषेच्या अमलाखालील होय. वेरुळचीं लेणीं,

दौलताबादचा किल्ला, देवगिरीच्या राजाचे राज्य, प्रतिष्ठान शहर आणि त्या बाजूचा गोदावरी नदीच्या किनाऱ्यावरील बराच मोठा भाग, या सर्व प्रदेशातून पूर्वी एकदा आपली मराठी भाषाच बोलली जात होती. महानुभाव पथाचें पूर्वीचें वाङ्मय, ज्ञानेश्वर महाराजाची ज्ञानेश्वरी, श्रीएकनाथ महाराजाचे एकनाथी भागवत व इतर अनेक ग्रथ या गोष्टीची खूण म्हणून अद्यापिहि तेथील अवशेष कायम आहेत. तसेच पश्चिम किनाऱ्यावरील रत्नागिरी आणि कारवार या दोन जिल्ह्याच्यामधील गोव्याचा प्रात हेहि अशाच प्रकारचे दुसरे एक उदाहरण होय गोवे हा मराठ्याचा मुलूख आणि गोव्यातील भाषा ही मराठी भाषा. पण तेथे आज पोर्तुगीज भाषेनें आपले डोके खुपसले आहे. तरी पण या दोन्हीहि प्रातामधे परकीय सत्तेला न जुमानता आपली मराठी भाषा बराच टिकाव धरून राहिली आहे, ही मोठ्या समाधानाची गोष्ट आहे.

## शिक्षणाचा प्रसार

येथपर्यंतच्या विवेचनावरून आपण असे पाहिले की, राज्यवृद्धीने बऱ्याच अशी भाषेची वृद्धि होत असते. पण हा मार्ग सध्या तरी निदान आपल्या मराठी भाषेच्या प्रसाराला मोकळा नाही अशा स्थितीत दुसऱ्या उपायाचे अवलबन करावयाचें म्हटले, तर त्यात शिक्षणाचा प्रसार हा एक निरुपद्रवी उपाय होय आपण नुसत्या मुबई इलाख्यापुरतेच बोलावयाचे म्हटलें, तर या इलाख्यातील एकदर सुमारे अडीच पावणेतीन कोटि लोकसख्येपैकी मराठी भाषा बोलणारे लोक जवळ जवळ एक कोटि निघतील. इतके लोक जरी मराठी भाषा बोलणारे असले, तरी यातील सर्वच लोक मराठी भाषेच्या अभिवृद्धीला किंवा मराठी वाङ्मयाच्या वाढीला मदत करण्याला लायक आहत, असे नाही एक कोटि ही संख्यादेखील काही थोडकी नाही पण यापैकी सुशिक्षित किंवा निदान साक्षर तरी किती आहेत ? याचे प्रमाण शेकडा आठदहाच्या आतच पडतें हे प्रमाण आपण वाढविले पाहिजे. सक्तीच्या शिक्षणाची आवश्यकता लोकाना भासू लागली आहे, व त्याबद्दलचे जरूर ते अधिकार म्युनिसिपालिट्या आणि लोकल बोर्डे याना देण्यात येत आहेत. परतु ही प्रगति फार सावकाशीने होणारी आहे. तिच्यामधे त्वरितता उत्पन्न करणें आवश्यक आहे. यातच स्त्रीशिक्षणा-

चाहि प्रश्न समाविष्ट होतो. उच्च वर्गातील स्त्रियामधे हल्ली स्त्रीशिक्षणाचा प्रसार फार झपाट्याने होत असून त्या योगानेहि मराठी भाषेच्या आणि वाङ्मयाच्या वाढीला पुष्कळ उत्तेजन मिळत आहे. स्त्रियाच्याकरिता शाळा, कॉलेजे, इतकेच नव्हे, तर स्वतंत्र युनिव्हर्सिटीहि स्थापन झाली असून सर्व प्रकारच्या परीक्षातून स्त्रिया उत्तीर्ण होऊ लागल्या आहेत. आणि वकील, जज्ज, डॉक्टर, कौन्सिलर, वगैरे कामावरहि स्त्रिया अधिष्ठित होत आहेत यामुळे स्त्रीशिक्षणाची होत असलेली प्रगति आपल्या भाषेच्या उत्कर्षाला पुष्कळ अशी कारणीभूत होईल, यात सशय नाही.

## उत्कृष्ट वाङ्मय

शिक्षणाच्या प्रसाराने आपल्या मराठी भाषेचा प्रसार जास्त होईल, ही गोष्ट तर निर्विवादच आहे. पण आपल्या भाषेचा जास्त फैलाव होण्याला आणखीहि एक साधन आहे आणि ते साधन म्हटले, म्हणजे आपल्या भाषेत निर्माण होणारे उत्कृष्ट वाङ्मय हे होय हल्लीच्या आपल्या मराठी भाषेच्या उन्नतीकडे आपण पाहिले, तर आपल्याला असे आढळून येते की इतर भाषातील चागले वाङ्मय आपल्या मराठी भाषेमधे आणण्याचेच अजून आपले प्रयत्न चाललेले आहेत. पण आपले मराठी वाङ्मय लोकानी आपल्या भाषातून भाषातरित करून घ्यावे, अशी लालसा इतराच्या मनात उत्पन्न होईल, इतक्या दर्जाचे वाङ्मय अजून आपण आपल्यामधे उत्पन्न करण्याला समर्थ झालो नाही. सस्कृत भाषेतील ग्रथ पाहिले, तर ते आपल्या पूर्वजानी दुसऱ्या कोणत्या भाषातून भाषातरित करून घेतले असतील, असे दिसत नाही ज्योतिष, गणित, वगैरेसारखे कदाचित् काही विषय काही विशिष्ट बाबतीपुरते वगळले असता बाकीची आपल्या आर्याची ग्रथरचना स्वयस्फूर्तिमूलकच असली पाहिजे, असे दिसते. पण बाकीच्या अर्वाचीन भाषाची तशी गोष्ट मुळीच नाही हल्लीच्या ज्या इग्रजी भाषेवर सूर्य कधीच मावळत नाही, त्या इग्रजी भाषेतीलहि पुष्कळशी पुस्तके ग्रीक, लॅटिन, फ्रेंच, जर्मन, रशियन, सस्कृत, पाली, इजिप्शन, पर्शियन, वगैरे भाषातून भाषातरित करून घेतलेली आहेत. फ्रेंच, जर्मन, वगैरे इतर अर्वाचीन भाषाचीहि अशीच स्थिति आहे. आणि याच

सार्वत्रिक क्रमाचें आपण मराठीमधेहि अनुकरण चालविलेलें असून संस्कृत, पार्शियन, इंग्लिश, फ्रेंच, वगैरे भाषातील चागले ग्रथ आपण मराठी वाचकापुढे सादर करीत आहों. हा क्रम काही दूषणार्ह आहे असे नाही. जें चागलें असेल, तें दुसऱ्यापासूनहि अवश्य घ्यावे पण आपली मराठीच्या अभिवृद्धीची महत्त्वाकाक्षा एवढ्यानेच परितृप्त होता कामा नये. हिमालयातील सगळ्या निर्झरांचें पाणी आपल्या पात्रामधे साठवून घेतल्यानतर आता हे पवित्र आणि निर्मळ निर्झरोदक आपल्या काठच्या प्रातातील लोकाना पाजून त्याचीं अत.करणे मी संतोषित करीन, हें जसे त्या गगेला वाटत असते, त्याप्रमाणे यापुढे आपल्या मराठी भाषेची महत्त्वाकाक्षा असली पाहिजे आपल्या भाषेमधे आपण असे उत्कृष्ट वाङ्मय निर्माण केलें पाहिजे कीं, त्या वाङ्मयातील सुदर आणि प्रतिभासंपन्न पुस्तकाचे आपल्या भाषेत आपण भाषातर केव्हा करून घेऊ, अशी इतर भाषा बोलणाराच्या मनात पिपासा उत्पन्न होऊन, त्यानी त्याकरिता आपापल्या भाषातून ट्रॅन्स्लेशन सोसायट्या स्थापन केल्या पाहिजेत. बंगाल्यातील बंकिमचद्र, सर रवींद्रनाथ टागोर, वगैरेसारख्या लेखकानी आपल्या बगाली भाषेला अशा उच्च दर्जावर आणून ठेविलें आहे, व त्यामुळे त्याच्या ग्रथाचीं इतर भाषातून भाषातरें झालेली आहेत. त्याप्रमाणे तुळशीदास, कबीर, मिराबाई, इत्यादि हिंदी कवींनीहि आपलीं हिंदीमधील काव्यें हिंदुस्थानातील सर्व भाषा बोलणाऱ्या लोकाना प्रिय होतील, इतक्या उत्कृष्टतेला नेऊन पोचविलेली आहेत. तितक्या स्पृहणीय स्थानाप्रत मी आपल्यातील ग्रथाना केव्हा नेऊन ठेवीन, अशी मराठी प्रतिभेला रात्रंदिवस तळमळ लागून राहिली पाहिजे. म्हणजे अशा रीतीनेंहि आपल्या मराठी भाषेचा आणि वाङ्मयाचा इतर प्रातातील लोकामधे प्रसार होण्याला पुष्कळ सुलभता प्राप्त होईल

पण आपल्या मराठी वाङ्मयाचा इतर प्रातातील लोकामधे जास्त प्रसार होण्याला आणखीहि एक साधन आहे. आणि ते साधन म्हटलें, म्हणजे

## नागरी लिपीचा प्रचार

हें होय. या साधनाचा प्रचार आपण आपल्या देशात जारीने सुरू करण्या-

चा प्रयत्न केला, तर त्याच्या योगाने फक्त आपल्या मराठी वाङ्मया-चाच इतर भापातून फैलाव होईल असें नसून इतर प्रांताच्या भाषा-तील पुस्तकेहि आपल्या महाराष्ट्रीय लोकाना सहजगत्या समजू लागून तितक्या प्रमाणाने एका दृष्टीने आपली महाराष्ट्रीय ग्रंथसंपत्तिहि वृद्धिंगत होईल, असे म्हणण्यास हरकत नाही. हिंदी, बंगाली, गुजराथी, मराठी, सिंधी, अशा या काही भाषा सकृद्दर्शनी जरी भिन्न भिन्न दिसत असल्या, तरी वस्तुनः त्या एकच आहेत, असे म्हणण्यास हरकत नाही. कारण, ह्या सगळ्या भाषा आर्यन शाखेपैकी असून त्यांची उत्पत्ति बहुतेक संस्कृत-पासूनच झालेली आहे देशकालपरत्वें या देशी भाषांच्या प्रत्ययांतून वगैरे काही फेरफार झालेले आहेत, परंतु यांच्यातील बहुतेक प्रातिपदिकें संस्कृतमधूनच घेण्यात आलेली असून मराठींतील तर एकदर शब्दांपैकी नऊदशांश शब्द संस्कृतातून घेतलेले असल्याकारणाने ज्याना साधारणत. संस्कृत शब्दांची माहिती आहे, त्याना थोड्याशा अभ्यासाने या भाषा समजण्याला अडचण पडत नाही, असा अनुभव आहे. यावरून हे लक्षात येईल कीं, हल्ली या भाषांमधून जे भिन्नत्व उत्पन्न झालेलें आहे, ते शब्दमूलक नसून लिपीभेदा-मुळेच पुष्कळ अंशी उत्पन्न झालेले आहे ही लिपीची अडचण आपण जर काढून टाकिली, तर या वर सांगितलेल्या सर्व चारपांच भाषांचे मार्ग सर्वांना सारख्या रीतीने मोकळे होतील. हल्ली जातीजातींतील आणि पोटजातींतील बंधनें नष्ट करून अनेक लोकांच्या एकीकरणाचे जसे प्रयत्न चाललेले आहेत, त्याचप्रमाणे हीं लिपीभेदाचीं बंधनें तोडून टाकल्याने हिंदुस्थानातील बऱ्याच भाषांचे एकीकरण आपल्याला यशस्वी रीतीने करता येण्यासारखे आहे. कानडी, तामीळ, तेल्गू, तुळू, मल्याळम् वगैरे दक्षिणेकडील भाषा द्रवीडियन शाखेपैकी असल्यामुळे त्यांच्यासंबंधाने तूर्त जरी हा एकलिपीचा प्रयत्न यशस्वी होणें शक्य दिसले नाही, तरी हिंदी बंगाली, गुजराथी, मराठी वगैरे ज्या संस्कृतोत्पन्न भाषा आहेत, त्यांच्या बाबतींमधे ही एकलिपीच्या प्रयोगाची कल्पना सुलभ होण्याला काहीच अडचण नाहीं. या चारपांच भाषांतील बहुतेक सुशिक्षित लोकांना संस्कृत भाषा अवगत असतेच. आणि संस्कृत ही जी देवांची भाषा ती देवनागरी लिपींतच लिहिलेली असल्यामुळे ती देवनागरी लिपी त्या सर्वांच्या पूर्ण

परिचयाची असते. त्या देवनागरी लिपीमधे हिंदी व मराठी या भाषा हल्लीहि लिहिल्या जात आहेत. परंतु बंगाली, गुजराथी, सिंधी, वगैरे लिपीमधे काही काही फरक आहेत. ते टाळण्यासाठी सर्वत्र सरास जर देवनागरी लिपीचा उपयोग करण्यात येऊ लागला, तर त्याच्यापासून भाषाविषयक दृष्टीने सगळ्याचाच किती तरी मोठा फायदा होणार आहे. बंगाली, गुजराथी, मराठी, या हल्ली भाषेच्या धद्यातील फार मोठ्या व्यापारी पेठा झालेल्या आहेत परंतु याचा हा व्यापार लिपीच्या कोंडमाऱ्यामुळे आपापल्या ठिकाणी कोंडून पडलेला आहे. पण एकलिपीच्या प्रयोगाने कोणी याच्यामधील हे प्रतिबंधक दरवाजे खुले केले आणि याच्या दरम्यान या एकलिपीच्या मार्गाने जर खुला व्यापार सुरू केला, तर भाषेच्या व्यापाराची किती तरी मोठी प्रगति होणार आहे. निरनिराळ्या लिपींतून लिहिल्या जाणाऱ्या या आपल्या निरनिराळ्या भाषा, हे एक प्रकारचे निरनिराळे समुद्र आहेत. त्या निरनिराळ्या समुद्रांना एकमेकाशी जोडणारे असे एकलिपीच्या प्रचाराचे सुएजचे कालवे जर आपण खणले, तर बंगालींतून गुजराथींत आणि गुजराथींतून मराठींतील आपले प्रवास किती सुलभ होतील, याची कोणालाहि कल्पना करता येण्यासारखी आहे. कॉंग्रेसने आणि नेहरू रिपोर्टाने हिंदी ही आपल्या राष्ट्राची सार्वत्रिक भाषा असावी असे धोरण आखलें आहे, हे युक्तच आहे. पण त्याच्याच बरोबर देवनागरी ही आपल्या राष्ट्राची—निदान आपल्या राष्ट्रांतील शक्य तितक्या भागाची तरी—सार्वत्रिक लिपी असावी, अशी योजना केली, तर तीहि किती तरी फायदेशीर होईल. काशी येथील नागरीप्रचारिणी सभेने या दिशेने पुष्कळ दिवसापासून नेटाचे प्रयत्न चालविले आहेत. त्या प्रयत्नांना प्रत्येक भाषेच्या अभिमान्यांनी आपापल्या भाषेच्या प्रसारार्थ उत्तेजन देणें अवश्य आहे. अशा रीतीने एकलिपीचा प्रसार झाला, तर हिंदी, बंगाली, गुजराथी, मराठी, सिंधी, वगैरे भाषांतील पुस्तकें छापण्यासाठी हल्ली जे निरनिराळे टाईप लागतात, ते जाऊन सगळ्या प्रांतांतून एकच देवनागरी टाईप चालू होऊन छापखान्याच्या कामांतहि किती तरी सुलभता उत्पन्न होईल, आणि या चारपांच भाषांपैकी कोणत्याहि भाषेंत पुस्तक छापलें गेलें, तरी तें सर्वांना समजेल अशा देवनागरी लिपींत छापलें गेलेलें

असल्यामुळे अशा पुस्तकाचा वाचकवर्ग वाढून त्याचा खपहि साहजिकपणेंच जास्त होईल

हल्लीच्या राजकारणामधे भाषावर प्रांतरचनेचें एक तत्त्व निघालेलें आहे. व त्या तत्त्वामधेंहि प्रस्तुतच्या राजकारणाच्या दृष्टीने एक प्रकारचा तथ्यांश आहे. आपण आपल्या मुंबई इलाख्याचीच गोष्ट घेतली, तर या एकाच इलाख्यामधे कानडी, मराठी, गुजराथी, आणि सिंधी, अशा चार भाषा बोलल्या जात आहेत. ही काय या प्रांताची सुसंघटना झाली? कीं हा काय ब्रिटिश राज्याचा सुव्यवस्थितपणा झाला? एखादा मनुष्य घाईघाईने जी वस्तु हाताला लागेल ती गोळा करताना एकाच पोतडीमधे निरनिराळ्या प्रकारच्या सर्व वस्तू कोंबतो, तशी इंग्लिशांची या बाबतींत स्थिति झालेली आहे! पेशव्याकडून मिळालेल्या महाराष्ट्रांतच गायकवाडाकडून मिळालेले सुरत-अमदाबादचे गुजराथी जिल्हे घाला, आणि १८४५ चे सुमारास सिंधच्या अमिराकडून घेतलेला सिंधचा मुलूख दुसरीकडे कोठे घालण्याला जागा नाही तर तोहि ठेवा मुंबई इलाख्यातच दडपून! अशा रीतीने या पंचरशी धातूने बनविलेले हें बावनकशी निर्भेळ सोनेंच आहे, असें भासविण्याचा इंग्लिशांनी कित्येक वर्षे प्रयत्न चालविलेला आहे. त्याच्याविरुद्ध कॉंग्रेसने 'तुम्ही भाषावार प्रांतरचना करा', अशी राजकीय क्षेत्रामधे सरकारच्या उलट तक्रार करीत राहणे यांतील दृष्टि अगदीं वेगळी आहे. पण ती सरकारच्या विरुद्ध योजिलेली दृष्टि आपण एकमेकांच्या विरुद्ध योजून, तुमची भाषा वेगळी, आमची भाषा वेगळी, अशी आपसांत भांडणे भांडत बसणें, हे अतिशय आत्मघातकीपणाचे आहे, हे आपल्या लक्षांत आलें पाहिजे असली भाषावार प्रांतविभागणी करण्यापेक्षा एकलिपीच्या साधनाने अनेक प्रांतांचें जर एकत्र एकीकरण करता आले, तर तें राजकीय दृष्ट्याहि किती तरी श्रेयस्कर होईल.

या एकलिपीच्या प्रसाराचा प्रयत्न करीत असताना आपण आपल्या दृष्टीपुढे युरोप खंडातील

## रोमन लिपीचे उदाहरण

ठेविलें असता अशा प्रयत्नाच्या यशस्वितेपासून किती फायदे होतील, याची

कोणालाहि योग्य कल्पना येण्यासारखी आहे. युरोपातील कित्येक देशाची स्वतः-ची म्हणून निराळी लिपी असली तरी तिकडील बहुतेक ग्रंथ आजकाल रोमन लिपीमधे छापले जातात. त्यामुळे असले ग्रंथ हे कोणत्याहि एका विवक्षित देशाचे न होता त्यांच्या सार्वत्रिक संचाराला मुबलक अवसर सापडतो व त्यामुळे ग्रंथप्रसाराचें क्षेत्र एकदम किती तरी पटींनी वृद्धिंगत होतें. आपल्या हिंदुस्थानातील हिंदी, बंगाली, मराठी, वगैरे वर सांगितलेल्या भाषाप्रमाणेच युरोपातीलहि बऱ्याच भाषा मूळ आर्यन शाखेपासून समुत्पन्न झालेल्या असल्यामुळे त्यांना हें एकलिपीचें सौकर्य सहज साधता येत असले, तरी युरोपियन टर्कीमधील भाषेची तशी स्थिति नाही. तरी पण तेथेहि रोमन लिपीचा प्रसार करण्याचा उद्योग केमाल पाच्छाने अलीकडे सुरू केला आहे व हिंदुस्थानातील सरकारहि उर्दू भाषा रोमन लिपीमधे प्रचलित करण्याचा प्रयत्न करीत आहे असें बाहेर आले आहे. पण लोकांच्या दृष्टीने आपल्याला जर भिन्न लिपींचें एकीकरण करावयाचे असेल, तर हिंदुस्थानातील उर्दू भाषा बोलणारांना रोमन लिपीच कशाला पाहिजे ? हिंदीमधे येणारे उर्दू शब्द हल्लीहि आपण देवनागरीमधे लिहीतच असतो त्याच देवनागरी लिपीचा बाकीच्याहि उर्दू शब्दासाठी लोक उपयोग करू लागले, तर त्या योगाने आपल्या भाषांच्या एकीकरणाचे क्षेत्र जास्तच वाढणार आहे रोमन लिपींत पूर्वी तिकडे छापलेले संस्कृत ग्रंथहि आता जर पुनः देवनागरीमधे छापण्याची प्रवृत्ति वाढत चाललेली आहे, तर हिंदुस्थानात यापुढे रोमन लिपीला जास्त अवसर मिळेल हें संभवनीय दिसत नाही.

## आक्रमणाची भ्रामक कल्पना

या वर सुचविलेल्या मार्गांनी व याशिवाय दुसऱ्या कोणाला जे दुसरे काही सुचतील त्या मार्गांनी आपण आपल्या देशातील भाषांचे महत्त्व वृद्धिंगत करूं या आपल्या देशातील अनेक भाषा निरनिराळ्या लोकांना समजू लागल्या, आणि त्या अनेक भाषांतील एकमेकांचे ग्रंथ आपण वाचू लागलों आणि एकमेकांचे बोलणें आपण समजूं लागलों, तर असल्या एकीकरणाच्या दृष्टीने आपण आपल्या राष्ट्राचें राजकीय दृष्ट्याहि हित करू शकू हा सोपा, सरळ आणि राजमान्य मार्ग आहे. यात एक दुसऱ्याच्या भाषेवर आक्रमण करीत आहे, असा कोणीहि आपला गैरसमज करून घेण्याचें कारण नाही.

या वर सुचविलेल्या एकीकरणाच्या मार्गाने आपण आपल्या देशांतील निरनिराळ्या भाषामधे विश्वबंधुत्वाचे प्रेमबंधन निर्माण करीत आहो. असल्या स्थितींत विरोधाच्या कल्पनेला कोणाच्याहि मनामधे जागा मिळणे शक्यच नाही. "माझ्या देशातील जितक्या भाषा, तितक्या सगळ्या माझ्याच भाषा, माझ्या मातृभूमीची जी जी भाषा, ती ती माझीच मातृभाषा ! दुसऱ्याच्या भाषात जें जे चांगलें असेल, तें तें मी वाचीन आणि माझ्या भाषेंत जे चांगलें असेल, ते मी दुसऱ्याना वाचावयाला देईन ! येथे आपपर बुद्धीला जागा नाही ! मी व माझे देशबांधव असे आम्ही कोणत्याहि भाषेने आमचे विचार व्यक्त करीत असलों, तरी आमची सगळ्याची एकच भाषा ! आणि त्या भाषेचे नाव 'माझी हिंदुस्थानची भाषा' हे होय !" अशी जेथे आपली सर्वांची भावना असली पाहिजे, तेथे आपल्याच देशातील एका भाषेने दुसऱ्या भाषेचा द्वेष करावा, हे शक्य तरी कसें होईल ! भाषेचे भेद हे काही खरे भेद नाहीत. जोपर्यंत अंतःकरण एक आहे, तोपर्यंत त्या अंतःकरणातील ध्वनिवाहक जिव्हा कोणतीहि भाषा बोलली, तरी ती ऐक्य आणि अभेदच बोलत असणार. सगळ्यातील पहिली बोलणारी जी वाग्देवी शारदा, ती कोणत्या भाषेत बोलत होती ? कालिदासाची कोकिळा आणि वर्ड्स्वर्थची Cuckoo (कोकिळा) या भिन्नभिन्न भाषामधे आपल्या चिजा गात होत्या काय ? नाही ! सगळ्या जगातील मोर एकच केकारव करीत असतात, आणि सगळ्या जगातील भ्रमर एकच प्रकारचा गुंजारव गुणगुणत असतात ! सृष्टिदेवतेला एकच भाषा अवगत असते, आणि एकच परमेश्वरी प्रसाद सर्व वार्णांमधून भरलेला आहे ! ज्या इंग्रजानी आज आपले स्वातंत्र्य हिरावून घेतलें आहे, त्याच्या भाषेंतील सुद्धा शेक्सपीअरचे एखादे शोकपर्यवसायी नाटक वाचून जर आपल्या डोळ्यातून टिपे गळतात, आणि त्याच्या भाषेंतील एडमंड बर्केची भाषणे ऐकून जर आपल्या बाहूमधे सात्त्विक स्फुरण उत्पन्न होतें, तर आपल्याच देशी भाषातील चांगल्या विचाराचा द्वेष करण्याइतका असहृदय मनुष्य कोण असूं शकेल ! चांगलें ते चांगलेंच असतें, आणि शिवाय जें आपलें असतें, ते तर प्रत्येकाला विशेषच चांगलें वाटतें. तेव्हा असल्या बाबतींत भलत्याच कुशंका कोणी आपल्या मनात आणणे केव्हाहि योग्य होणार नाही. आपण सगळेजण मिळून आपापल्या भाषेच्या अभिवृद्धीच्या

द्वाराने आपल्या देशाचे हित साधण्याला उद्युक्त झालें पाहिजे. अशा स्थितींत एका भाषेने दुसऱ्या भाषेवर आक्रमण करावयाचे ही कल्पना तरी कोठली ? आपला हिंदुस्थान देश इतका मोठा आहे कीं, त्यात प्रत्येक भाषेला आपला वाटेल तेवढा विस्तार करून घेण्याला वाटल तेवढी जागा आहे त्याकरिता एका भाषेने दुसऱ्या भाषेवर आक्रमण केले पाहिजे, अशी मुळीच स्थिति नाही. जर कोणाला आक्रमणच करावयाचे असेल, तर आपल्या आपसातील एकमेकाच्या भाषावर ते आक्रमण कशाला पाहिजे ? इंग्रजी ही परकीय भाषा हिंदुस्थानात घुसून ती येथील सर्वच भाषाना जी हळूहळू नामशेष करण्याच्या उद्योगात आहे, ती आपण सर्वांनीच मिळून आक्रमण करण्याला योग्य भूमिका नाही काय ? एकमेकाच्या भाषावर आक्रमण करण्याची कोण ही क्षुद्र इच्छा ! आणि ती कोणाच्या क्षुद्र मनुष्याच्या मनामधे येणार आहे ? आपल्या भाषेवर दुसरा कोणी आक्रमण करीत आहे, या नसत्या भीतीबद्दल वाईट न वाटता आपला सारा हिंदुस्थान देश दुसऱ्यानी आक्रमून टाकिला आहे, याबद्दल आपल्याला वाईट वाटले पाहिजे ! आणि त्याचे आपण न्याय्य मार्गांनी परत आक्रमण कसे करू, याचा आपण सर्वांनी एकत्र मिळून विचार केला पाहिजे आपल्या प्रांताची प्रीति तर पाहिजेच. पण तसल्या अनेक प्रांतानी मिळून जो आपला देश झालेला आहे, त्याच्या सामुदायिक हिताची कळकळ आपल्या अंत:करणामधे आपण जास्त बाळगली पाहिजे !

असो, येथपर्यंत भाषेच्या अभिवृद्धीसंबधाने जे कित्येक उपाय नमूद करण्यात आले, त्यापैकी उत्कृष्ट वाङ्मयाशिवाय बाकीचे बहुतेक सर्व उपाय बाह्य परिस्थितीच्या अनुरोधानेच उपयोगात येण्यासारखे आहेत. परंतु भाषाभिवृद्धीच्या अंतरंगासंबधाने आपण विचार करू लागलो, तर भाषेतील शब्दसंपत्ति आणि ग्रंथसंपत्ति या दोन साधनांवर त्या भाषेची अभिवृद्धि मुख्यत्वेंकरून अवलंबून असणार हे आपण केव्हाहि विसरता कामा नये. त्या दोहोंपैकी

## भाषेंतील शब्दसंपत्ति

या विषयाचा आपण प्रथम विचार करू शब्द हे विचार व्यक्त करण्याचीं साधनें आहेत. अमुक शब्दाने अमुक अर्थ समजला जावा, असा काही लोकाच्या दरम्यान एक प्रकारचा संकेत उत्पन्न झालेला असतो, आणि

या निरनिराळ्या संकेतांच्या अनुरोधाने निरनिराळ्या लोकांच्या निरनिराळ्या भाषा बनल्या जातात. जगांतल्या सगळ्या लोकांचा हा विवक्षित संकेत जर एकच प्रकारचा असता, तर मग जगामध्ये निरनिराळ्या भाषा न होतां सर्व जगभर एकच भाषा झाली असती. परंतु या जगताची विस्तीर्णता, कालाचें निरवधित्व, मनुष्याच्या कल्पकतेचें वैचित्र्य, वगैरे अनेक कारणांमुळें निरनिराळ्या देशांतील निरनिराळ्या काळच्या निरनिराळ्या लोकांचे शब्द-संकेत निरनिराळे बनून गेलेले आहेत. अमक्या शब्दापासून अमुक अर्थ समजला जावा, अशी ईश्वराची इच्छा असते, आणि तिलाच संकेत असें म्हणतात, अशी एक कित्येक लोकांची कल्पना आहे. सर्व गोष्टी ईश्वरा-पासूनच उत्पन्न होतात, या दृष्टीनें ही कल्पना ठीक आहे. पण ती दृष्टि बाजूला ठेवून आपण ईश्वरनिरपेक्षतेनें या प्रश्नाचा विचार केला, तर हे शब्दांचे संकेत केवळ मनुष्यकृतच असले पाहिजेत, हें कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखें आहे. जर हे संकेत ईश्वरकृत असते किंवा निसर्गनिर्मित असते, तर एकाच ईश्वरानें किंवा एकाच निसर्गानें सगळ्या लोकांकरितां जसें एकच प्रकारचें जल, तेज किंवा आकाश निर्माण केलें आहे, त्याचप्रमाणें त्यानें सगळ्या लोकांकरितां एकच प्रकारचे संकेत निर्माण करून दिले असते व त्या योगानें सर्व स्थळीं आणि सर्व काळीं जलाला जल, तेजाला तेज आणि आकाशा-ला आकाश असेच कांहीं तरी सांकेतिक शब्द सर्व लोकांकडून वापरण्यांत येऊन सर्व जगभर एकच भाषा झाली असती. पण असें तर झालेलें नाहीं. नाहीं म्हणावयाला ख्रिस्ती लोकांच्या बायबलामध्यें सर्व लोकांची बॅबेल नामक शहरांत पूर्वी एकदां एकच भाषा होती, पण पुढें देवाच्या शापानें त्या एका भाषेच्या अनेक भाषा झाल्या, अशी एक आख्यायिका आढळते. पण ती केवळ कल्पना असून ते कांहीं खऱ्या वस्तुस्थितीचें निदर्शक असें चिन्ह नव्हे. पण पूर्वी कधीं सगळ्या जगाची एक भाषा असली नसली, तरी चित्रें हें जसें सर्व जगाला समजणारें एक साधन आहे, त्याप्रमाणें सर्व जगांतील लोकांना समजणारी अशी एक कांहीं तरी भाषा असावी, अशी अली-कडच्या कित्येक कल्पक लोकांची खटपट असून Esperanto या भाषेच्या द्वारानें ती यशस्वी करण्याचे त्यांचे प्रयत्न चालू आहेत. पण हल्लीं आहे त्या स्थितीकडे पाहिलें, तर एकाच वस्तूला प्रत्येक भाषेंत निरनिराळे शब्द

आहेत. हे निरनिराळे संकेत कोणी निर्माण केले ? अर्थात् ते निरनिराळ्या लोकानीच केलेले असले पाहिजेत, हें उघड आहे. शिवाय, आपले विचार एक-मेकाना कळावे, यासाठी जसे भाषेंतील संकेत असतात, त्याचप्रमाणे आपले विचार इतर अनिष्ट लोकाना कळू नयेत, यासाठीहि भिन्नभिन्न भाषाचे भिन्नभिन्न संकेत लोकाना करावे लागले असले पाहिजेत, हे हल्लीच्या प्रचारांतील Code Languagesच्या उदाहरणावरून लक्षात येण्यासारखे आहे. देशांतील हवामान, थंडी किंवा उष्णता, जंगलांतील राहणें, समुद्रकांठची वस्ती आणि पर्वतावरील राहणी, पशुपक्ष्याच्या आवाजाचें अनुकरण, मनुष्यप्राण्याच्या तोंडातील ध्वन्युत्पादक यंत्रामधील गुणदोष, रानटीपणा, सुधारणा वगैरे इतरहि अनेक कारणें भाषाभेद उत्पन्न करण्याला मदत करीत असतात. बारा कोसावर भाषा बदलते, असा आपल्यामधे जो एक लोकप्रवाद आहे त्यातील मुख्य तत्त्वहि हेंच आहे. अशा अनेक कारणानी अनेक भाषा उत्पन्न झाल्या आहेत व अशा अनेक भाषा बोलणारे लोक आपआपल्या निरनिराळ्या व्यवहारासाठी एकत्र येणें अपरिहार्य असल्यामुळे एकाच्या भाषेंतील शब्द दुसऱ्याच्या भाषेत प्रविष्ट होणे हेहि तितकेंच अपरिहार्य होतें. इतकेंच नव्हे, तर इतर अनेक भाषाचें ज्ञान संपादिलेले असणे हे चतुरस्र-पणाचें एक लक्षण होय, असेंहि बहुधा सर्वत्र समजण्यात येतें. आपल्या स्वतःच्या भाषेतील शब्दसंपत्ति नाना तऱ्हेच्या कारणानी आणि कल्पनानी विस्तृत करून त्यात परकीय भाषेतील शब्दाची आपण भर घातली, तर त्यात काही गैर आहे, असें नाही. काही विशिष्ट अन्नाप्रमाणे परकीय शब्द पचविण्याचें आपल्यामधे सामर्थ्य असले तर तो काही दोष नव्हे. आणि असे काही तरी परकीय शब्द प्रत्येक भाषेतून संमिश्रित झालेले आहेतच.

परकीय शब्दाचें असे मिश्रण व्हावयाचे, असा हा सामान्य नियमच दिसतो, व त्याचप्रमाणे आपल्या मराठी भाषेचीहि तशीच स्थिति झालेली आहे, व इतर अनेक भाषातील शब्दाप्रमाणे आरबी, फारशी, उर्दू, इंग्रजी, या भाषातीलहि अनेक शब्द आपल्या मराठी भाषेमधे मागे घुसले व हल्ली घुसत आहेत ही स्थिति चांगली की वाईट, असा एक वादाचा प्रश्न हल्ली आपल्यामधे उत्पन्न झाला आहे. आपल्या भाषेंतील खंडोगणती शब्दाच्या समुद्रामधे काही थोड्याशा पाव रत्तीभर परकीय शब्दाची खसखस मिसळली, म्हणून

स्यात काही बिघडते, असे नाही. परंतु आपल्या भाषेत मिसळणारे मुसलमानी आणि इंग्रजी शब्द हे आपल्या भाषेवरहि आपल्या प्रस्तुतच्या राजकीय पारतंत्र्याचा छाप कायमचा मारून ठेवितात. यामुळे हे शब्द आपल्याला दुःसह होतात, हेंहि काही खोटे नाही. आपण व्याख्यानातून, खाजगी भाषणातून, पत्रव्यवहारातून, किंबहुना आपल्या घरातल्या बोलण्यातूनसुद्धा, इंग्रजी शब्द अतिशय वापरतों या उद्वेगजनक स्थितीने अत्यंत उद्विग्न होऊन कै० राजवाडे यांनी एके प्रसंगीं या इंग्रजीच्या जोखडाखाली आणि जुलमाखाली आपली मराठी भाषा कदाचित् मरेल देखील की काय, अशी 'अतिस्नेहः पापशंकी' या दृष्टीने एक भीति प्रदर्शित केली होती. त्याचप्रमाणे जे मुसलमान दोघानाहि सारख्याच रीतीने भरडून काढणाऱ्या बिकट राजकीय परिस्थितीमधेहि हिंदूंशी सहकारिता करीत नाहीत, त्यांचे मुसलमानी शब्दहि आपल्या मराठी भाषेत कशाला पाहिजेत, अशा दृष्टीने दे० भ० सावरकर व इतर काही लोक इंग्रजीबरोबर मुसलमानी शब्दांचेहि आपल्या भाषेंतून उच्चाटन करून टाकण्याचा उद्योग करीत आहेत. युरोपखंडातील स्वित्झर्लंड आणि इटली यांच्यावर एकेकाळी ऑस्ट्रियाचे राज्य चालू होतें, त्या परकीय राज्याचे जोखड झुगारून देऊन स्वतःची स्वतंत्रता प्रस्थापित करण्याचा जेंव्हा या वरील दोन देशातील काही संस्थानांनी प्रयत्न आरंभिला, तेंव्हा त्यांनीहि आपल्यावरील जुलमी राजाच्या भाषेतील शब्द आपल्या कोशातून काढून टाकण्याला अशाच रीतीने सुरुवात केली होती व ग्रीक लोक १८२५ सालीं टर्कीच्या जुलुमातून सुटण्यासाठी धडपडूं लागले, तेंव्हा त्यांनीहि टर्किश शब्दांना आपल्या भाषेतून अर्धचंद्र देण्याचा क्रम सुरू केला होता, असा इतिहास सापडतो. किंवा इतकेंहि मागे जावयाला नको. हल्लीसुद्धा जर्मन लोक फ्रेंच लोकांच्या भाषेचा इतका तिटकारा करतात कीं, आपल्याशीं बोलणाऱ्या फ्रेंच मनुष्याला आपलें उत्तर समजो अगर न समजो, पण त्याच्याशीं ते आपल्या जर्मन भाषेतल्याशिवाय कधीहि बोलत नाहीत. तेंव्हा पारतंत्र्याच्या तिटकाऱ्याच्या दृष्टीने विश्वनाथपंत राजवाडे यांची काळजी आणि विनायकराव सावरकर यांची उद्योगशीलता लक्षांत घेण्यासारखी नाही, असे कोण म्हणेल? तरी पण एवढे खास की, आपली मराठी भाषा मरणोन्मुख झालेली नसून ती उत्तरोत्तर उदयोन्मुखच होत

चाललेली आहे. तिच्यात हल्ली जर काही थोडासा तेजस्वितेचा कमतरपणा दिसत असेल, तर तो संध्याकाळच्या नंतरचा नसून प्रातःकाळच्या पूर्वीचा आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या गीतेवरील भावार्थदीपिकेपासून तों लो० टिळकांच्या गीतारहस्यापर्यंत ज्या मराठीमधे आतापर्यंत अनेक ओजस्वी ग्रंथ निर्माण झाले आहेत, ती भाषा मरण्याकरिता जन्माला आलेली नाही! ज्या भाषेत रामदासांनी शिवाजीला स्वधर्मरक्षणाची प्रेरणा केली, आणि ज्या भाषेमधे शिवाजीमहाराजांनी मराठ्यांचे स्वराज्य आणि स्वातंत्र्य प्रस्थापित केले, ती मराठ्यांची भाषा मारण्याकरिता जन्माला आलेली आहे, मरण्याकरिता नव्हे! ज्या भाषेंत बाजीराव बल्लाळ लढले, ज्या भाषेत राघोबादादांनी अटकेपर्यंत भराऱ्या मारल्या, ज्या भाषेत नाना फडणविसांनी मनसुभे केले, ज्या भाषेंत महादजी शिंद्यांनी दिल्लीमधे फिरून मराठ्यांचे नांव कायम केलें, आणि ज्या भाषेमधे झांशीच्या राणी लक्ष्मीबाईनी आपली स्वदेशभक्ति आणि वीरवृत्ति ओतली, ती मराठी भाषा नष्ट होणें केव्हाहि शक्य नाही! आणि आपल्या मराठी भाषेबद्दल आपल्याला इतका सकारण आत्मविश्वास असतांना तिच्यामधे परकीय भाषांतील कांही शब्द असले, म्हणून ते आपल्या भाषेचें कांही नुकसान करीत नसून उलट आपल्या भाषेतील शब्दसंपत्ति वाढविण्यालाच कारणी-भूत होत असतात, हा त्यांच्यापासून होणारा फायदा आपण केव्हाहि विसरतां कामा नये. मराठींत मूळ आणि प्रकृतिभूत अशा सिद्ध शब्दांची संख्या मोल्सवर्थच्या अंदाजाप्रमाणे २०,००० हून जास्त आहे व त्यांच्यापासून समास, प्रत्यय, वगैरेंच्या द्वाराने साधित झालेल्या शब्दांच्या संख्येचें तर परिगणन करणेंहि दुरापास्त आहे. आणि इतक्या मोठ्या शब्दसमुदायापैकीं पूर्वी सांगितल्याप्रमाणे मूळचे संस्कृत असलेले नऊदशांश शब्द वगळले, तर बाकी राहिलेल्या एकदशांश टयुरेनियन वगैरे शब्दांत कांही मुसलमानी किंवा इंग्रजी शब्द असले तरी रोमन नागरिकांमधील परकीय लोकांप्रमाणे ते आपल्या भाषेचें वैभव आणि विस्तृतत्व सिद्ध कर-ण्यालाच साधनीभूत होणार नाहींत काय?

आपल्या प्राचीन संस्कृतामधे देखील कित्येक म्लेंच्छ शब्द अंत-र्निविष्ट होऊन राहिलेले आहेत. यव म्हणजे प्रियंगु, वराह म्हणजे कृष्ण-

शकुनि, पीलु म्हणजे हत्ती, पिक म्हणजे कोकिल, नेम म्हणजे अर्धा, तामरस म्हणजे कमल, इत्यादि अनेक म्लेच्छ शब्द त्या त्या अर्थी संस्कृतमधे रूढ झालेले असल्याचा उल्लेख आणि स्वीकार श्रीशबरस्वामींनी आपल्या मीमांसासूत्रावरील भाष्यामधे केलेला असल्याचे तज्ज्ञांना माहीतच आहे. "तेऽसुरा हेलयो हेलय इति कुर्वन्तः पराबभूवुः। तस्माद् ब्राह्मणेन न म्लेच्छितवै, नापभाषितवै, म्लेच्छो ह वा एष यदपशब्दः" या पतंजलीच्या महाभाष्यातील वाक्यात सांगितल्याप्रमाणे अभिजात भाषा बोलणाऱ्या लोकांनी म्लेच्छ शब्दांचे प्रयोग न करिता त्यांच्या जागीं संस्कृत शब्दच उपयोगांत आणीत जावे, हे अवश्य आहे. परंतु त्यासाठी परकीय शब्दांचे आपल्या भाषेतून समूळ उच्चाटनच करून टाकिलें पाहिजे, असें नाहीं. शिवाजीमहाराजांनी राजव्यवहारकोश म्हणून संस्कृत प्रतिशब्दांचा मुद्दाम एक कोश करविला होता, हें मशहूरच आहे. आणि त्या वेळच्या वाङ्मयाकडे पाहिलें, तर त्यांतहि हेच तत्त्व आढळून येते की, त्या वेळच्या काव्यांतून आणि पत्रव्यवहारांतून संस्कृत आणि मराठी शब्दांचेच प्राचुर्य दिसून येत होतें. पण त्यांत मुसलमानी शब्द मुळींच येत नव्हते, असें नाहीं. शिवाजीचे गुरु म्हणून मानले जाणारे खुद्द रामदासस्वामी यांच्या ग्रंथांमधेहि कांहीं यावनी शब्द असल्याचे दाखवून देता येईल. त्या वेळचे वामन पंडित, रघुनाथ पंडित, तुकाराम, वगैरे कवींच्या काव्यांतून तर पुष्कळच मुसलमानी शब्द उपयोजिलेले आढळतात. फार काय, पण शिवाजीच्या वेळेपासून तों अगदीं शेवटच्या बाजीरावपर्यंतचे जे जुने पत्रव्यवहार हल्लीं प्रसिद्ध झाले आहेत, त्यांतून सुद्धां इतर मुसलमानी शब्द इतर आहेतच, पण महिन्यांचीं आणि वर्षांचीं नांवेंहि त्याच परकीय भाषेतील असल्याचे आढळून येते. पण आपल्या कागदपत्रांतून मुसलमानी महिने आणि वर्षे लिहिणारे आपले पूर्वींचे मराठे राजे आणि सरदार आपल्या मुसलमानी शत्रूंची मात्र कधीं अशी उपेक्षा करीत नसत. संस्कृत भाषेमधे राजव्यवहारकोश करविणारे श्रीशिवाजीमहाराज हे त्या वेळच्या परकीय सत्तेचें उच्चाटन करण्यांत मुख्यत्वेंकरून निमग्न झालेले होते. परकीय शब्दांचीं उच्चाटनें करीत बसण्यांत त्यांना इतकीशी बहादुरी वाटत नव्हती. या सगळ्या गोष्टी

लक्षात आणून आपण आपले हल्लींचे प्रयत्न जास्त उपयुक्त कार्याकडे वळविणें जरूर आहे. साराश, एखादे परकीय शब्द असूनहि जर ते आज आपल्या भाषेंतील शब्दसंपत्ति वाढविण्याला साधनीभूत होत असतील, तर त्याना धक्के मारून आपल्यातून घालविण्यात आपण आपल्या भाषेचा काही फायदा करीत आहों, असा मुळीच अर्थ होत नाही.

परकीय भाषेंतील शब्दानी आपली शब्दसपत्ति जशी वाढलेली आहे त्याचप्रमाणे ती आपल्या भाषेतल्या भाषेंतच नवीन शब्द निर्माण करूनहि आपण वाढविली पाहिजे. हल्ली नवीन शास्त्रे, नवीन शोध आणि कल्पना, याच्याशीं प्रत्यहीं फार झपाट्याने आपला सबध येत चाललेला आहे व त्या सगळ्याचें प्रतिबिंब आपल्या मराठी भाषेमधे आपल्याला प्रदर्शित करावयाचें असल्यामुळे अर्थातच आपल्याला नवीन मराठी शब्द बनविण्यावाचून गत्यतरच नाही. व याच हेतूने शास्त्रीयपरिभाषामडळ या नावाचे एक नवीन मडळ मराठींत शास्त्रीय विषयाकरिता नवीन पारिभाषिक शब्द बनविण्याच्या उद्देशाने प्रस्थापित करण्यात आलेले आहे. हे पारिभाषिक शब्द बनविताना सस्कृत भाषेचा आपल्याला फार उपयोग होतो. संस्कृत भाषा ही आपल्या मराठी भाषेच्या साम्राज्याच्या ताब्यातील एक सोन्याची खाण आहे या खाणींतील सोन्याने आपण आपल्या भाषासुंदरीच्या अगावर किती तरी सुवर्णालकार घातलेले आहेत व अजूनहि लागेल तितकें सोनें या खाणींतून आपल्याला काढता येण्यासारखे आहे. परतु लॅटिन भाषेपासून उत्पन्न झालेले शब्द न घेता ॲंग्लोसॅक्सन भाषेमधीलच साधे आणि लहान शब्द वापरले जावे, ही जशी इग्रजी भाषेमधे एक प्रवृत्ति निघालेली आहे, त्याचप्रमाणे मराठी भाषेमधेहि फारसे सस्कृत शब्द न वापरता साधे व सोपे असे लहान लहान मराठी शब्दच वापरावे, असे काही लोक प्रतिपादन करितात, व त्याप्रमाणे क्वचित् कोणी हे तत्त्व आचरणातहि आणतात. परतु असे प्रत्येक भाषेवर आपण बहिष्कार घालू लागलों, तर आपली शब्दसपत्ति अगदींच दारिद्र्यावस्थेला जाऊन पोचेल, हें आपण लक्षात बाळगलें पाहिजे.

असो; याप्रमाणे आपण आपल्या शब्दसंपत्तीचा विचार केल्यानतर आता आपण आपल्या मराठी भाषेतील

## ग्रथसंपत्ति

मुख्य प्राणभूत अशी जी, तिच्याकडे वळू मराठीतील आपल्या ग्रंथसपत्तीचा विचार करावयाचा, म्हणजे त्या विषयाचे स्वाभाविकपणेंच भूत आणि भावि असे दोन विभाग होतात. आतापर्यंतचे झालेले जुने ग्रथ व याच्यापुढे व्हावयाचे नवीन ग्रथ यापैकी पहिल्याचे निरीक्षण करणे आणि पुढल्याना योग्य वळण लावणे, असे आपले हल्लीचें द्विविध कर्तव्यकर्म आहे. यापैकी आतापर्यंतचा आपला ग्रथसमूह आपण लक्षात घेतला, तर त्याचा विस्तार बराच मोठा आहे, यात सशय नाही. आपली मराठी भाषा केव्हापासून बोलली जाऊ लागली, आणि तिच्यामधे केव्हापासून ग्रथरचना होऊ लागली, हे प्रश्न अद्यापि संशयाच्या आणि सशोधनाच्या क्षेत्रातच सापडून राहिलेले आहेत. सस्कृतातून शौरसेनी, मागधी वगैरे ज्या कित्येक प्राकृत भाषा उत्पन्न झाल्या, त्यापैकी महाराष्ट्री ही एक मुख्य भाषा होय, व तिच्यापासूनच आपली हल्लीची मराठी भाषा उत्पन्न झालेली आहे. या भाषेतील ज्ञानेश्वर महाराजाची ज्ञानेश्वरी हाच पहिला ग्रथ, अशी पुष्कळाची पुष्कळ दिवस समजूत होती पण ही नवीन सापडलेल्या पुराव्यानी आता चुकीची ठरली आहे. मराठी भाषेतील कित्येक शब्दाचे उल्लेख अनेक शतकापूर्वीच्या शिलालेखातून आणि ताम्रपटातून आढळण्यात येत असून रा रा यशवत खुशाल देशपाडे यानी प्रसिद्ध केलेल्या माहितीप्रमाणे नवव्या शतकातील श्रीपतीची वैद्यकीय टीका, दहाव्या शतकातील अभिलषितार्थ चितामणींतील मराठी पद्यें, आणि अकराव्या शतकातील विवेकसिंधु वगैरे ग्रथ, यावरून श्रीज्ञानेश्वर महाराजाच्या बऱ्याच पूर्वकालापासून मराठी भाषा प्रचारात असली पाहिजे, असे दिसते. पूर्वीच्या दीर्घकालीन प्रचारावाचून ज्ञानेश्वरींतल्यासारखी प्रौढ आणि सुदर भाषा एकाएकीं प्रयोगामधे येणे अशक्य आहे शिवाय ज्ञानेश्वराच्या पूर्वीचे मानभावी पथाचे अनेक मराठी ग्रथ हल्ली नवीन नवीन उपलब्ध होत आहेत. त्यावरूनहि आपल्या या महाराष्ट्रीय भाषेचें प्राचीनत्व चागल्याच रीतीने प्रस्थापित होत आहे. त्या वेळचे काही ग्रथ जरी आज उपलब्ध झाले आहेत, तरी त्याच्यापेक्षा जास्त मराठी ग्रंथ मोगलाई, वऱ्हाड, वगैरे प्रातात अनुपलब्ध स्थितींत असण्याचा सभव आहे. अशा ग्रथाचा शोध लावून त्याना काळोखातून प्रकाशामधे आणणें हें

आपलें कर्तव्यकर्म आहे. अशा या जुन्या ग्रथाच्या सशोधनापासून आपल्या हल्लीच्या नव्या मराठींतील व्युत्पत्तीच्या आणि व्याकरणाच्या प्रश्नावर किती तरी नवीन प्रकाश पडणार आहे. त्याचप्रमाणे बौद्धाचे आणि जैनाचे पाली, मागधी, अर्धमागधी, वगैरे अनेक भाषातून जे ग्रथ आहेत, त्याचाहि अभ्यास आपल्या मराठी भाषेच्या पूर्वपीठिकेच्या दृष्टीने करणे अवश्य आहे. हल्ली पुण्यास इतिहाससशोधकमडळ म्हणून जी प्रख्यात सस्था आहे, तिच्याच मार्फत हें आपल्या प्राचीन मराठी भाषेच्या सशोधनाचे काम चालविण्यात येते. पण वास्तविक पाहिले असता आपल्या प्राचीन मराठीच्या संशोधनाचे क्षेत्र इतके मोठे आहे, व ते याच्यापुढे इतके जास्त मोठे होण्याचा संभव आहे कीं, त्याच्याकरिता एक स्वतत्र सशोधकमडळ असणेच आवश्यक आहे.

असो. या वर दिलेल्या माहितीप्रमाणे नवव्या शतकापासून आपल्या मराठी भाषेमधे ग्रथरचना होण्याला सुरवात झाली असें आपण मानले, तर तेव्हापासून गेल्या एकोणिसाव्या शतकाच्या अखेरपर्यतचा सुमारें एक हजार वर्षांचा मराठींतील ग्रथसमूह आज आपल्या वाङ्मयामधे उपस्थित आहे. मराठींतील पुष्कळ ग्रथ अद्यापि उपलब्ध झालेले नसतील, कित्येक ग्रथ मुसलमानाच्या स्वाऱ्यामुळे लुप्त झाले असतील, आणि कदाचित् काही ग्रथ कसरीच्या भक्ष्यस्थानीं पडून आज दुष्प्राप्य झाले असतील. या कारणामुळे जुन्या मराठी ग्रथाची सख्या काही अशी मर्यादित झाली असली पाहिजे, हे उघड आहे. पण याच्याशिवाय या बाबतींत आणखीहि एक कारण आहे. हल्ली आपल्यातील कित्येक लोक मराठींत ग्रथ न लिहिता इग्रजींत लिहीत असतात, त्याप्रमाणेच जुन्या काळी ज्यानी मराठीत ग्रथ लिहिले असते, अशा बहुतेक विद्वान् लोकाची प्रवृत्ति मराठीचा तिटकारा करून सस्कृता-मधे ग्रथ लिहिण्याची होती. नवव्या शतकापासून चवदाव्या पधराव्या शतका-पर्यतच्या सस्कृत ग्रथाच्या आणि त्याच्या कर्त्यांच्या एखाद्या सूचीकडे पाहिलें, तर तिच्यामधे अत्यत नामाकित अशा किती तरी महाराष्ट्रीय पंडिताचीं नावें आपल्याला आढळून येतील. या पडितानी सस्कृतच्या ऐवजी मराठीमधे काव्यरचना केली असती, आणि शास्त्रीय ग्रथ लिहिले असते, तर आज आपल्या मराठी ग्रथसग्रहाची सख्या आणि योग्यता किती वाढली असती, याची कल्पनाहि करणें शक्य नाही. परतु ते नाहीत तर नाहीत, पण

त्याच्या ऐवजी निदान चक्रधर, मकुंदराज, निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, एकनाथ, दासोपंत, निरंजनमाधव, रामदास, मुक्तेश्वर, तुकाराम, वामन पंडित, रघुनाथ पंडित, मोरोपंत हे तरी त्या संस्कृत ग्रंथरचनेच्या लाटेंत न सांपडतां आपल्या मराठी भाषेला लाभले हेंच तूर्त आपलें भाग्य समजलें पाहिजे.

हीं वरील कारणें वर्ज्य केलीं असतां आपल्या मराठी वाङ्मयाची वाढ गेल्या हजार वर्षांत सामान्यतः अविरत रीतीनें चालत आलेली आहे. या वाङ्मयांतील समग्र ग्रंथांची शतकवारीनें मोजदाद करतां येणें अशक्य आहे. पण जो कांहीं ग्रंथविस्तार झालेला आहे, त्यांत तो अमुक शतकांत जास्त झाला आणि अमुक शतकांत कमी झाला, असें म्हणण्याला फारशी कांहीं जागा नाहीं. त्याचा प्रवाह बहुतेक सारख्याच संथ रीतीनें चाललेला दिसतो. पाश्चिमात्य वाङ्मयाचे इतिहासलेखक आपापल्या वाङ्मयाचा इतिहास लिहीत असतांना त्यांना त्यांच्या वाङ्मयांत असें आढळून येतें कीं, कांहीं विशिष्ट काळीं त्यांच्या वाङ्मयाच्या स्फूर्तीला विशेष जोर आलेला आहे. रोमन लोकांच्या ऑगस्टस् बादशहाच्या कारकीर्दीमधें चांगले ग्रंथलेखक झाले, इटलीमधें व इतरत्र (Renaissance) पुनरुद्धाराच्या वेळीं चांगल्या वाङ्मयाला स्फूर्ति मिळाली. इंग्लंडमधें वाङ्मयाच्या बाबतींत एलिझाबेथ राणीची कारकीर्द फार प्रशंसनीय झाली: असले कांहीं सिद्धान्त त्यांच्या वाङ्मयविषयक इतिहासांतून नमूद केलेले आढळतात, व 'राजा कालस्य कारणम्' या न्यायाची उपपत्ति ते या गोष्टीच्या स्पष्टीकरणासाठीं सांगतात. पण आपल्या मराठी वाङ्मयामधें असे कांहीं फेरफार मोठ्या उत्कटतेनें कोठेंच घडून आलेले दिसत नाहींत आणि याचें कारण कदाचित् असेंहि असेल कीं, आपल्या इकडचे जुने ग्रंथ बहुतेक संतकवींनींच लिहिलेले असल्यामुळें राज्याची उन्नति किंवा अवनति, राजाची कृपा किंवा कोप, इत्यादि ऐहिक गोष्टींचे त्या परमार्थनिमग्न अशा साधुसंतांच्या मनावर फारच थोडे परिणाम होत असले पाहिजेत. खुद्द शिवाजीमहाराजांच्या कारकीर्दीचे दिवस म्हणजे महाराष्ट्राच्या पूर्ण स्वातंत्र्याच्या उदयाचे दिवस आणि त्या वेळचे तुकाराम हे मुख्य कवि ! पण त्यांच्या किंवा पूर्वकालीन इतरांच्या काव्यामधून काय विशेष फरक दिसून येतो ? पेशव्यांचें वैभव म्हणजे पूर्ण स्वराज्याचें वैभव ! पण त्या अवधींत तरी, कांहीं

थोडेसे पोवाडे वगळले असता मराठी ग्रंथरचनेवर काय मोठासा परिणाम झालेला आहे? परमेश्वर हा त्रैलोक्याचा राजा, आणि मुक्ति हें परम स्वातंत्र्य, अशीच ज्याची त्रिकालाबाधित भावना, त्याच्या काव्यरचनेवर पाश्चिमात्य लोकांप्रमाणे 'राजा कालस्य कारणम्' या क्षणिक तत्त्वाचा काय परिणाम होणार आहे?

परंतु मराठी ग्रंथाचें हें जुनें वेदांती वळण हल्ली मात्र खास सुटलें आहे. पूर्वी शिवाजीच्यासारखीं स्वराज्यें उत्पन्न झालीं होतीं, तरी आमचे कवि रामराज्याचींच वर्णनें गात होते, आणि पानिपतसारखे भयंकर राष्ट्रविघातक रणसंग्राम त्यांच्या डोळ्यांदेखत घडून येत असताहि ते महाभारतांतील कौरवपांडवांच्या युद्धाचींच यमकें जुळवीत बसले होते. आपलें स्वराज्य आणि स्वातंत्र्य, ज्याच्यासाठींच कवींनी मुख्यत्वेंकरून आपलीं काव्यें गावीं आणि सर्व देशांतील कवि गात आले, तें आपलें स्वराज्य आणि स्वातंत्र्य जाणार-जात चाललें,–गेलें,–तरी त्याची आपल्या कवींपैकीं कोणी दाद घेतली नाहीं! देशांतील कांहीं वीर पुरुष १८५७ सालापर्यंत आपल्या स्वातंत्र्याकरितां शेवटची धडपड करीत होते, पण त्यांचीहि वर्दी आपल्या कवींपैकीं कोणच्याहि कानावर कधीं गेली नाहीं! पण १८५८नंतर आपल्या इकडे नवीन शिक्षणाला सुरवात झाली, नवीन युनिव्हर्सिट्या निघाल्या; नवीन पदवीधर बाहेर पडले, आणि त्यांना नवीन राष्ट्रीय दृष्टि उत्पन्न झाली! आपलें स्वराज्य गेलें आहे, आणि तें आपल्याला परत मिळालें पाहिजे, ही जागृति त्यांनी लोकांत निर्माण केली. पडलेला काळोख त्यांनी घालविला. लागलेली झोंप त्यांनी दवडली; आणि मिटलेले डोळे त्यांनी उघडविले, आणि तेव्हांपासून आपल्या मराठी वाङ्मयाचें नवीन युग सुरू झालें आहे. हेंच आपलें 'ऑगस्टन् एज' होय. हीच आपल्या मराठी भाषेंतील खरीखुरी उत्क्रांति होय. आणि हीच आपल्या मराठी भाषेच्या वाङ्मयांतील 'एलिझाबेथन् पीरिअड' होय. दुसऱ्या देशांना स्वराज्य मिळाल्यानें त्यांच्या वाङ्मयामधें क्रांति झालेली आहे. पण आमच्या देशांतील स्वराज्य गेल्यामुळें तें परत मिळविण्याकरितां आमच्या वाङ्मयामधें हल्लीची हा क्रांति घडून आलेली आहे. 'राजा कालस्य कारणम्' हें तत्त्व पूर्वीच्या आमच्या वाङ्मयाला लागू पडत नव्हतें. पण

हल्ली त्याचा अंमल आमच्या वाङ्मयातील प्रत्येक ओळीवर आणि त्या ओळींतील प्रत्येक अक्षरावर होत आहे! आणि अशा रीतीने उच-बळलेल्या राष्ट्रीय भावनाच्या दिवसात भावनाप्रधान कवींच्या भावगीतातील आणि नाट्यगीतातील सुंदर लता आणि त्याच्यावरील फुललेलीं कोमल फुलें, आकाशात उडणारीं फुलपाखरे आणि झाडावर बसून आलाप घेणाऱ्या कोकिळा, सतारवाल्याच्या हातातील सतारी आणि तुतारीवाल्याच्या तोंडातील तुताऱ्या, ही सगळीं हल्ली 'स्वातंत्र्य!' 'स्वातंत्र्य!' म्हणून एकमुखाने चारी दिशानी एकच गर्जना करीत आहेत!

## साहित्यसंमेलनांचीं कर्तव्यें

अशा रीतीने आपण आतापर्यंतच्या ग्रंथसंपत्तीचें निरीक्षण केले असून त्याच्यावरून आपल्या भावि वाङ्मयाला आपल्या हल्लीच्या अपेक्षेप्रमाणे कोणते वळण लाविलें पाहिजे, त्यात काय सुधारणा केल्या पाहिजेत, आणि त्याची जास्त भरभराट कशा रीतीने होईल, याचा आपण यापुढे विचार केला पाहिजे. आणि येथेच आपल्या साहित्यसंमेलनाचे खरे कार्य-क्षेत्र सुरू होते. आपल्या कर्तव्याची आपल्याला योग्य कल्पना येण्याला तुलनेसारखे दुसरे उत्कृष्ट साधन नाही. साऱ्या हिंदुस्थानात एकदर सुमारे सत्तर भाषा असून आपली मराठी भाषा ही त्यापैकी एक आहे. पण आपल्या भाषेच्या उत्कर्षाच्या दृष्टीने आपल्याला इतर भाषाशीं फारसें काही कर्तव्य नसून हिंदी, बंगाली, गुजराथी, या भाषाशीं तुलना करून आपली प्रगति आपल्याला अजमावून पाहावयाची आहे. हिंदुस्थानची एकंदर लोकसंख्या सुमारें ३२ कोटि आहे. त्यापैकी भाषावार लोकसंख्येचे आकडे लक्षात घेतले असता असें दिसून येतें कीं, हिंदी भाषा बोलणाराची संख्या ९ कोटि आहे, बंगाली भाषा बोल-णाराची संख्या ४ कोटि आहे आणि गुजराथी भाषा बोलणाराची संख्या सुमारे १ कोटि असून, मराठी भाषा बोलणाराची संख्या १ कोटि ८० लक्ष, किंवा नवीन वाढणारी लोकसंख्या लक्षात घेता जवळ जवळ २ कोटि आहे, असें म्हणण्यास हरकत नाही. यापैकी हिंदी आणि बंगाली याची लोकसंख्या पुष्कळ आहे, आणि त्या मानाने त्याची ग्रंथसंख्याहि पुष्कळ असली, तर त्यात काही आश्चर्य आहे, असें नाही. पण गुजराथी आणि मराठी

याची संख्या जवळ जवळ असल्यामुळे त्याच्यातील ग्रंथसंख्येचे प्रमाण कसें पडते, हा एक तुलना करून पाहण्यासारखा प्रश्न आहे. व त्याकरिता आपल्याला हे वरील साऱ्या हिंदुस्थानचे आकडे सोडून मुंबई इलाख्यातील आकड्याकडे वळणे जरूर आहे. मुंबई इलाख्यातील मराठी बोलणारांची संख्या सुमारें १ कोटि असून गुजराथी भाषा बोलणारांची संख्या पाऊण कोटि आहे. पण असे असूनहि १९११ पासून १९२० पर्यंतच्या दहा वर्षांतील गुजराथी आणि मराठी पुस्तकांच्या संख्येकडे पाहिले, तर आपल्याला असे आढळून येते की, या दहा वर्षांतील प्रसिद्ध झालेल्या गुजराथी पुस्तकांची संख्या ५४५७ असून मराठी पुस्तकांची संख्या ४१२६, म्हणजे १३३१ ने कमी आहे यावरून वाङ्मयनिर्मितीच्या बाबतींत आपण कसे पाठीमागे आहों, हे लक्षात येण्यासारखे आहे. आपले मराठी वाङ्मय पुष्कळ आहे, चांगले आहे, व ते झपाट्याने वाढतहि आहे, असें आपण आपल्या भाषेच्या संमेलनातून बोलत असतो, हे ठीक आहे पण वरील आकड्यावरून दिसून येणारी तुलनात्मक वस्तुस्थिति पाहिली तर आपले वाङ्मय हल्लीच्या पेक्षाहि जास्त झपाट्याने वाढविलें गेले पाहिजे, याची आवश्यकता आपल्या लक्षात येईल व त्याप्रमाणे ते हल्ली हळूहळू वाढतहि आहे, ही मोठ्या समाधानाची गोष्ट आहे. गेल्या इ० सन १९२८ च्या १ जानेवारीपासून तों ३१ डिसेंबरपर्यंत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांचा मुंबई इलाख्याचा जो सरकारी कॅटलॉग बाहेर पडला आहे, त्यावरून पाहता गेल्या सालात हिंदी पुस्तके ९१, इंग्रजी २३९, गुजराथी ५०६ आणि मराठी ६७६, अशा प्रकारचे पुस्तकांचे आकडे देण्यात आलेले आहेत.

## चांगले वाङ्मय

आपलें वाङ्मय पुष्कळ तर झालेंच पाहिजे, पण त्याच्याचबरोबर तें चांगलेंहि झाले पाहिजे. आणि तें वाङ्मय चांगले कसे होईल, याच्या-बद्दलच्या उपायाचे संशोधन आणि संसूचन हल्लीच्यासारख्या साहित्यसभा-तून झाले पाहिजे. अलीकडच्या काही साहित्यसंमेलनाच्या ठरावाचें पृथक्करण करून पाहिले, तर सरकारने आणि युनिव्हर्सिट्यानी अमुक अमुक करावे, अशा प्रकारच्या सूचनांच्या ठरावांची संख्या बरीच वाढली आहे. कित्येक

विद्यापीठातून हल्ली मराठीचा थोडाबहुत प्रवेश झालेला असल्यामुळे तो जास्त व्हावा, अशी सरकारला विनति करण्याचा मोह साहित्यसमेलनाना अनावर होणे, हे अगदी स्वाभाविकच आहे, व अशा विनत्या करून मराठी भाषेचा प्रसार घडवून आणणे अवश्यहि आहे. तरी पण कॉंग्रेसमधे काय, किंवा साहित्यसमेलनातून काय, एकदरीत सरकारकडे विनत्या करीत बसण्याची ही पद्धत फारशी प्रशसनीय नाही आपल्या मराठी भाषेमधे चागलें वाङ्मय निर्माण करणें ही आपल्या हातातील गोष्ट आहे. तें आपलें कर्तव्य आपण केले असता त्या चागल्या मराठी वाङ्मयातील चागली पुस्तके सरकारने आपल्या शिक्षणक्रमातून आणि विद्यापीठातून नेमलीं नाहीत, तर सरकारच्या या आधळेपणाबद्दल लोकमत सरकारला दोषी ठरविल्यावाचून केंव्हाहि राहणार नाही.

आणखी एक प्रकारचा सरकारकडे विनती करण्याचा ठराव बहुतेक समेलनातून पसार करण्याचा प्रघात पडलेला आहे, तो ठराव म्हटला म्हणजे,

## सरकारजमा पुस्तके

या विषयाबद्दलचा होय. सरकारी अधिकाऱ्याच्या विरुद्ध नेहमी तक्रार करण्याला काही तरी विषय पाहिजे, या दृष्टीनें चिरचिर करीत बसण्याला हे ठराव अत्यत उपयुक्त असतात, यात सशय नाही पण सरकारने काही पुस्तके जप्त केलीं, म्हणून आपल्या ओजस्वी वाङ्मयाचे काय वाकडें झाले आहे? आपल्या भाषेतील एका म्हणीप्रमाणे काही मूर्ख माश्यानी समुद्रातील मोती गळ्यावर घालण्याच्या ऐवजी गळ्याखाली घातलीं असलीं, म्हणून त्याच्या योगाने जगातील सपत्ति थोडीच कमी झाली आहे! कित्येक सशयग्रस्त अधिकारी रानातील एखाद्या अविचारी वणव्याप्रमाणे आपल्या पुढील वाङ्मयाचे उभे पीक जाळून खाक करीत असतात. 'पण त्या राजधानींतील अधिकाऱ्याला आणि त्या रानातील वणव्याला हे ईश्वरी तत्त्व कोठे समजत असते की, आपण जी जागा जाळूनपोळून टाकीत असतों, त्या ठिकाणीं पुढे नवीन पीक दुप्पट जोराने उगवते!

अभोजिनीवनविलासनिवासमेव
हंसस्य हन्तु नितरा कुपितो विधाता।

न त्वस्य दुग्धजलभेदविधौ प्रसिद्धा
वैदग्ध्यशक्तिमपहर्तुमसौ समर्थः ॥

या श्लोकात म्हटल्याप्रमाणे कित्येक अधिकारी बाहेर पडलेली स्वदेशाभिमानाचीं पुस्तकें जप्त करू शकतील. पण त्या ग्रंथकाराच्या डोक्यात जो स्वदेशाभिमान परमेश्वराने भरून ठेविलेला आहे, तो अशा प्रकारचा आहे कीं, तो कोणाहि अधिकाऱ्याला जप्त करता येणार नाही! मुद्राराक्षस नाटकात आर्यचाणक्याने म्हटलें आहे कीं, सगळ्या सेना फितुर होऊन शत्रूकडे गेल्या, तरी हरकत नाही, पण

एका केवलमर्थसाधनविधौ सेनाशतेभ्योऽधिका
× × × × बुद्धिस्तु मा गान्मम ।

त्याप्रमाणे सरकारने सर्व काही जप्त करून नेले, तरी जोपर्यंत स्वदेशाभिमानी ग्रंथकाराच्या डोक्यामधे त्याची बुद्धि कायम आहे, तोपर्यंत आपल्या भाषेला स्वदेशाभिमानमूलक अशा उत्कृष्ट वाङ्मयाची कधीहि उणीव पडणे शक्य नाही. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या सद्य.स्थितीवरील निबंधाला किंवा विनायकराव सावरकर याच्या मॅझिनीच्या चारित्राला सरकारने बंदी केली, म्हणून कोणाचे काय अडले आहे? त्याच्यापेक्षा शंभरपटीनी तीव्र अशीं कॉम्युनिझमपर्यंत मजल मारणारीं पुस्तकें आज देशामधे उत्पन्न झालेलीं नाहींत काय?

## शक्ति आणि शिक्षण

तेव्हा असल्या सरकारकडे विनत्या करावयाच्या बाह्यागभूत आणि औपचारिक ठरावाकडे जुजबी आणि जरूरीपुरतेंच लक्ष देऊन बाकीचा सर्व वेळ महाराष्ट्र साहित्यातील अंतरंगभूत आणि आवश्यक अशा विषयाच्या विवेचनामधेच आपण खर्च करणे आपल्या हिताचे आहे. चांगलें वाङ्मय आपण कसे निर्माण करू शकू, असल्या विषयाच्या चर्चेकडेच मुख्यत्वेंकरून आपल्या साहित्यसमेलनानी लक्ष पुरविले पाहिजे. या बाबतीत काव्यप्रकाशकारानी

शक्तिर्निपुणता लोकशास्त्रकाव्याद्यवेक्षणात्
काव्यज्ञशिक्षयाभ्यास इति हेतुस्तदुद्भवे ॥

या श्लोकामधे ज्या मूलभूत गोष्टी सांगितल्या आहेत, त्या आपण

लक्षात ठेविल्या पाहिजेत. वरील श्लोकात शक्ति याचा अर्थ प्रतिभा असा आहे व बाकीच्या गोष्टी शिक्षण या सदराखाली येतात. साराश, प्रतिभा-रूपी शक्ति आणि व्यापक स्वरूपाचे शिक्षण या दोन गोष्टी उत्कृष्ट ग्रथ-रचनेला आवश्यक आहेत. यापैकी पहिली ईश्वरदत्त असते व दुसरें शिक्षण हे मनुष्याला प्रयत्नाने सपादन करता येते. यापैकी नुसत्या प्रतिभेने एक-वेळ कदाचित् चागली ग्रंथरचना होईल, पण नुसत्या शिक्षणाच्या जोराने प्रतिभेवर बलात्कार करण्यात कोणतेहि स्वारस्य नाही व तसें केलें असता कोणत्या प्रकारचीं अपत्ये निर्माण होतील, याचा नमुना अलीकडल्या कित्येक काव्यामधे पाहावयाला सापडण्यासारखा आहे. तेव्हा शक्ति आणि शिक्षण याचा समागम हाच स्पृहणीय होय पण कित्येक प्रसगी शिक्षणाची जोड मिळविल्यावाचून एकटीच प्रतिभा जेव्हा उतावीळपणाने धावत सुटते तेव्हा दोनचाकी गाडीपैकी एकचाक मोडलेल्या गाडीसारखी तिची अवस्था झालेली पाहून खेद वाटण्याचे कित्येक वेळा प्रसग येतात. 'काव्यज्ञशिक्षयाभ्यास.' ही काव्यप्रकाशाच्या वरील पक्तीमधे जी एक गोष्ट सागितलेली आहे, तिच्याकडेहि लक्ष पुरविणें अवश्य आहे 'अरुण' या नावाचे एक मासिक पुस्तक प्रसिद्ध होत असतें. त्याचे सपादक, श्रीयुत एम् जी. रागणेकर, यानी निरनिराळ्या लेखकाकडे आणि कवीं-कडे 'मी आणि माझे लेखन' अशा मथळ्याची एक बारा प्रश्नाची प्रश्न-पत्रिका अलीकडे पाठविली असून त्याचीं काही उत्तरेंहि त्यानी आपल्या मासिक पुस्तकात प्रसिद्ध केलीं आहेत तीं उत्तरें या विषयाच्या दृष्टीने खरोखरच फार मननीय आहेत. त्याचप्रमाणे निरनिराळ्या लेखकाचीं चरित्रेंहि या कामीं उपयोगी पडण्यासारखीं आहेत. चागल्या कवींनी किती परिश्रम केलेले असतात, त्याना चागल्या कल्पनाचीं स्फूर्ति होण्याचे कसे प्रसग प्राप्त होतात. वगैरे विषयाचें अध्ययन केल्यास जीभ उचलून टाळ्याला लावल्याबरोबर झाले काव्य निर्माण, या अलीकडच्या कित्येक उदाहरणातील प्रवृत्तीला पुष्कळ आळा बसेल. चागल्या ग्रथरचनेला शिक्षण हें सर्व प्रकारानी चागलेंच असले पाहिजे. पण त्यातल्या त्यात व्याकरण, न्याय आणि अलकार, या शास्त्राची जोड असणें विशेषच जरूर आहे. व्याकरणशास्त्राने शब्द सुदर होतील; न्यायशास्त्राने विचार सुदर

त्यामुळे सरकार केव्हा केव्हा अगदी पगू बनून जातें. तथापि सरकारचा फार नसला तरी थोडातरी दोष आहेच. लोकांच्या धर्मसमजुतींत हात घालावयाचा नाही, हें सरकारचें धोरण जरी फार इष्ट आणि अवश्य आहे, तरी प्रजेपैकी काही वर्गांच्या धर्मसमजुती, सार्वजानिक शातता, वगैरे सबबींवरून एकाद्या वर्गांच्या उपजत हक्काची पायमल्ली होते तेव्हा सरकारने तिकडे काणाडोळा करणे म्हणजे आपल्या प्रजापालनाच्या कर्तव्यास अशतः तरी चुकणेंच होय. वऱ्हाडप्रातात अंत्यज मुलास शाळातून इतराबरोबर बसविण्यात येतें, इतकेंच नव्हे, तर सरकारी नोकरींतहि ह्या जातींपैकी थोड्याचा शिरकाव झाला आहे, ही गोष्ट खरी आहे, आणि ती तेथील सरकारी अमलदार आणि उच्च वर्ग ह्या दोघानाहि भूषणावह आहे. तथापि इतर प्रातात मोठमोठ्या शहरातूनहि याच्या अगदी उलट प्रकार राजरोस चालू आहेत! सरकारच्या तगाद्यामुळे म्युनिसिपालट्यानी मोठमोठ्या गावीं अत्यजासाठी वेगळ्या शाळा काढिल्या आहेत, पण अत्यज शाळाकरिता चागले हुशार मास्तर नेमण्यासंबधी म्युनिसिपल बोर्डाकडून फारच थोडी काळजी घेण्यात येते एकादी धर्मार्थ शाळा उघडली कीं आपलें कर्तव्य आटोपले, असे बोर्डास वाटते शाळा कोठे तरी दूर कोपऱ्यात असावयाची, तेथे एक अर्धवट शिकलेला मुसलमान मास्तर ठेवावयाचा, आणि असा जुलमाचा रामराम करून वेगळें व्हावयाचें!

सरकारी नोकरीसबंधींहि या लोकावरचा बहिष्कार वऱ्हाड प्राताबाहेर जशाचा तसाच आहे. मागे लष्करखात्यात या लोकाची चागली बढती होत असल्यामुळे याच्यात काही चागली पेन्शनर मडळी अद्याप आढळते, पण १८९२ सालापासून ह्या बाबतींतहि काही अकल्पित धाड आल्यामुळे ह्याची पिच्छेहाट होत आहे. ह्या नोकरीच्या बाबतीत आपलेच लोक आपल्या ह्या दीन देशबाधवास कसे खाली रगडीत आहेत, हें खालील गोष्टीवरून कळण्यासारखे आहे.

मगळूर येथे तेथील ब्राह्मसमाजाच्या सेक्रेटरीने पचम लोकाकरिता एक शाळा काढिली आहे. त्या शाळेंत शिकून तयार झालेल्या विद्यार्थ्यांना कोठें तरी चागली नोकरी मिळवून देण्याकरिता हे गृहस्थ

फार झटत असतात. त्याच्याकडून आलेल्या एका खासगी पत्रात पुढील मजकूर आहे:—

" मी किती खटपट केली तरी एकाहि विद्यार्थ्यास नोकरी मिळवून देता आली नाही ! शेवटी एका भल्या युरोपियन डिस्ट्रिक्ट जज्जानी पुढे जी चपराशाची जागा रिकामी होईल ती पचमास द्यावी, असा ठराव केला. जागा रिकामी होऊन एका पचमाचा अर्ज गेल्याबरोबर त्या सर्व खात्यातील सुमारें १०९ शिपाई मिळून जज्जसाहेबाच्या बगल्यावर जाऊन आडवे पडले आणि मेहेरबानानी पचमाला नोकरीवर घेऊन आपल्यास हिणवू नये, अशी मागणी इतक्या नेटाने केली, कीं शेवटी मेहेरबानास ती मान्य करावीच लागली ! "

ह्या बाबतींत जो अन्याय घडला तो स्वदेशी कीं परदेशी, ह्याचा निर्णय वाचकानीच करावा ! मुळी अन्यायच घडला नाही असा निर्णय करणारे वाचक भेटल्यास लेखकाचे नशीब म्हणावयाचे ! !

बहिष्काराचे ह्यापेक्षाहि खडतर मासले नित्य आपल्या डोळयासमोर आहेत आणि त्रावणकोरसारख्या अगदी सुधारलेल्या सस्थानात देखील ह्या लोकाची जी अपेष्टा चाललेली सर्वांच्या ऐकण्यात येते, तीवरून आधुनिक सुधारणेच्या मानाने आमचे पाऊल ह्या बहिष्काराच्या बाबतींत अद्यापि फारच मागे आहे, असे कष्टाने कबूल करावे लागतें

## खिस्ती पथ

व्यवहारात धर्माच्या नावाने जितक्या चुका झाल्या आहेत व होत आहेत तितक्या कशानेच झाल्या नसतील ! केवळ व्यवहारातच नव्हे, तर भाषेतहि तितक्याच चुका होतात. खरे पाहू जाता धर्म एकच आहे आणि हिंदु, मुसलमानी, खिस्ती इत्यादि केवळ त्याचे पथ होत. असे असता हे सर्व पथ निरनिराळे धर्मच मानण्यात आल्यामुळे त्या परस्परातील तेढी अत्यत तीव्र झालेली आहे. मनुष्यप्राण्याला स्वभावसिद्ध असलेली ही धर्मवृत्ति ह्या सर्वच पथात निरानिराळया रूपाने व कमीअधिक शुद्ध स्थितींत प्रगट होत आहे. ही धर्मवृत्तीच काय ती शाश्वत आणि हे सर्व पथ देशकालमानाप्रमाणे बदलत जाणारे आहेत, हें इतिहासावरून उघड दिसत असताहि खिस्त्याना असें वाटतें की, खिस्ती धर्मच काय तो सार्वत्रिक

धर्म Universal Religion आणि हिंदूनी तर आपल्या धर्माला 'सनातन' हें नाव कधीच दिलेलें आहे !

धर्म आणि त्याचे पथ याविषयीं वरील शुद्ध आणि निरपेक्ष सत्य ध्यानात ठेवून ख्रिस्तीपथानें प्रस्तुत विषयासंबंधी जी कामगिरी बजाविली आहे, तिचा थोडक्यात कृतज्ञपणानें पण निर्भीडपणें विचार करू या. हे आमचे विचार ख्रिस्ती, हिंदु, ख्रिस्ती झालेले किंवा हिंदूच राहिलेले अस्पृश्यवर्ग ह्यापैकी पुष्कळाना पटणार नाहीत, हे आम्ही जाणून आहों, पण त्याला इलाज नाही. हिंदुपथानें हीन समजून टाकून दिलेल्या ह्या जातीचा ख्रिस्ती पथानें जो आजवर परामर्श घेतला आहे व त्याची अशतः तरी उन्नति केली आहे, त्याबद्दल ह्या पथाचे जितके धन्यवाद गावे तितके थोडेच आहेत. या बाबतीत ख्रिस्ती मिशनरी केवळ परोपकारबुद्धीनें काम न करिता ह्या गरीब लोकाना आपल्या कळपात ओढण्याचा त्याचा कावा असतो, असा जो काहीजणाचा आक्षेप असतो, त्यातहि विशेष अर्थ नाही. ख्रिस्तीमंडळीला जर आपला पथ चागला वाटतो, तर त्यात दुसऱ्यानी यावें असा त्यानी प्रयत्न करणे हेंच त्याच्या ख्रिस्तीपणाला शोभतें. उलट, ज्या हिंदूना ह्या गरीब जाती आपल्या धर्मात राहिल्या काय, अथवा गेल्या काय सारख्याच वाटतात, आणि ह्या लोकानी हिंदुधर्मात असेतोंपर्यंत मात्र दूर राहावे आणि ख्रिस्ती होऊन पोषाख बदलून जवळ आल्यास हरकत नाही, असें वाटतें, त्याच्या उदासीनपणाला व विसंगतपणाला दुसऱ्या कशाचीहि उपमा दिसत नाही !

पण मुख्य प्रश्न बाजूलाच राहिला आहे. तो हा कीं, जवळ जवळ ७ कोटी प्रजेनें अशा हीन स्थितींत राहून चालेल काय ? हिंदुपथ तर आपला सोवळेपणा सोडावयाला तयार नाही आणि तो सोवळेपणा कायम आहे तोंपर्यंत या जातीला पुढे सरकावयाला जागा नाही. तर मग हें व्हावें कसें ? इतक्या सगळ्यानी एकदम ख्रिस्ती व्हावें ? यक्षिणीची काडी फिरवून इतक्या लोकसमुदायाला कोणी एकदम ख्रिस्ती करील म्हणावें तर तेंहि संभवनीय नाही. तथापि हिंदु लोकाची उदासीनता व विसंगतता शाश्वत राहिली, तर मात्र वरील चमत्कारहि घडण्याचा संभव आहे. असा प्रकार खरोखरीच घडून आला, तर राष्ट्रीयदृष्ट्या काय प्रकार होईल तो

पाहा. हल्ली भारतीय साम्राज्यात खालीलप्रमाणे लोकसंख्या आहे:—

( इतर १८ + हीन ७ मिळून ) २५ कोटी हिंदु.

( इतर ७+ हीन १ मिळून ) ८ कोटी मुसलमान.

५० लक्ष ख्रिस्ती.

१ कोटी जंगली.

१ कोटी बुद्ध, जैन, शीख वगैरे,

हिंदुपंथाची उदासीनता आणि ख्रिस्तीपंथाची चळवळ आताप्रमाणेच कायम राहील तर पुढे खाली दिल्याप्रमाणेच गणना होण्याचा संभव आहे:—

१८ कोटी हिंदु. ८ कोटी मुसलमान.

८ कोटी ख्रिस्ती. १ कोटी बुद्ध, जैन, शीख वगैरे

म्हणजे राष्ट्रीयदृष्ट्या आता जी हिंदुमुसलमानांची दुही आहे तिच्याऐवजी वरील प्रकार घडलाच तर हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती यांचा तिरपगडा होणार! १८ कोटी मवाळ हिंदु आणि जवळजवळ तितकेच कडवे मुसलमान आणि ख्रिस्ती मिळून! या तिघांचे सूत कसे जमणार ईश्वर जाणे!

यावर काही ख्रिस्ती मंडळींचे म्हणणे असे पडते कीं, ७ कोटी हीन दशेतल्या महारमांगांचें व त्यांना दूर दूर ठेवणाऱ्या १८ कोटी इतर हिंदूंचे आता तरी कोठे सूत जमत आहे? हे ७ कोटी महारमांग ख्रिस्ती होऊन सुशिक्षित आणि सुखवस्तु झाल्याने राष्ट्राचे पाऊल मागे पडण्यापेक्षा पुढेच पडणार नाही कशावरून? इतके लोक ख्रिस्ती झाल्यावर ते ह्या देशातले कायमचे राहणारे असल्याने इतर हिंदूंशीं ते राष्ट्रीय बाबतीत विरोधानेच वागतील कशावरून? दुसऱ्या पक्षी, काही जुन्या मताच्या आणि तटस्थ वृत्तीच्या हिंदु मंडळींचे असे म्हणणे पडते की, वरिष्ठ हिंदु कितीहि उदासीन राहिले तरी हीन मानलेले लोक कालांतराने आपली आपणच सुधारणा करून घेऊन हिंदु धर्मांतर्गत एक वेगळी जात बनवून सुखाने राहणार नाहीत कशावरून? मग त्यांच्या उद्धारासाठी आजच एवढा खटाटोप कशाला हवा आहे?

हिंदूंचा उदासीनपणा कायम धरून चार प्रकारचे परिणाम संभवतात — (१) हे ७ कोटी लोक अशाच स्थितींत राहतील, किंवा (२) आपणच आपला उद्धार करून नवी जात बनवितील; किंवा (३) ख्रिस्ती होऊन

हिंदूंशीं विरोधाने वागतील, किंवा (४) धर्म बदलला तरी राष्ट्रीय बाबतींत सलोख्याने वागतील. पण हे चारी प्रकार हिंदुस्थानातील कोणाहि बाणेदार प्रगमनशील हिंदूला समाधानकारक वाटणार नाहीत. हिंदुस्थानातील जातिभेद हिंदी राष्ट्राला घातक आहे, हे आता इतके दिवस सामाजिक प्रगतीच्या उलट असलेलीं 'केसरी'सारखी पत्रेंहि कठरवाने सागू लागलीं आहेत ! हिंदूंच्या तटस्थपणाचा आता बहुतेकाना वीट येऊन चुकला आहे. ह्या ७ कोटी प्राण्याचा उद्धार होऊन हे भावि हिंदी समाजात व हिंदी साम्राज्यात एकजीव होऊन जावे, अशी सर्वांची अतःकरणपूर्वक इच्छा आहे. पण ही सजीविनी देणारा द्रोणागिरी कोणी उचलून आणावा, हाच प्रश्न आहे. हिंदु, ख्रिस्ती, मुसलमान इत्यादि पथाचे जुनाट आणि जाड कवच फोडून धर्म-प्रवृत्तीचा नवीनच एक जोमदार अकुर बाहेर आला पाहिजे. धर्मसचारा-शिवाय केवळ स्वार्थी आणि हिशेबी प्रवृत्तीच्या जोरावर हें काम होण्या-सारखे नाही. आणि जरी धर्माची प्रेरणा झाली तरी ती पथाची जाड भिंत फोडण्याइतकी बळकट नसेल, तर ती आतल्याआतच विरून जाण्याचा सभव आहे. ही भित फोडून काही नवीन अंकुर ब्राह्मसमाज, प्रार्थनासमाज, आर्यसमाज ह्यांच्या रूपाने ह्या देशात वर येऊ लागले आहेत. हिंदु धर्माला सजीविनी देणारा द्रोणागिरी पर्वत महात्मा गाधीला उचलून धरता येईल काय, इकडे सर्व जगाचे लक्ष्य वेधले आहे.

---

# महाराष्ट्र ब्राह्मणांची लष्करी परंपरा

हिंदुस्थानातील लष्कराचें हिंदीकरण कसे करता येईल व हिंदी लोकाना लष्करातील वरिष्ठ अधिकाऱ्याच्या जागाकरिता तयार करण्याचा योग्य मार्ग कोणता, या प्रश्नाचा विचार अजून चालूच आहे. मागे स्कीन कमिटीने काही लष्करी तज्ञाच्या व इतर हिंदी पुढाऱ्याच्या साक्षी घेतल्या! त्या वेळीं हिंदुस्थानातील लोकाचे लष्करी जाती व बिनलष्करी जाती अशा दोन विभागात काही तज्ञानी वर्गीकरण केले. हिंदुस्थानातील जातिभेदात हा एक नवीनच जातिभेद डोकावला. पठाणी, बलुची, शीख, रजपूत, गुरखे, परदेशी व मराठे ह्या लष्करी जाती, व महाराष्ट्र, मद्रासी आणि बगाली ब्राह्मण ह्या बिनलष्करी जाती, असे हे नवें वर्गीकरण करण्यात आले. फौजेत भरती करताना लष्करी जातींतूनच उमेदवाराची भरती करण्यात यावी, म्हणजे उमेदवार लवकर तयार होऊन लष्करी अधिकारी बनण्यास पात्र होतील असे मत ह्या तज्ञानी प्रतिपादिले ब्राह्मणाबरोबरच ब्राह्मणासारख्या पुढारलेल्या कायस्थ, नायर वगैरे जाती व अस्पृश्य यानाहि बिनलष्करी लोकात ढकलण्यात आले. ह्या बिनलष्करी लोकाना कितीहि शिक्षण देऊन तरबेज केले तरी युद्धाचा प्रसग येताच याचें अवसान सुटेल व आपली फौज याना साभाळता येणार नाही, कारण, लष्करीपरपरा व लष्करी बाणा याच्या रक्तात भिनलेला नसतो, अशी मल्लिनाथी ह्या तज्ञानी लढविली. उलटपक्षीं, डॉक्टर पराजपे वगैरे उदार मताच्या मुत्सद्द्यानी असे प्रतिपादन केलें कीं, योग्य तें शिक्षण दिले आणि काम करण्याची सधि दिली म्हणजे वाटेल त्या जातींतील तरुण उत्तम लष्करी अधिकारी होतील. लष्करी व बिनलष्करी जाती हें वर्गीकरण मुळातच चुकीचे व तर्कबाह्य आहे. डॉक्टर पराजपे याचें मत अत्यत सयुक्तिक आहे ह्यात शकाच नाही. परतु बऱ्याच लष्करी अधिकाऱ्याचा कल लष्करी म्हणून गणल्या गेलेल्या जातींना बहुमान देऊन त्याच्यातूनच बनेल तोंपर्यंत नवे लष्करी उमेदवार निवडण्याकडे दिसला! त्याला मुख्य कारण म्हटले म्हणजे या विचित्र जातिभेदाच्या समजुतीवर व आधारावरच आजपर्यंत ब्रिटिश अंमलाखाली हिंदी फौजेत भरती होत आली, व चालत आलेलीं मते, आणि पद्धति याना शक्य तोंवर चिकटून राहण्याचा

मनुष्यस्वभाव असतो,व लष्करी इंग्रज अधिकाऱ्यानी फौजेचा युनिफॉर्म चढविला तरी त्यांचे मनुष्यत्व लोपते अशातला भाग नाही. शिवाजीमहाराजाच्या अमदानींतच नव्हे तर खुद्द ब्राह्मण पेशव्याच्या लष्करात महाराची पलटण सामील असे, व इतराबरोबरच त्याचाहि दर्जा राखला जात असे. महाराची छावणी फौजेच्या मध्यभागी नसावी अशी काही उच्च वर्णीय सरदारानी तक्रार केल्यावर, रणांगणातील दर्जा जातीवर अवलंबून नसून पराक्रमावर असतो, असें चोख उत्तर रावसाहेब माधवराव पेशव्यानी दिले व महाराची छावणी हालविण्याचे नाकारले ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. परंतु इंग्रजी अमलात महाराची स्वतंत्र पलटण उभारण्यात आली नाही. महायुद्धाची आग लागली तेव्हा एक तात्पुरती पलटण उभारण्यात आली होती, परंतु महायुद्ध संपताच 'गरज सरो अन् वैद्य मरो' या म्हणीप्रमाणे तिला रजा देण्यात आली. जातिभेद व अस्पृश्यता न मानणाऱ्या इंग्रजी अधिकाऱ्यानी अस्पृश्याना आज शेदीडशे वर्षे लष्करात मज्जावच केला. ब्राह्मण पेशव्यानी जे औदार्य दाखविलें तेवढें सुद्धा इंग्रजाना दाखविता आले नाही. इंग्रजानीं केलेल्या या बंदीचे कारण जातिभेद हे अर्थातच नव्हे, परंतु काही जातीतील लोक उत्तम शिपाई होऊ शकणार नाहीत, हा जाणून बुजून उत्पन्न केलेला चुकीचा दुराग्रहच या बंदीच्या मुळाशी होता. त्यामुळे अस्पृश्याबरोबरच महाराष्ट्र ब्राह्मण, प्रभू, नायर, कायस्थ वगैरे उच्चवर्णीय लोकाची देखील इंग्रजाच्या कारकीर्दीत सैन्यात भरती झाली नाही. योग्य शिक्षण व संधि दिली म्हणजे वाटेल तो मनुष्य वाटेल त्या कामगिरीसाठी लायक होऊ शकतो, हा उदार दृष्टीचा व सात्त्विक समतेचा सिद्धान्त बाजूस सारला, तरी देखील सैन्यभरतीच्या कामी इंग्रजाच्या हातून पक्षपातच झाला असे म्हणावे लागेल. कारण लष्करी परंपरेच्या दृष्टीने महाराष्ट्रातील ब्राह्मण, प्रभू वगैरे उच्च वर्णीय लोक, रजपूत, पठाण व शीख याना देखील हार जाणार नाहीत!

इंग्रजानीं हिंदुस्थानचे राज्य मोगल बादशहाच्या हातून घेतले नसून, पेशव्यापासून ते संपादन केले ही गोष्ट कोणीहि नाकबूल करणार नाही. कारण शेवटचा कर्ता मोगल बादशहा शहा अलम हा पेशवाईतील नामांकित व कर्तबगार सुभेदार महादजी शिंदे याच्या हातातील बाहुले बनून राहिला होता. महाराष्ट्रीयाना व त्यातल्यात्यात ब्राह्मणाना आणि

चित्पावन ब्राह्मणाना मोठेपणा देण्याचा प्रसंग न यावा म्हणून, व कदाचित् आवडत्या मुसलमानाना खूष करून हिंदूना तुच्छ लेखण्याच्या राजनीतीमुळे एखाद्या वेळीं ही साधी व सूर्यप्रकाशाइतकी सत्य गोष्ट इंग्रज लोक कबूल करीत नाहीत. मुसलमानाना तर पेशवाईचा इतिहास माहीतच नाही. फार तर पानपत येथें मराठ्याचा आम्ही सपाटून पराभव केला व त्याना नामशेष केले, एवढीच ठाऊक असलेली मराठा इतिहासातील गोष्ट ते कधी कधी घमेंडीने सांगत असतात. पण ह्या मुसलमानी जयाचे श्रेय हिंदुस्थानातील मुसलमानाच्या पदरात मुळीच पडत नाही ही गोष्ट ते सपशेल विसरतात हे श्रेय काबूलकंदाहाराकडून आलेल्या परकीय अहमदशहाच्या वाट्याला जातें हिंदुस्थानातील कांहीं मुसलमानाना आज देखील हिंदुस्थान हा आपला देश वाटत नाही. ही गोष्ट त्याचे अनेक पुढारी उघडपणे बोलून दाखवितात. काबूल, तेहरान, इस्तंबूल इकडील मुसलमानाकडे त्याचा ओढा अधिक व तीच भूमि त्याना हिंदुस्थानापेक्षा अधिक प्रिय वाटत असते. १७६१ साली हीच स्थिति होती हिंदुस्थानातील नेभळ्या व दुबळ्या मुसलमानानी, हिंदुस्थानचा शत्रु व हिंदुस्थानच्या बाहेरील एका देशाच्या स्वतंत्र व पराक्रमी शहाला मदतीला बोलावून, सर्वस्वी त्याच्या साहाय्याने मराठ्याचा पानपत येथे पराभव केला. ह्यात हिंदुस्थानातील मुसलमानानी प्रौढी मारण्यासारखे काय आहे ? आम्ही स्वजातिभक्त परंतु देशद्रोही, धर्मभक्त परंतु परधर्माचे द्वेष्टे व विध्वंसक, आणि नेभळे परंतु परक्याला घरात घालून त्याच्या जोरावर मिशावर हात फिरविणारे, ही द्वाहि काय पुरुषार्थवाचक आहे ? पानपत येथे अहमदशहा अबदाली यास जय मिळाला, परंतु तो आला तसाच परत गेला ! हिंदुस्थानातील मुसलमानाचे बल त्या योगे मुळीच वाढलें नाही. कारण पानपतात कचलेल्या मराठ्यानीच पुढील दहा वर्षात भीमेच्या काठची बटे अटकेस सिंधुनदावर पाणी पिण्यास नेलीं व हिंदुस्थानातील मुसलमानात शूर म्हणून नावाजलेल्या रोहिले लोकाना बेदम मार दिला. पानपतानंतर हिंदुस्थानात मुसलमानी सत्तेचा मागमूस देखील राहिला नाही. मराठ्याच्या ओंजळीने पोटभर पाणी मात्र प्यावयास मोगल बादशहास सापडत असे. मराठ्याचे राज्य जाऊन इंग्रजी आल्यावर बादशहाचा

खुराकहि हळूहळू बद झाला. म्हणजे लष्करी वृत्ति व लष्करी परपरेचा अगदी ताजा अभिमान जर कोणाला सागता येत असेल तर तो महाराष्ट्रीयाना व त्यातल्या त्यात ब्राह्मणानाच सागता येईल. कारण इंग्रजापूर्वी ब्राह्मण पादशाही हिदुस्थानात नादत होती, आणि पुण्याचे ब्राह्मणपेशवे सर्व हिंदुस्थानची सूत्रें हालवीत होते. जर आज कोणाच्या लष्करी पेशावर सर्वांत कमी गज चढला असेल, तर तो महाराष्ट्र ब्राह्मणाच्या! रजपुताना आपला लष्करी पोशाख शोधावयास मागलीं अनेक शतकें उलटवावीं लागतील. परतु खर्ड्याच्या अत्यत यशस्वी लढाईस नुक्तीच कोठे सव्वाशें वर्षे झालीं आहेत.

परतु महाराष्ट्र ब्राह्मण, प्रभू वगैरे उच्च वर्णीय मराठ्यास लष्करात भरती करणें इग्रजाना इष्ट वाटत नाही. कारण ह्या वर्गाना लेखणी व तलवार दोन्हीहि सारख्याच पराक्रमाने वापरता येतात दोहोतहि त्याना सारखेंच यश सपादन करता येते त्यामुळे असा बुद्धिमान् व पराक्रमी वर्ग इंग्रजी लष्करात भरती करण्यायोग्य ठरत नाही, ह्या वर्गाला लष्करात भरती केलें तर तो अधिकाराच्या जागा मागणार, व आपली कर्तबगारी आणि बुद्धिमत्ता दाखविण्याचा प्रयत्न करणार! इग्रज अधिकारी सोडतील ते हुकूम निमूटपणें मान्य करावयाचे व निर्बुद्ध एडक्याप्रमाणे शत्रूशी टक्कर घ्यावयाची, ही यात्रिक क्रिया ह्या वर्गाच्या हातून होणार नाही, ही गोष्ट इग्रज सरकार जाणून आहे व आजपर्यंत तरी लष्करी अधिकाऱ्याच्या सर्व लहानमोठ्या जागा आपण व्यापून टाकावयाच्या व हिंदी लोकाना शिपाई, दफेदार, जमादार, सुभेदार असल्या कनिष्ठ प्रतीच्या जागा द्यावयाच्या ही इग्रजी लष्करी नीति असे. तेव्हा पराक्रमी व धिप्पाड परतु निर्बुद्ध व अराष्ट्रीय वृत्तीच्या पठाण, गुरखे, रजपूत व शीख* लोकाची लष्करात भरती करणें इग्रजाना सोईचे पडे, व शिस्तीच्या दृष्टीने तें योग्यहि ठरे! त्यामुळे बुद्धिमान् वर्गाची लष्करात

* १८५७ च्या बडांत इग्रजाच्या तर्फेने हिंदुमुसलमानाविरुद्ध लढून त्याचा पाडाव करण्याची, ह्या वर्गाची अराष्ट्रीय इग्रजनिष्ठा आज तितकी तीव्र राहिली नाही! त्याच्यातहि आपण हिंदी आहात व हिंदु-मुसलमानापेक्षा इग्रज आपणाला परके आहेत, हीं भावना थोडी फार आजला उत्पन्न झाली आहे.

भरती न करण्याचे धोरण इंग्रजानी आखले. कारण न जाणो, एखाद्या प्रसंगी सारासार विचार करून व विवेक दाखवून ते आपल्याच भाईबंदावर गोळ्या झाडण्यास नाकारावयाचे! असे जर दुर्दैवाने झालें तर इंग्रजी राज्याचा डोलारा येथे कसा टिकून राहणार!

इंग्रज लोक आम्ही हिंदुस्थानचें राज्य तलवारीच्या जोरावर मिळविलें अशी प्रसंगविशेषी प्रौढी मारतात? पण त्या तलवारी इंग्रजाच्या नसून हिंदी लोकांच्या होत्या. हिंदी शिपायांच्या पलटणी उभारून व त्यांच्या-कडून त्यांच्याच भाईबंदावर गोळ्या झाडून व तलवारी चालवून इंग्रजानी येथील राजेरजवाड्याना पादाक्रांत केले व त्यांचे राज्य आपल्या घशात घातले. ह्या गोष्टी निर्बुद्ध व अराष्ट्रीय वृत्तीच्या शिपायाकडूनच घडतील! तेव्हा बुद्धिमान वर्ग कितीहि पराक्रमी असला तरी इंग्रजी लष्कराला तो वावडा होता, व त्यांची लष्करात भरती न करण्याचे त्यांनी ठरविले, ते योग्यच केले परंतु कोणत्याहि पक्षपाताला न्याय, नीति व कायदा यांचा पाठिंबा देऊन जगाच्या बाजारात आपले माथे उजळ राखण्याचा इंग्रजाचा स्वभावधर्म आहे. यामुळेच त्याना इतके यश येऊन त्यांचे साम्राज्य जगभर पसरलें. हे साम्राज्य वाढविताना त्यानी अनेक अन्याय केले व अति क्रूर कृत्यें त्यांच्या हातून घडली परंतु आपल्या कृत्याना न्याय नीति व कायदा यांची सफेती चढवून त्यानी आपले मुख जगात तरी काळे होऊ दिलें नाही त्यामुळे या धडधडीत लष्करी पक्षपाताचे समर्थन करण्याकरिता त्यांनी हिंदी लोकांचे लढाऊ व बिनलढाऊ असे दोन काल्पनिक गट निर्माण केले, व सर्व बुद्धिमान् वर्गाचा बिनलढाऊ जातींत समावेश केला. महाराष्ट्र ब्राह्मण, प्रभू यांची लष्करात भरती का करीत नाही? असा कोणी प्रश्न विचारल्यास, "काय करावें, त्या लढाऊ जाती नाहीत व त्याना लष्करी परंपरा नाही, त्यामुळे त्यांची फौजेत भरती केली तरी त्यांच्या हातून धाडसाचे व पराक्रमाचे कृत्य घडणार नाही, व ऐन प्रसंगी ते कच खातील. त्यामुळे फौजेत त्यांची भरती करता येत नाही. ज्याना लष्करी परंपरा असते तेच उत्तम शिपाई होऊ शकतात." हे इंग्रजाचे न्यायनीति कायदेबाज सफाईचे उत्तर तयारच! इंग्रजाना ही सफाई देण्याची कला इतकी उत्तम साधली आहे कीं त्यामुळे परके लोक फसले तर त्यात नवल नाहीच, परंतु खुद्द आमचे

आम्हालाच कधीमधी असे वाटू लागतें की, आपण महाराष्ट्रीय ब्राह्मण, प्रभू वगैरे उच्चवर्णीय लोक, लष्करी पेशाचे नसून कारकुनी बाण्याचे व वृत्तीचे आहोत ! त्याच्या उत्तराने आमच्या डोळयात इतकी बेमालूम धूळ फेकली गेली की, आम्ही लष्करी पेशाचे नाही, अशी आमच्या सर्व लहानथोर पुढाऱ्याची समजूत झाली असून ते तशी जाहीर कबूलीहि देत असतात ! ज्याप्रमाणे महाराष्ट्र ब्राह्मणाना, त्याचप्रमाणे बुद्धिवान् बगाली लोकानाहि, इग्रजी लष्करात मज्जाव आहे एखादा बगाली 'विश्वास' दक्षिण अमेरिकेतील ब्राझील देशात अतिशय पराक्रम करून कर्नल होऊ शकेल, परतु हिंदुस्थानात मात्र त्याची बिनलढवय्या जातीतच गणना व्हावयाची. उच्चवर्णीय व बुद्धिमान् तरुण चुकून कधीकाळी लष्करात भरती झालेच, तर सुभेदार बापटाप्रमाणे ते पोलिशी साइडिंगवर हळूच ढकलले जातात. या लष्करी मज्जावामुळे आम्ही बिनलष्करी जातीचे व बिनलष्करी परपरेचे आहो, अशी भ्राति आजच्या महाराष्ट्रीय पुढाऱ्याना पडली आहे, व तशी कबूली देऊन 'आमच्या लोकाना ही नवी विद्या शिकण्याची सधि द्या' असे इग्रजाच्या पायाशी विनति-अर्जाचे धरणें घेऊन बसताना त्याना पाहिले, म्हणजे इग्रजी राजनीतीचे समर्थन इग्रज कशा सफाईने करून लोकाच्या डोळयात धूळ टाकतात याचे प्रत्यतर येते

महाराष्ट्र ब्राह्मणाची लष्करी परपरा शोधावयास फार जुना इतिहास चाळण्याची जरूरी नाही त्याप्रीत्यर्थ आर्य द्रविडाच्या किंवा आर्य-अनार्यांच्या अतिप्राचीन लढायाचे वर्णन देण्याचे कारण नाही. महाराष्ट्र ब्राह्मणाची लष्करी परपरा सिद्ध करण्याकरिता रजपुताप्रमाणे महमद गिझनीच्या पूर्वकाळात एकदम नऊशे वर्षांची पिछली उडी मारावी लागत नाही. ही परपरा अगदी अलीकडील आहे व हिंदुस्थानातील सर्व जातींत फक्त शीख व महाराष्ट्रीय याच्याच लष्करी कर्तबगारीला फार काळ लोटला नसल्यामुळे ती तल्लख आहे. त्याकरिता शिला-लेख व ताम्रपट उलथेपालथे करण्याची जरूरी नाही, किंवा हिंदु-स्थानच्या सशयित व प्रायः अज्ञात अशा मध्ययुगीन इतिहासाकडे धाव मारावी लागणार नाही. मुसलमानी सत्तेला जोराचा तडाखा देऊन पुण्यश्लोक श्रीशिवाजीमहाराजानी जे हिंदवी स्वराज्य स्थापन केलें, त्यात

सर्व महाराष्ट्रीयांचे पुण्य खर्ची पडले आहे. या स्वराज्याच्या व स्वधर्माच्या शिपायात सर्व जातींचे महाराष्ट्रीय सामील होते छत्रपतींच्या स्वराज्य व स्वधर्मसेवकात मराठे होते, प्रभू होते व ब्राह्मणहि होते. महाराष्ट्रातील अमकी जात या धर्मयुद्धात सामील नव्हती असे म्हणता येणार नाही. परंतु महाराष्ट्र ब्राह्मणांच्या लष्करी परंपरेपुरताच हा लेख मर्यादित असल्या-मुळे, ब्राह्मणांनी स्वराज्यार्थ जी अनेक मुलकी व महत्त्वाची राष्ट्रो-पयोगी कामे केली, त्यांचा ऊहापोह येथे केला नाही, म्हणून लेखकाच्या दृष्टीने त्यांचे महत्त्व कमी आहे असे मात्र नाही परंतु कारकुनीबद्दल महाराष्ट्र ब्राह्मणांची प्रसिद्धी, आज तरी त्यांचे शत्रूदेखील कबूल करीत असल्यामुळे फक्त त्यांच्या तलवारबहादुरीचे दिग्दर्शन या लेखात करण्याचे योजिले आहे छत्रपतींच्या कारकीर्दीत "कल्याण प्रांत जिंकण्याची कामगिरी **आबाजीपंत डबीरांनी** १६३८ त नडास नेली" पुढे "आबाजीपंताने कल्याणपासून गोव्यापर्यंत मुलूख काबीज केला." **मोरोपंत पिंगळे** हे तर शिवाजी-महाराजांचे मुख्य पेशवे होते. "त्यांनी सर्व राज्यकार्य करावे राजपत्रावर शिक्का करावा. सेना घेऊन युद्धप्रसंग व स्वाऱ्या कराव्या. तालुका ताब्यात येईल तो रक्षून चालावे" मोरोपंत पिंगळे १६५३ साली, म्हणजे शिवाजी-महाराजांचे वय सरासरी २३ वर्षांचे असताच त्यांना येऊन मिळाले. छत्र-पतींच्या खालोखाल स्वराज्यात पेशव्याचाच मान होता "तो शिवाजीचा केवळ उजवा हात असून युद्ध व राज्यव्यवस्था या दोन्ही बाबतींत कुशल व सर्वांस प्रिय असा होता. किल्ले बांधणे व फौज तयार करणे, ही त्यांची मुख्य कामे होती बादशहाच्या भेटीस शिवाजी आग्र्यास गेला, तेव्हा त्यांच्या पाठीमागे राज्याची व्यवस्था मोरोपंताने फार चांगली ठेविली. १६७१ त मोरोपंत पिंगळे व प्रतापराव गुजर या दोघांनी मोगल फौजेवर अनेक विजय संपादन करून त्यांचा संपूर्ण पराजय केला" मोरोपंत केवळ लढवय्येच नव्हते तर सेना-कर्ते होते. "पन्हाळा व रांगणा काबीज करून कोकणपट्टींत शिवाजीचा अमल बसविण्यास **अण्णाजी दत्तोने** फार खटपट केली." हे ब्राह्मण लढवय्ये शिकलेले व मुलकी कामातहि तरबेज असल्या मुळे, त्यांच्या सव्यसाचित्वाने स्वराज्याला फार मदत झाली. छत्रपति शिवाजी महाराजानंतरहि संभाजीमहाराज व राजाराम महाराज यांच्या कारकीर्दीत

**रामचंद्रपंत, शंकराजी नारायण** (पंतसचिवाच्या घराण्याचे संस्थापक) व **नारो महादेव** (इचलकरंजीचे मूळपुरुष) व **परशुराम त्रिंबक** यांनी अचाट पराक्रमाचीं कामें केलीं.

पुढें "राजाराम कर्नाटकांत निघून जात असतांच मोगलांनीं मिरज, पन्हाळा वगैरे ठिकाणें काबीज केलीं. राजारामाचे पाठीवर बादशाहानें थोडी फौज पाठविली, तरी महाराष्ट्र संपूर्ण काबीज झाल्याशिवाय कर्नाटकाकडे वळावयाचें नाहीं, असा बादशाहाचा प्रथम विचार होता. परंतु हा बादशाहाचा बेत **रामचंद्रपंतानें** तडीस जाऊं दिला नाहीं त्यानें विशाळगड, रांगणा वगैरे किल्ल्यांचा बंदोबस्त उत्तम ठेविला. खालील प्रांतांत स्वाऱ्या करून मारून नेऊन बेगमी करावी, कोंकणप्रांत राखावा, शत्रूची वर्दी ठेवून जपून वागावें, असा प्रकार चालला. पाळेगारीनें किल्ल्यांचा वगैरे आश्रय करून झाडींत राहावें, तेथून मुलखांत अमल बसवावा, घ्यावा, फिरून पळावें, फिरून येऊन प्रदेश काबीज करावा, पथकांतील लोकांची संख्या वाढवावी, या योगें राज्याची वृद्धि होऊं लागली." औरंगजेब बादशहा मराठी राज्य रसातळास नेण्याचा संकल्प करून जातीनें लढत असतां, खुद्द छत्रपति राजारामाला कर्नाटकाकडे स्वसंरक्षणासाठीं जावें लागलें असतांना, रामचंद्रपंताच्या या अचाट पराक्रमाचा कोण गौरव करणार नाहीं ? या चालत्या काळांतील गोमाशा नव्हत. मराठ्यांच्या अत्यंत पडत्या काळांत स्वराज्याला आपल्या बाहुबलाचा दिलेला हा टेकू आहे "औरंगजेबानें घेतलेले किल्ले परत जिंकण्याचा उद्योग शंकराजीनें आरंभिला. त्यानें मावळांतील लोकांची मोठी फौज तयार केली, आणि मावळ प्रांतांतच मोगलांचा उच्छेद आरंभिला. इ. स. १६९२ त औरंगजेबानें राजगड, तोरणा व रोहिडा हे किल्ले काबीज केले. परंतु मोगल फौज बेसावध असतां घोरपडीच्या साहाय्यानें रात्रीं एकाएकीं तटावर चढून **शंकराजीनें** राजगड किल्ला काबीज केला या पराक्रमाबद्दल त्यास **मदारुलमहाल** हा किताब मिळाला. इ. स. १६९३ त तोरणा व रोहिडा **हे** किल्ले व घाटमाथ्यावरील बहुतेक प्रदेश शंकराजीनें हस्तगत केला. रामचंद्रपंत साताऱ्यास राहून कारभार पाहात होता, म्हणून बादशहानें साताऱ्यास वेढा दिला. तेथील किल्लेदार **प्रयागजी अनंत** यानें मोठें शौर्य करून किल्ला लढविला, हातचा जाऊं दिला नाहीं. बादशहानें परळीस

वेढा दिला, त्याचें संरक्षण **परशुराम त्रिंबकने** केलें. शंकराजी नारायणाने बाहेरून छापे घालून बादशहाच्या फौजेस इतके त्रासवून सोडलें कीं, तूर्त बादशहाने महाराष्ट्रातून पाय काढून सर्व मोर्चा जिंजीकडे वळविला." **नारो महादेव** हा संताजीच्या फौजेत भरती झाला व तेथेच मोठ्या योग्यतेस चढला. संताजीच्या आधिपत्याखाली याने विलक्षण पराक्रम केले. त्यामुळे संताजीने त्याला आपला दुय्यम नेमले. "राजारामाच्या वेळीं संताजीच्या सर्व लढायात तो जातीने हजर होता. संताजीची सर्व व्यवस्था तोच पाही. तो पराक्रम करून उदयास आला. तोच हल्लींच्या इचलकरंजी संस्थानाचा मूळपुरुष होय." "थोड्याच वेळाने **परशुरामपंत** लढाईवर जाऊन पराक्रम गाजवू लागला. तेव्हा त्यास **सुभालष्कर** हे काम मिळून **समशेरजंग** हा किताब मिळाला. त्या धामधुमीच्या काळात त्याने अनेक पराक्रम केले, किल्ल्याचा बंदोबस्त ठेवून लोकाच्या ठिकाणी आवेश उत्पन्न केला, आणि मिरजपासून रांगण्यापर्यंतचा बहुतेक प्रदेश मोंगलाच्या ताब्यातून सोडवून त्याचा कारभार तो स्वतः करू लागला."

छत्रपति शिवाजीमहाराजाच्या वेळीं व नंतरच्या मराठेशाहीवरील आलेल्या प्राणांतिक संकटाच्या वेळीं प्रमुख महाराष्ट्र ब्राह्मणानी जो पराक्रम केला व जिवावर उदार होऊन जी तलवार गाजविली, तिचे थोडेसे दिग्दर्शन सुप्रसिद्ध इतिहासकार **सरदेसाई** याच्या शब्दातच शक्य तितके करण्याचा वर प्रयत्न केला आहे. **भट पेशवे** म्हणजे मराठ्याच्या पराक्रमाच्या पीठावर आयते नागोबा होऊन बसले, अशी चुकीची समजूत पसरली असल्यामुळे पेशव्याच्या पराक्रमाला पूर्वेतिहास आहे हें वरील वर्णन वाचून वाचकाच्या सहज लक्षात येईल मराठी राज्याच्या संस्थापनेपासूनच महाराष्ट्र ब्राह्मणानी तलवार हातीं धरली आहे, आणि आपल्या पराक्रमाची शर्थ केली आहे. शाहू छत्रपतीच्या वेळेपासून जुन्या मराठेशाहींतील बरेच सरदार थंडे बनले व काही नादानपणाने स्वाभिमान हरपून निजामाला जाऊन मिळाले व काही आपापसात केवळ स्वार्थासाठी झगडू लागले, तेव्हा **भटकुलोत्पन्न बाळाजी विश्वनाथाने** मराठीराज्याची इमारत सावरून धरली, व मराठ्याची कर्तबगारी व शौर्य हिंदुस्थानात सर्वांच्या प्रत्ययास आणलें. या नव्या पुणेरी पेशवाईत ब्राह्मणाच्या पराक्रमाला

अधिक वाव मिळाला असला तर ती साहजिक गोष्ट होय कारण खुद्द छत्रपति विलासी व आळशी, आणि मनाने मोगलाचे अंकित असल्यावर कर्तबगार व शूर पेशव्याकडे महाराष्ट्राचे पुढारीपण येणे साहजिक होतें शाहूमहाराजानंतरचे साताऱ्चे व कोल्हापूरचे सर्वच छत्रपती अंगीं पराक्रम व धडाडी नसल्यामुळे प्रकाशशून्य झाले, आणि पेशव्याच्या विलक्षण पराक्रमाच्या सूर्यप्रकाशात त्यांच्या दिवट्याचा उजेड पडेनासा झाला. जुने मराठे सरदार चैनी व खुशालचेंडू बनले. पुणेरी पेशवाईत केवळ ब्राह्मण सरदारच उदयास आले असें मात्र नाही. छत्रपति शिवाजीमहाराजाचे सर्वसंग्राहक धोरण पेशवे विसरले नव्हते. शिवशाहीतील जुने मराठे सरदार निर्माल्यवत् झाले असले तरी शिंदे, होळकर, गायकवाड, पवार वगैरे आजचे प्रसिद्ध मराठे सरदार संस्थानिक पेशवाईतच उदयास चढले. पुणेरी ब्राह्मण पेशवाईतच आज हिंदुस्थानात दिसणारीं महत्त्वाचीं मराठी संस्थाने स्थापन झालीं स्वतःच्या अंगी पराक्रम व कर्तबगारी नाही, आणि दुसऱ्याचा उत्कर्ष मत्सरामुळे सहन व्हावयाचा नाही, अशा लोकांनी पेशव्यावर बोटे मोडली व त्यांना खोटेनाटे आरोप करून शिव्याशाप दिले, तरी शिंदे होळकरांचीं प्रचंड व धनत्तर संस्थाने जोपर्यंत हिंदुस्थानात नांदत आहेत, तोंपर्यंत पेशव्याच्या सर्वसंग्राहक वृत्तीचे निराळें शाब्दिक समर्थन करावयास नको. मराठेशाहीचा हा उत्तरार्धहि फार उत्साहवर्धक आहे या उत्तरार्धांत मराठेशाहीचे निशाण अटकेपर्यंत जाऊन पोहोचलें, आणि दिल्लीची मोगल पादशाही मराठ्यांच्या पंजाखाली आली सर्व हिंदुस्थानभर मराठ्यांचा बोलबाला होऊन हिंदुपदपादशाही स्थापन होण्याचीं चिन्हे दिसू लागलीं. मराठेशाहीच्या या उत्तरार्धांत ब्राह्मणांनी विलक्षण पराक्रम केले व तलवार गाजविली **पहिले बाजीराव पेशवे** यांच्या लष्करी कामगिरीवरून त्यांची नेपोलीयनशीं सहज तुलना करता येईल शाहू छत्रपतींच्या मनात दिल्लीच्या मोगल बादशाहीबद्दल प्रेम होतें, व ती बुडविण्याच्या तो विरुद्ध होता परंतु बाजीरावाने स्वतःच्या पराक्रमाने उत्तरेचे राजकारण सुरू करून महाराष्ट्राला उत्तराभिमुख केले व आपसातील चुरशी व रजपुती पद्धतीची भांडणे तात्पुरती बंद पाडलीं. **चिमाजी अप्पांनी** केलेला वसईचा अद्भुत रणसंग्राम कोणीहि विसरणें शक्य नाही. **राघो भरारी** व **सदाशिवरावभाऊ** यांचा

पराक्रम महाराष्ट्राचे नाव केव्हाहि उज्ज्वलच करील. सदाशिवरावभाऊ उद्‌गीरला जिंकले व पानपतला हरले, तरी त्यानी दोन्ही ठिकाणी पराक्रमाची शर्थ केली हे कोणासहि कबूल करावे लागेल. **रावसाहेब पेशव्यांचा** अकाली अंत झाला तरी राक्षसभुवनाच्या लढाईत त्याच्या तलवारीची तिखट धार शत्रूच्या प्रत्ययास आली.

पेशव्याचें घराणे सोडून दिले, तरी मराठेशाहीच्या या उत्तरार्धात अनेक पराक्रमी व रणधुरंधर ब्राह्मणसरदार दृष्टीस पडतात. पानपतीं आत्मविसर्जन करणारे **बळवंतराव मेहेंदळे,** बुंदेलखंड जिंकणारे **गोविंदपंत खेर व रघुनाथराव नेवासकर** यांचा प्रताप कोण दृष्टिआड करू शकेल ? **परशुरामभाऊ पटवर्धन** हे तर पेशवाईतील भीष्माचार्यच समजले जात असत दक्षिणेत हैदर व टिपू, आणि निजाम यांना रोखून धरण्याचे कार्य यानीच उत्तम रीतीनें पार पाडले यांच्या दक्षिणेतील पराक्रमाने मराठ्यांना निर्धास्तपणे उत्तरेस राजकारण करता आले. बंगालमधील रघोजी भोसल्याचें राजकारण यशस्वी करणारे प्रख्यात सेनापति **भास्कर पंडित** हे ब्राह्मणच होते. यांनीच बंगालवर अनेक स्वाऱ्या केल्या व **शिवभट साठ्याने** ओरिसा प्रांत भोसल्यांना मिळवून दिला रावसाहेबाचे प्रख्यात सेनापति **हरिपंत तात्या फडके** यांनी इंग्रजांशी यशस्वीपणे झुंज घेतली, आणि शेवटच्या रावबाजीचे सेनापति नरवीर **बापू गोखले** यांनी रणांगणावर आपल्या प्राणाचे विसर्जन केले व अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत पेशवाईचे रक्षण करण्याचा जिवापाड यत्न केला. त्यांचा लढाईत पराभव झाला तरी त्याच्या तलवारीची धार बोथटली होती, असें त्यांच्या कट्टया शत्रूनाहि म्हणता आले नाहीं इंग्रजांनी त्याच्या शौर्याची प्रशंसाच केली व वीरोचित सर्व मान त्याच्या शवाला दिला महाराष्ट्र ब्राह्मणांची लष्करी परंपरा अशा उज्ज्वल व कोणत्याहि राष्ट्राला गौरवास्पद अशा वीरपुरुषांनी शोभिवंत केली आहे. महाराष्ट्र ब्राह्मण सरदारांच्या धडाडीपुढे मोठेमोठे खान, नबाब, सिंग, बक्ष व प्रसाद लटपटले, व त्यांना पळता पळता भुई थोडी झाली. हे दिग्दर्शन करताना प्रमुख अशा पराक्रमी सरदारांचा वर नामनिर्देश केला आहे. सामान्य परंतु लढवय्या अशा अनेक ब्राह्मण वीरांचीं नावें विस्तारभयास्तव मुद्दाम या लेखात गोवलीं नाहीत.

कारण ब्राह्मण सरदाराची जत्री देणें हा या लेखाचा उद्देश नाही. परंतु महाराष्ट्रब्राह्मण हे केवळ बुद्धिजीवी व खर्डेघाशींत पटाईत असतात, ही एककल्लीपणाची प्रचलित परंतु असत्य समजूत खोडून काढण्याचा या लेखाचा उद्देश आहे. महाराष्ट्रांतील मराठ्यांप्रमाणेच ब्राह्मणानांहि लष्करी उज्ज्वल परंपरा आहे, आणि लेखणीप्रमाणे तलवार देखील ब्राह्मणांना अत्यंत उत्तम रीतीने पेलता येते, हे दाखवून देणें एवढाच या लेखाचा उद्देश आहे, आणि ब्राह्मणांची लष्करी परंपरा शोधून पाहतांना, १६५३ ते १८१८ ह्या १६५ वर्षांच्या अल्प कालाचेंच ऐतिहासिक पर्यालोचन या लेखांत येथपर्यंत केलें आहे.

इ. स. १८१८ सालीं पेशवाईचा लोप झाला आणि महाराष्ट्रांतील शिवछत्रपतीने आपल्या पुण्याईने स्थापन केलेलें स्वराज्य रावबाजीच्या मूर्खपणाने नष्ट झाले त्यानंतर इंग्रजांचे राज्य सर्व देशभर सुरू झाले, आणि महाराष्ट्र ब्राह्मणाच्या तलवारीची चमक जगाला दाखविण्याची संधीच दुरापास्त झाली. परंतु अशा या संकटकालांत व विपन्नावस्थेत १८५७ सालीं महाराष्ट्र ब्राह्मणांची तलवार लकाकून गेली ५७ च्या बंडांत जर कोणी अत्यंत रण-कौशल्य व पराक्रम दाखविला असेल, तर त्या दोनच व्यक्ती होत. झांशी-ची **राणी लक्ष्मीबाई** ही आपले गेलेले स्वराज्य -- डलहौसीने अन्यायाने तिने घेतलेला दत्तकपुत्र नामंजूर करून खालसा केलेले राज्य परत मिळ-विण्याकरिता या धामधुमींत सामील झाली. सरासरी दहा महिने तिने झांशी प्रांत आपल्या ताब्यांत ठेवला आणि सर ह्यू रोझसारखा रणधुरंधर सेनापति अजस्र सेना व तोफखाना घेऊन आला असताहि एकवीस दिवस झांशीचा किल्ला अत्यंत शौर्याने त्याच्याविरुद्ध लढविला. या पराक्रमी अबलेने पुढेहि इंग्रजांशीं अनेक लढाया मारल्या व अखेर ग्वालेरच्या युद्धांत आपले प्राणविसर्जन केले. या महाराष्ट्र संग्राम-देवतेच्या पराक्रमाची व शौर्याची स्तुति अनेक इंग्रज सेनापतींनी मुक्तकंठाने गाइलीं आहे. ५७ सालांतील दुसरी रणधुरंधर व्यक्ति म्हणजे सेनापति **तात्या टोपे** ही होय. सेनापति विंडहॅमच्या हातून तात्याने कानपूर जिंकून घेतलें, आणि बंडवाल्यांचा सपशेल मोड झाल्यानंतर तात्याने गनिमी काव्याची लढाई चालू ठेवून जवळ जवळ दोन वर्षे

इंग्रजाना दाद दिली नाही व त्याना त्राहि भगवान करून सोडलें. तात्या टोपीच्या रणनैपुण्याची योग्य तारीफ करण्याकरिता उपमेसाठी मल्हारराव होळकरानाच आणावें लागेल. तात्या टोपीच्या नैपुण्याची, के व मॅलेसन याच्या बडासबधींच्या इतिहासातहि अत्यंत तारीफ आहे. या दोन पराक्रमी व्यक्तीं-मुळे बडाची कालमर्यादा लाबली, आणि हिंदुस्थानात सर्वत्र स्थिरस्थावर होण्याला १८५९ सालचा एप्रिल महिना उजाडला. लहानशा प्रमाणात वासुदेव बळवंत फडके यानीहि दक्षिणेंत गडबड उडवून दिली. सरळ मार्गाने पराक्रमाला वाव न मिळाल्यामुळे त्याला बडाच्या आडरानात शिरावें लागलें, परतु त्यामुळे त्याच्या तलवारीचे तेज फिकें पडत नाही.

महाराष्ट्र ब्राह्मणाची लष्करी परपरा अजूनहि गंजली नाही. कारण शौर्याची दोन उपागे, निर्भयता व स्वार्थत्याग, ही त्याना अनुकूल असतात. परतु इग्रजाच्या राजवटींत महाराष्ट्र ब्राह्मणाची बिनलष्करी जातींत गणना करण्यात आली, व लष्करातील त्याचा मार्ग रोखून धरण्यात आला. स्वराज्याच्या काळात पराक्रमाला किमत होती, ती परकीय राजवटींत नाहीशी झाली. महाराष्ट्र ब्राह्मणापैकी सर्वच पोटजातींनी या रणयज्ञात भाग घेऊन पराक्रमाच्या आहुती दिल्या आहेत महाराष्ट्र ब्राह्मणाची लष्करी परपरा इग्रजाना माहीत नाही, असे थोडेच आहे? परतु महाराष्ट्र ब्राह्मणाना पराक्रमाबरोबरच बुद्धिमत्ताहि अनुकूल आहे, ही गोष्ट त्यानी ओळखली असल्यामुळे, 'बिनलष्करी जाती' या सबबीवर पलटणींतून त्यानी 'ब्राह्मण' खड्यासारखे वेचून बाहेर टाकले. इग्रजाच्या लष्करातील वैद्यकीय खाते महाराष्ट्र ब्राह्मणाना उघडे होते, त्यात निर्भयपणें प्रवेश करून व शत्रूच्या माऱ्याला न जुमानता आपलें कर्तव्य बजावून नावलौकिकास चढलेले कर्नल **कुकडे**, **चितळे**, मजर **जठार** याच्यासारखे अनेक ब्राह्मण डॉक्टरवीर आजलाहि प्रसिद्ध आहेत. परतु ज्या मराठी सस्थानात महाराष्ट्र ब्राह्मणाच्या पूर्वपराक्रमाचा विसर अजून पडला नाही, तेथें खास लढाऊ पलटणींतहि कर्नल **रेशीमवाले**, कॅप्टन **मोडक** अशीं नावे आजहि थोडीबहुत ऐकूं येतात. सर्व सस्थानात उत्तम लष्करी सघटणेबद्दल नावाजलेल्या ग्वालेर येथील पराक्रमी व कवायती फौजेचे सर-सेनापति **राजवाडे** नावाचे महा-राष्ट्रीय ब्राह्मणच आहेत. आजलाहि ब्रिटिश हिंदुस्थानात महाराष्ट्र

ब्राह्मणाच्या पराक्रमाला योग्य वाव असता, तर विनायकराव सावरकरासारखा धाडशी व पराक्रमी वीर अदमानात किंवा रत्नागिरींत कुजत न पडता सेनापतीच्या दर्जाला जाऊन पोहोचला असता, व गेल्यामहायुद्धासारख्या सधींत विक्टोरिया क्रॉस व अनेक इतर लष्करी बिल्ले व बहुमान सपादन करून, महाराष्ट्राचे मुख उज्ज्वल करता, व महाराष्ट्र ब्राह्मणाच्या ऐति-हासिक लष्करी परपरेत महत्त्वाची भर घालता. परतु—

# कला व नीति

(१) कला व नीति याचा सबध आहे काय? ह्या प्रश्नावर चर्चा करताना मूळ मुद्दे बाजूस राहतात व बाजूच्या आगतुक विषयावर बहुधा वादविवादाची मदार येऊन पडते.

(२) कला म्हणजे काय? कला म्हणजे सौदर्य-प्रदर्शन. सौदर्याचे प्रदर्शन करण्याकरिता प्रथम सौदर्याचे सशोधन करावे लागते.

(३) सौदर्य कधी मूर्त तर कधी अमूर्त असते. शिल्प, मूर्ति, चित्र ही मूर्त सौदर्याची उदाहरणे होत गायनातील सौदर्य अमूर्त असते.

(४) सौदर्याचा आस्वाद कधी कर्मेद्रियानी घेता येतो, तर कधी ज्ञानेद्रियानी आपणास सौदर्याचे ज्ञान होते. प्रसगी इद्रियाना अगोचर असणाऱ्या सौदर्याचे अस्तित्व मानसद्वारा आपणास कळते.

(५) एखादी सुदर वस्तु पाहिली म्हणजे आपणास आनद होतो. वस्तु जितकी अधिक सुदर तितका आनद अधिक! कला ही आनदाची जननी होय.

(६) सात्त्विक, राजस व तामस हे आनदाचे तीन प्रकार होत. किंबहुना त्या आनदाच्या उतरत्या पायऱ्या होत सात्त्विक आनद हा सर्वात उच्च दर्जाचा आनद होय.

(७) सूड घेण्याच्या बुद्धीने एखाद्याचा खून करताना होणारा आनद तामसी आनद होय.

(८) युद्धात कर्तव्य म्हणून शत्रूकडील शिपायाची कत्तल करताना होणारा आनद राजस होय.

(९) आपल्या तत्त्वाकरिता उपवास करून आत्मत्याग करण्यात होणारा आनद सात्त्विक होय.

(१०) धर्म व नीति याच्यावर अधिष्ठित झालेला आनद हा सात्त्विक स्वरूपाचा व म्हणूनच परमोच्च होय. सात्त्विक आनद देणारी कला हीच खरी कला होय. ती धर्म व नीति याच्यावर अधिष्ठित असते.

(११) आचारधर्म व व्यवहारनीति कालाच्या ओघाबरोबर बदलतात. संध्या सस्कृतात करणे कीं मराठींत करणें, मुलीचें लग्न आठव्या वर्षी करावे कीं अठराव्या वर्षी करावे...वगैरे गोष्टीची धार्मिकता व नीतिमत्ता कालातराने बदलते. पुनर्विवाह हा कालचा अधर्म असला तरी आज धर्म ठरेल. अस्पृश्यता ही कालची नीति आज अनीति ठरेल.

(१२) परतु धर्माचीं मूलतत्त्वें अचल आहेत व त्याची सत्यता चिरतन टिकणारी आहे. धर्म व नीतीचे अशा प्रसगीं मीलन झाले असतें. सत्य, प्रेम, अहिंसा व ज्ञान हीं तत्त्वे सर्व धर्माना सर्व कालीं मान्य असतात. काळ बदलला तरी तीं बदलत नाहीत. **त्याचे अस्तित्व व अनतत्व स्थलकालनिरपेक्ष असते.**

(१३) या अचल धर्म-नीति तत्त्वावर अधिष्ठित झालेला आनद परमोच्च आनद होय व हा परमोच्च आनद, केवळ आपल्या दिव्य दर्शनाने, उत्पन्न करणारे सौंदर्य खरे सौंदर्य होय. या अपूर्व व अतुल्य सौंदर्याचे प्रदर्शन करील तीच खरी कला होय.

(१४) कला व नीतीचा प्रत्यक्ष सबध नसला तरी अप्रत्यक्षरीत्या त्याच्यात घनिष्ट नातें आहे नीतीच्या आधाराशिवाय खरी कला नादूं शकणार नाही. **कला हे नीतीचे परम मगलधाम होय.**

कला व नीति याचे नातें वरील प्रकारचे आहे. कला वादी व नीति प्रतिवादी. या दोन्ही पक्षाना वरील तत्त्वे मान्य आहेत. मग या दोन पक्षात निरतर वाद का होतो ?

'मोराचे वर्णन मोराचा पिसारा पाघरून ठुमकत चालणाऱ्या डोमकावळ्याला कसे लागू पडेल ? त्याचप्रमाणे गल्लोगल्ली गळे काढून तानसेन होऊं पाहणाऱ्या तोतयाला किंवा ट-ला-ट जुळवून कालिदास होऊ इच्छिणाऱ्या ढोंग्याला खऱ्या कलाकाराचे वर्णन कसे लागू पडेल ?'

परतु हे ढोंगी इसम हा वाद नित्य उपस्थित करतात. हे स्वतः अनीतिमान् असतात व त्यामुळे खरी कलाकृति याना निर्माणच करता येत नाही. परतु त्यानी निर्माण केलेल्या अश्लील व अनीतिवर्धक तमाशाला जगाने कलाकृति म्हणून गौरवावे व त्याचा सन्मान करावा, ही त्याची अपेक्षा असते. आणि जग त्याना तसें लेखावयास तयार नसल्यामुळे ते अट्टाहासाने

व तावातावाने प्रतिपादन करीत असतात कीं, कला व नीति याचा काडी-मात्र सबध नाही. परतु रसिक त्याच्या सापळ्यात सापडत नाहीत, आणि म्हणूनच संतापाने त्याचा थयथयाट चालू असतो.

गीता कर्मयोगपर कीं सन्यासयोगपर, हा वाद फार प्राचीन आहे. आद्य शकराचार्यांपासून तो लोकमान्य टिळकापर्यंत सर्व ज्ञानी व त्यागी नरश्रेष्ठानी या वादात आपल्या लेखणीला शीण दिला आहे. दोघात मतभेद फक्त शाब्दिक स्वरूपाचा सन्याशाला ज्याप्रमाणे मोक्षलाभ होणार हे निश्चित, त्याप्रमाणेच फलाशा न धरणाऱ्या कर्मयोग्यालाहि ईश्वराची भेट होणार! खरा कलाकार व खरा नीतिवादी याच्यातील वाद देखील असाच शाब्दिक आहे. कारण दोघेहि प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरीत्या, सहेतुक व अहेतुक परमोच्च नीतिधर्माचाच पुरस्कार करीत असतात.

परतु सिंहाचे कातडे पाघरलेल्या हीनकलानिर्मात्याचा गोंधळ काय वर्णन करावा! श्री. ताबे त्याना हीन कलावादी म्हणत असले, तर मी त्याना कलाहीन म्हणेन. ते तावातावाने म्हणतात–'कला व नीतीची सागड घातली जावी हा दुराग्रह आहे. नीतीचे स्वरूप नित्य बदलत असते. तिच्याशीं कलेची सागड कशी घालता येणार ?' बाबारे! नीतीचे स्वरूप कालातराने बदलत असले तर कलेचें रूप तरी काय चिरतन आहे? सौदर्य व आनद या कल्पना काय स्थलकालानुसार बदलत नाहीत? चिनी लोक एका काळीं पुरुषाच्या वेण्या घातलेल्या लाबलाब शेड्या व बायकाचे लोखडी खोड्यानी करकचून टाकलेले पाय, हीं सौदर्याचीं लक्षणें समजत असत! युरोपात किंवा हिंदुस्थानात काय ही सौदर्य-लक्षणें मानलीं जातील? विलायतेतील तरुण स्त्री-पुरुषाना नृत्याने ( Ball ) जो आनद होतो तो हिंदी स्त्री पुरुषाना कधी तरी होईल काय? परस्त्रीला हातीं धरून व तिच्या कमरेभोवती आपल्या हाताचा विळखा घालून नाचणारा उल्लू इसम आपल्या समाजात कोणी आढळला, तर त्याची काय सभावना होईल हे सर्व जाणतात. मदुरा येथील जुनीं हेमाडपथी देवळे, वेरुळचीं लेणीं, किंवा अजिंठ्याची चित्रकला पाहिली व त्याची आमच्या आजच्या कलाकृतीशीं तुलना केली म्हणजे कलेचें बदलतें स्वरूप आपोआप लक्षात येतें. जुन्या महाकाव्याचे सौदर्य आज स्फुट वीणा-गीतात येऊन बसले आहे आणि आर्य सगीताची गादी पार्शी गजल-

कवाल्यांनी बळकावलेली दृष्टीस पडते. कादंबऱ्यांना लघुकथांनी खो दिला. कालिदासाचे शाकुंतल आज रंगभूमीवर न रंगता एकच प्याला तेथे थाटतो. कालिदासाच्या मेघदूताचें कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी केलेले सुरस भाषांतर आज जितकेजण वाचत असतील, त्याच्यापेक्षा शतपटींनी अधिक इसम यशोधनाची गोडी सेवीत असतात. कालिदास देखील आज out-of-date जुना टाकाऊ समजला जातो, मग भवभूति-मोरोपंताची कथा काय ?

या मानानें आचार-धर्म व व्यवहार-नीति यांत काल-स्थलांतरानें पडणारा फरक मंद नाही का ? कलाकृतींत होणाऱ्या पलटीला चंद्राच्या गतीची उपमा दिली, तर आचार धर्म व व्यवहार-नीति शनीप्रमाणे किंबहुना वरुण-प्रजापती ( Hershel and Neptune ) च्या मंद गतीनें बदलतात असे म्हणावे लागेल आणि चिरंतन नीतिधर्माला सूर्याचीच उपमा द्यावी लागेल मग कलेला सातत्याकरिता व चिरंजीवनासाठी धर्म व नीतीची साथ नाही का करावी लागणार ?

परंतु हीनकलाभिमानी वा कलाहीन लोक ओरडतात—' कलेनें धर्म व नीतीच्या घरी राबले पाहिजे हा तुमचा अट्टाहास का चालू द्यावा ? ' जणू काही धर्माच्या सेवेत माप भरले आहे ! नर्कात लोळणारा स्वतंत्र किडा होणे हे जणू धर्माच्या द्वारी नोकरी करण्यापेक्षा अधिक आनंदमय आहे ! स्वराज्याच्या व स्वातंत्र्याच्या सेवेत आपले जीवन घालवा असे जर कोणी या दांभिक कलावाद्यांना सांगितले, तर त्यांच्या अंगावर शहारे येतील व ते म्हणतील, ' छे छे ! भलतेच ! हा जुलूम आम्ही कधीहि सहन करणार नाही आम्ही स्वदेश व स्वधर्म यांना वाटल्यास टाचेखाली तुडवू, पण धर्म व नीतीच्या घरीं कलेनें राबले पाहिजे हा तुमचा अट्टाहास चालू देणार नाही आमची कला मर्जीप्रमाणे अधर्माची चाकरी करील व अनीतीचे पोवाडे गाईल व येणेप्रमाणे आपले स्वातंत्र्य जगाला पटवून देईल

खऱ्या कलावंताची भूमिका श्री. तांबे यांनी रंगविली आहे. तिच्याविषयी मतभेदच राहू शकत नाही. कारण कला हे नीतीचे परम मंगलधाम होय, याखेरीज ध्येयवादी तरी दुसरे काय प्रतिपादणार ? परंतु ' मोरांची पिसे पांघरलेले डोमकावळे' अनीतीला कला म्हणून संबोधतात व स्वतःच्या समर्थनार्थ कला व नीतीचा काडीमात्र संबंध नाही असे प्रतिपादन

करतात; त्यांचा यथोचित समाचार मात्र त्यांनी घेतला नाही. त्यांना हीनकलामिश म्हणून ते संबोधतात, परंतु त्याऐवजीं कलाहीन हेंच विशेषण त्यांना लावणें इष्ट होईल.

संस्कृत प्राचीन कलावताच्या दृष्टीने सत्यं शिवं सुंदरम् हें कलेचें स्वरूप होय. 'सत्य, सौंदर्य व नीति हे एकजीव झाले आहेत—नव्हे एकच आहेत.' आनंदब्रह्म हेंच कलेचें परमोच्च रूप होय. कला ही मानवी संसारातील पूर्णतेचें प्रतीक होय. कला ही विश्वाची रहस्यदीपिका होय. मग ती धर्म-नीतिला सोडून कशी राहील बरें ? नामांकित पाश्चात्य कलावंत देखील तेंच म्हणतातः—

Beauty is truth, truth beauty—that is all ye know on earth, and all ye need to know— KEATS.

Music is the mediator between sensual and spiritual life BEETHOVEN

Men like Shakespear, Dante, Michael Angelo, Beethoven, love and perceive the principles of Goodness, Truth and Beauty–all three and have thus caught some glimpse of the unchangeable realty.

नीतिमान व कलावंत तरुणीला कलावती म्हणून जग सत्कार करतें. परतु कलावतीने अनीतीची कास धरली तर त्या कलावंतिणीला समाजांतील अत्यत हीन दर्जाचे स्थान प्राप्त होतें. कारण अनीतीच्या संसर्गात कलेचें दिव्य सौंदर्य नष्ट होतें. देवीचे डाग तोंडावर पडल्यावर रूप पहिल्यासारखे सुदर कसे राहील ? कलावतिणीनें किंवा तिच्या कन्येने नीतीचा पुरस्कार केला म्हणजें तिला परत समाजात सुगृहिणीचें मानाचें स्थान प्राप्त होतें.

कला ससाराचें चित्र चितारते किंबहुना ती सृष्टीचें प्रतीक बनते. मानवी जीवनातील बऱ्या वाईट भावनाचें चित्रण ती करीत असते. त्यामुळें संसारांतील दुःख, विषमता, अनीति यांचें प्रसंगीं कलाकृतींत चित्रण झालेलें असतें हे खरें, परंतु या गोष्टी अशा हळुवार हाताने सुदर व उच्च कलाकृतींत रगविल्या असतात, कीं त्या प्रदर्शनाने मनांतील उत्तम भावना व विचार

जागृत होतात. **एकच प्याला** नाटकातील सिंधूचें पात्र पाहून दारुबाजी-च्या नशेंत आपल्या साध्वी पत्नीला छळून ठार मारण्याची इच्छा अट्टल दारुड्याला देखील होणार नाही. **शाकुंतलांतील** दुष्यंताची फसवणूक पाहून एखाद्या भोळ्याभाबड्या मुलीला फसवून केसाने तिचा गळा कापण्याची बुद्धि एखाद्या छाकटयालाहि होणार नाहीं, **मृच्छकटिक** पाहिल्यानें प्रत्येक क्रांतिकारकाला वसंतसेनेसारखें किंवा मदनिकेप्रमाणे एकेक पात्र ठेवण्याची गरज भासत नाही. लेडी **मॅकबेथ** व **हॅम्‌लेट** या दोघांची त्या त्या नाटकाच्या अखेरीस इतिश्री होते खरी, परंतु प्रेक्षकाच्या मनात हॅम्‌लेटविषयी करुणा व मॅकबेथविषयी तिरस्कार उत्पन्न होतो !

कलाकृति अधिक परिणामकारी होण्याकरिता ती कधी मधी दुःखपर्यव-सायी करतात. **लीयर** नाटकात गॉनरिल व रेगन या नीतिभ्रष्ट पापिणी आमरण राज्यविलासात लोळतात आणि कार्डेलियासारख्या सत्यप्रिय, प्रेमळ सुकन्येचा छळ होतो. परंतु नाटक पाहिल्यानंतर प्रेक्षकाच्या मनात मोठ्या दोन बहिणींविषयी तिटकारा व धाकटीविषयी प्रेम व करुणा उत्पन्न होते. कलाकृतींत प्रसंगीं संसारातील विषमतेचें, अन्यायाचें व अनीतीचे चित्रण असते, कधी अनीति विजय पावलेली दिसते, तर कधी नीतीचा जय झालेला दिसतो. परंतु उत्तम कलाकृति तीच कीं, **जी पाहून मनुष्याच्या मनांतील उदात्तता जागृत होते व त्याचा स्वार्थ क्षणभर तरी लोपून त्याला तेवढ्यापुरतें तरी देवपण येतें.** कलाकृतीची हीच खरी कसोटी होय त्यामुळे कलावंत हा अपूर्ण मानव असला व त्या दृष्टीने त्याच्यात दोष असले तरी कलाकृति निर्माण करताना त्याचा स्वार्थ लोपतो, त्याला देवपण लाभते व विश्वातील अचल नीतितत्त्वाशीं तो क्षणभर एक-जीव होऊन ईश्वराच्या सृष्टीचा नमुना डोळ्यापुढे ठेवून तशी कल्पनासृष्टि स्वसामर्थ्यानुसार निर्माण करतो. कलाकृतीला ईश्वरीसत्तेचे व सौंदर्याचे प्रतीक मग का बरे लेखू नये ?

सृष्टींत भिन्न भिन्न सूर निनादत असले, भिन्न भिन्न वारे वाहत असले, भिन्न भिन्न रंग चकाकत असले, तरी त्या भिन्नतेंतून एकत्वाचा सूक्ष्म झरा वाहत असतो. हाच प्रतिभेचा प्रवाह होय. हीच ईश्वरी पूर्णता होय आणि कलावंताला विश्वाच्या भिन्नत्वातील ह्या एकत्वाचें दर्शन प्रसंगीं लाभते

व सुदर कलाकृति त्याच्या हातून निर्माण होते. कलाकृतीला ईश्वरी सृष्टीची प्रतिमा म्हणूनच मानतात व कलावताला सताचा मान मिळतो.

या सर्व गोष्टी मान्य करूनहि श्री. ताबे मधून मधून कलेचा व नीतीचा सबध नाही असे उद्गार काढतात. मागे इग्रज-जर्मनाचें युद्ध झाले, तेव्हा प्रारभीं तरी जर्मनीचे सारखे पुढे पाऊल पडत होते. परतु हे सत्य कबूल करणे स्वदेशाभिमानी इग्रजाच्या जिवावर येई त्यामुळे 'आम्ही यशस्वी रीतीने पीछे-हाट केली', अशा विजयाच्या बढाईखोर वार्ता इग्रजी पत्रातून नित्य प्रसिद्ध होत असत. मौलाना महमदअल्ली वर्तमानपत्रात त्या वेळीं थट्टेने छापत कीं, ' रायटरके टेलिग्रामसे मालुम होता है की, फत्ते ऑग्रेज सरकारकी है, लेकिन जर्मनी मुलुख ले रहा है ! ' श्री ताबे हे कट्टर कलावत समजले गेलेले, ध्येयवादी लोकाचे ते शत्रु ! तेव्हा तेहि लिहितात की, ' कला हे नीतीचे परम मंगलधाम होय, परतु कला व नीतीचा सबध नाही कला स्वतत्र आहे, ती नीतीच्या घरीं कधीच राबणार नाही, परतु ती धर्माला व नीतीला पोषकच असेल जी तशी असेल तीच खरी कला, बाकीची हीनकला. धर्म, नीति, पावित्र्य याचे आपल्या कृतीने सवर्धन करणारे तेच कलावत, बाकीचे कलाहीन ! '

आम्हीहि तथास्तु म्हणतों व त्याना शाब्दिक समाधान यात मिळत असल्यास वाद वाढवीत नाही इंग्रज लोक मागे अफगाणिस्थानच्या युद्धात हरले, परतु तसे त्यानी कधीहि कबूल केले नाही. ते म्हणाले, ' आमचा या युद्धात विजय झाला व अफगाणिस्थानचा पूर्ण पराभव झाला. मात्र अफगाणिस्थानच्या मैत्रीची आम्हास इच्छा असल्यामुळे यापुढे प्रतिवर्षी वीस लाख रुपये ( प्रेमाची ) खडणी आम्ही अफगाणिस्थानास देत जाऊ ' त्याच न्यायाने कलावादी ताबे याचा या वादात पूर्ण जय झाला असे मानण्यास आमची हरकत नाही. स्वातत्र्यावर अधिष्ठित झालेल्या व सत्य शिव सुदरम् या स्वरूपाच्या कलामूर्तीला आमचेहि सहस्रश. प्रणाम असोत.